

नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
राज्य मराठी विकास संस्था
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

'नवी क्षितिजे' हे मराठीतील एक महत्त्वाचे नियतकालिक (त्रैमासिक) असून ते सद्यस्थितीत कार्यरत नाही. संस्थेच्या उपरोक्त प्रकल्पातंर्गत 'नवी क्षितिजे' ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करता येणे शक्य असल्याने सदर नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून संस्थेच्या संकेतस्थळावर उपलब्ध करून देण्यासाठी राज्य मराठी विकास संस्थेद्वारे सदर नियतकालिकाचे संपादक व मालक स्मृतिशेष श्री. नाना जोशी ह्यांच्या कन्या श्रीमती शर्मिला जोशी ह्यांना विनंती करण्यात आली होती.

सदर विनंतीस श्रीमती शर्मिला जोशी ह्यांनी मान्यता दिल्यामुळे आणि सदर नियतकालिकाचे अंक उपलब्ध करून दिल्यामुळे 'नवी क्षितिजे' ह्या नियतकालिकाच्या (त्रैमासिक) अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देणे शक्य होत आहे.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे/ नियतकालिकांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.

वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई आणि नवी क्षितिजे संपादक-मंडळ यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे, कलावंतांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्व राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे नसतील.

अनुक्रमणिका

# नवी क्षितिजे

अंक

४५

किंमत रु. ७५/-     वार्षिक वर्गणी रु. १०१/-

संपादक

नाना जोशी     विश्वास पाटील

## अ नु क्र म णि का




- मालक, मुद्रक, प्रकाशक : नाना जोशी ४ अ, सोमण नगर, क्रांतीवीर भाई बाल मुकुंद मार्ग, मुंबई ४०० ०१२
- पत्रव्यवहार वरील पत्त्यावरच करावा.
- निर्मिती व्यवस्था : देखणी छपाई सेवा, ३, सोनल सोसायटी, वंदना सोसायटी समोर, हायवे, ठाणे ४०० ६०२.
- मुखपृष्ठ : हेमचंद्रराव कऱ्हाडकर
- अक्षरजुळणी : सॅम टाईपसेटर, आसावरी, दत्ता राऊळ मार्ग, गोखले रोड (द.), दादर, मुंबई २८.


अनुक्रमणिका



# संपादकीय

नवी क्षितिजेचा हा पंचेचाळीसावा अंक. चव्वेचाळीसावा अंक निघाल्यानंतर खूप विलंबाने पंचेचाळिसावा अंक निघत आहे. हा अंक लवकर द्यावा अशी आमची मनापासून इच्छा होती. मात्र काही ना काही अडचणी येऊन शेवटी अंक उशिरा निघायचा तो निघालाच. या दिरंगाई–बद्दल आम्ही अत्यंत दिलगीर आहोत.

प्रत्येक अंकात विचाराला काही ना काही नवे खाद्य द्यावे या नवी क्षितिजेच्या आरंभापासूनच्या तत्वाप्रमाणे याही अंकात 'हिटलर आणि स्टॅलिन'–नाना जोशी यांचा हिटलर व स्टॅलिनच्या आयुष्याचा तुलनात्मक अभ्यास आम्ही दिला आहे. वाचकाला तो रोचक वाटावा. असाच दुसरा लेख म्हणजे 'जे जे शक्यतेच्या कोटीतील वाटते ते ते प्रत्यक्षात आणण्यासाठी झटावे' हा डॉ. आनंद जोशी यांनी पीटर मेडावरच्या लेखावरून तयार केलेला लेख. हाही लेख वाचकांना काही नवे देईल अशी आशा आहे. भरीस 'नवे पदार्थविज्ञानशास्त्र' या लेखमालेचा तिसरा व शेवटचा हप्ता तसेच 'काम मिळविण्याचा हक्क' आणि 'जन्माने मनुष्य स्वतंत्र आहे परंतु पहावे तेथे तो बेड्यांमध्ये अडकलेला आढळतो' ही काही टिपणे सुद्धा वाचकांच्या पसंतीस उतरावीत.

संपादक
'नवी क्षितिजे'

अनुक्रमणिका

*"मार्क्सविद्येचा ज्ञानदीप ज्याने पुन्हा एकदा आशेची निराशा केली आहे. डाव्या विचारसरणीत सध्या जो बौद्धिक गोंधळ माजला आहे त्या गोंधळातून बाहेर पडण्यासाठी काय करता येईल?"*

# डाव्यांच्या बौद्धिक गोंधळातून बाहेर येण्यासाठी...

डेव्हिड सेलबोर्न

स्वैर अनुवाद

## विश्वास पाटील

या घटकेला डावी विचारसरणी वैचारिकदृष्ट्या अगदी दुबळी बनली आहे. ती किती दुबळी बनली आहे याचा उत्तम पुरावा म्हणजे, साम्यवादाच्या दुर्दशेनंतर सुरू झालेली पूर्वयुरोपची फेररचना; (इराक आणि कुवेत या दोन ंतील) आखाती युद्ध आणि त्या युद्धाचे गर्भितार्थ याच्या पासून ते 'नव्याने उदयास येऊ घातलेली जागतिक व्यवस्था' आणि थॅचरबाईंच्या पाठीमागे "सामाजिक बाजारपेठेच्या" अगदी घराजवळच्या प्रश्नावद्दल ब्रिटनमध्ये तयार झालेली राष्ट्रीय एकावाक्याता ; यातील एकाही प्रश्नाची डाव्या विचारसरणीला न करता आलेली चिकित्सा! एकापेक्षा एक महत्त्वाचे असे हे प्रश्न, परंतु डाव्या विचारसणीला त्यातील एकाही प्रश्नाचा खरा अर्थ लावता आला नाही. डाव्यांच्या बौद्धिक कमकुवतपणाचाच हा पुरवा नाही काय?

आता प्रश्न असा की, असे घडण्याचे कारण कोणते? अनेक कारणांमुळे हे घडले आहे. पहिले कारण हे की, डाव्या विचारसरणीजवळील विश्लेषणात्मक चिकित्सेची बौद्धिक हत्यारेच आज डळमळीत बनली आहेत. आजवर भक्कम आणि भरवशाच्या मानल्या गेलेल्या तात्त्विक संकल्पना वस्तुस्थितीच्या खडकावर आपटताच त्यांचा अगदी चुरा झाला आहे. स्पष्टच सांगायचे तर 'सामाजिक वर्ग' नामक ज्या संकल्पनेवर डाव्या विचारसरणीची सगळी मदार होती ती 'वर्ग' ही कल्पनाच आज पूर्णपणे वाऱ्यावर विरून गेली आहे. याच वर्गविग्रहाच्या कल्पनेने आमच्या डोळ्यावर झापडे आणली होती. याच संकल्पनेच्या मगरमिठीत आमची चिकित्सक बुद्धी बंदिस्त झाल्याने आमच्या बुद्धिला जणू अंधत्व आले होते अणि आम्हाला समाजातील वर्गीय विषमता वगळता अन्य दुसरी कोठलीही विषमता पाहाता येईनाशी झाली होती. डाव्या विचारसरणीचा कमकुवतपणा हा की, वर्गीय संकल्पनेची जागा घेऊ शकेल आणि वस्तुस्थितीचे मूल्यमापन करून त्या वस्तुस्थितीबद्दल यथार्थ मत देण्यासाठी मदत करू शकेल अशी नवी बौद्धिक संकल्पना वा हत्यार या विचारसरणीला तयार करता आलेले नाही. "वर्गीय" संकल्पनेची जागा घेऊ शकेल

अशी नवी बौद्धिक कसोटी म्हणा किंवा संकल्पनात्मक चौकट म्हणा; डाव्यांच्या हाती न आल्याने त्यांची सगळी वादविवाद प्रक्रियाच थंडावली आहे. डाव्यांच्या बौद्धिक चर्चेची काही ठाम लक्षणे होती. काही विशिष्ट तात्त्विक अमूर्त संकल्पना आणि कम्युनिस्ट पक्षात काम करणाऱ्यांव्यतिरिक्त बाहेरच्यांना ज्या भाषेचा कधी अर्थबोध होणेच शक्य नाही अशी अनुषंगिक भाषा, या दोन घटकांवर डाव्यांची बहुतेक सगळी चर्पटपंजरी आजवर अवलंबून असल्याने हा सरंजाम गमावला जाताच किंवा हे कातडे गळून पडताच वादविवादाच्या क्षेत्रात त्यांची मोठीच पंचाईत झाली आहे. या जातीच्या कृत्रिम क्लुप्त्या वापरता न येणे याचा अर्थ बौद्धिक दृष्ट्या नागवे बनण्यासारखेच होते. डाव्यांचे या क्षणी हेच झाले आहे. ज्या अमूर्त संकल्पनांच्या आणि कोंगाडी भाषेच्या (जार्गन, लिंगो) जोरावर डावे आपली बौद्धिके चालवित असत ती दोन्ही हत्यारे आता कामातून गेली आहेत. त्या हत्यारांची जागा घेऊ शकेल असे नवे हत्यार त्यांना तयार करता आलेले नाही. या अशा प्रकारच्या क्लुप्त्यांची मदत न घेताच 'प्रवचन' देणे किंवा पोपटपंची करणे डाव्यांना कधी जमले नाही. तथाकथित 'भारदस्त' शद्बप्रयोगांशिवाय सार्वजनिक महत्त्वाच्या प्रश्नांवर 'प्रवचन' देणे किंवा भाष्य करणे हे डाव्यांना अब्रू झाकण्यासाठी कसली-तरी फाटकीतुटकी वस्त्रावरणे पेहनावीत तसे आजवर वाटत आले आहे; किंवा आला प्रसंग कसातरी साजरा करावा, काहीतरी करून वेळ मारून न्यावी तसे वाटत आले आहे. थोडक्यात पोरकटपणा वाटत आला आहे. डावे आजवर इतरांना हिणवीत असत की, त्यांच्यापाशी भक्कम तत्त्वज्ञान नाही, आमच्यापाशी ते आहे; आमची विचारसरणी शास्त्रशुद्ध आहे. परंतु आज मात्र काळ पालटला आहे.

आजवर डावे वगळता इतर सर्वजण 'नंगे बादशहा' होते, कारण त्यांच्यापाशी तात्त्विक संकल्पना नव्हत्या; वादविवादाची स्वत:ची खास भाषा नव्हती; शास्त्र नव्हते. परंतु या क्षणी मार्क्सिस्ट बादशहा नंगा ठरला आहे. मार्क्सवादी बादशहाच्या अंगावर कपडे नाहीत. आणि ज्याच्या जननेंद्रियापासून इतिहास, राजकारण आणि अर्थव्यवस्था या तिन्ही ज्ञानशाखांचा नवा नवा अर्थ लावू पाहाणारे, 'शास्त्रशुद्ध' आकलन देऊ शकणारे संप्रदाय जन्माला आले ते इंद्रिय सुकून गेले आहे, त्याचा पाचोळा बनला आहे. सारांश, एक संपूर्ण शतकभर सुरू असलेल्या प्रचंड बौद्धिक उद्योगाच्या अखेरच्या पर्वापाशी आपण येऊन ठेपलो आहोत. मात्र यात दुर्दैवाची गोष्ट ही आहे की, खुद्द डाव्या विचारसरणीला याची जाणीव झाल्याचे आढळत नाही. कारण जगात एवढे मोठे रामायण घडून गेले असले तरी, आपल्या सैद्धांतिक भूमिकेमध्येच काहीतरी गफलती असल्या पाहिजेत, काही त्रुटी, उणिवा, चुका असल्या पाहिजेत; आपला लौकिक व्यवहार कोठेतरी रूळावरून घसरला गेला असला पाहिजे; आपली तात्त्विक वचने; आपण दिले ते नारे; घोषणा यात मूळातच काहीतरी खोटेपणा व फसवणूक दडवून असली पाहिजे; बहात्तर रोगांवरचे एकमेव जालीम औषध म्हणून जी जडीबुट्टी आजवर आपण खपवीत होतो ,ती टाकून देऊन त्या जडीबुट्टीऐवजी एखादे

नवे प्रामाणिक औषध हाती घेणे आवश्यक आहे; यापैकी कशाचीही जाणीव डाव्यांना झाली असल्याचे एकही चिन्ह दिसत नाही.

कशावरून? त्याचे दोनतीन सुस्पष्ट पुरावे आहेत. या क्षणी डावे दुसरे काही करण्याऐवजी मार्क्सविद्येवरची जुनीच क्रमिक पुस्तके पुर्नमुद्रित करण्यात दंग आहेत; आणि समाजशास्त्र किंवा राज्यशास्त्र घेऊन जे विद्यार्थी विद्यापीठात अभ्यास करताहेत त्यांच्या माथ्यावर ती पुनर्मुद्रित पुस्तके न थकता आदळीत आहेत. दुसरी गोष्ट अशी की, विद्यापीठातील ज्या ज्ञानशाखा नव्या ज्ञानाच्या बाबतीत पूर्णपणे सुस्तावलेल्या आहेत, त्याही ज्ञानशाखा मार्क्सविद्येला मात्र एक अद्यावत ज्ञान म्हणून उचलून धरण्यात व्यग्र आहेत. पूर्व युरोपमध्ये मार्क्सवादाला सोडचिठी दिली गेली आहे याची गंधवार्तासुद्धा या पंडितांना नसावी असे त्यांचे वागणे दिसून येत आहे. विद्यापीठाच्या अभ्यासक्रमात आजदेखील मार्क्सविद्येला जुनेच स्थान दिल्याचे दिसून येत आहे. सारांश बौद्धिक दृष्टीकोनातील सुसूत्रता आणि नैतिक बांधिलकी या दोन गोष्टी विद्यमान डाव्यांमध्ये तर जवळपास लोपच पावल्या आहेत. दुर्दैवाची गोष्ट ही की, अशा प्रकारच्या बौद्धिक पोकळीमुळे समाजाचे नुकसान होत असते. समाजात बौद्धिक पोकळी उत्पन्न होणे हे चांगल्याचे लक्षण नव्हे. एका बाजूला बौद्धिक पोकळी, तर दुसऱ्या बाजुला जुन्याच तात्त्विक भूमिका सांभाळण्यासाठी केले जाणारे आटोकाट प्रयत्नसुद्धा नजरेस पडताहेत. खरे तर जुन्या भूमिका नव्याने पारखून घेतल्या जाणे, विशेषत: सार्वजनिक रित्या पारखून घेतल्या जाणे आजच्या घटकेला अत्यंत आवश्यक असूनदेखील यापैकी काहीही घडताना दिसत नाही. खरे दुर्दैव यात आहे.

अपेक्षा अशी होती की, आपल्या जुन्या तात्त्विक भूमिका डावे पुन्हा एकदा नव्याने पारखून घेण्याचा प्रयत्न करतील. परंतु ती गोष्ट राहिली बाजूलाच. त्या ऐवजी **डावीकडे आणि उजवीकडे,** संपूर्ण पश्चिम युरोपभर डाव्यांनी नाना प्रकारच्या बाष्कळ बौद्धिक हुलकावण्या सुरू केल्याचे दिसून येत आहे. इकडे पलटी घे, तिकडे पलटी घे जमेल तेथे मार्क्सवादी तत्त्वप्रणालीचा (आयडिऑलॉजिकल) खोटा गुंता तयार कर, असे उद्योग सुरू आहेत. कोणाचे उद्योग? तर एके काळी स्वत:च्या सैद्धांतिक भूमिकेबद्दल आपली भूमिका शंभर टक्के शास्त्रशुद्ध आहे म्हणून जबर आत्मविश्वास बाळगणाऱ्या डाव्या बुद्धिमंतांचा हा खाक्या सुरू आहे. या महाभागांपैकी जे कुणी प्रस्थापित कम्युनिस्ट होते किंवा जे कुणी जुन्या आठवणींमध्ये दंग झाले आहेत त्यांची अवस्था तर अगदीच बिकट बनली आहे. कारण एके काळी ज्या संघटनांमध्ये ते काम करीत होते किंवा अशी वा तशी ज्यांची ते री ओढीत असत, त्या संघटना आज मोडीत निघाल्या आहेत. किंवा त्यांची छोटी छोटी शकले उडाली आहेत. किंवा त्यांचे रूपांतर होऊन त्यातून लोकशाही समाजवादी पक्ष निर्माण झाले आहेत. आणि ही दारूण स्थिती या सर्वांना स्वत:च्या डोळ्यांनी पहावी लागत आहे. (फ्रान्स, ब्रिटन, इटली, पश्चिम जर्मनी या देशातील) ज्या कोणाला

कालपर्यंत आता लवकरच जगभर समाजवादी रामराज्य अवतरणार आणि त्या राज्यातील राज्यकर्त्या वर्गामध्ये आपण सामील होणार असे खात्रीपूर्वक वाटत होते, त्यांच्या त्या आशा आज पार धुळीला मिळाल्या आहेत. अन्य जे कुणी आरामखुर्चीत बसल्या बसल्या बौद्धिक चातुर्य दाखविण्यात धन्यता मानीत होते आणि ज्यांच्या आशाआकांक्षा त्या मानाने अत्यंत माफक होत्या त्यांना त्यांच्या अभ्यासविषयाचा पायाच धुळीस मिळाल्याचे जाणवू लागले आहे.

या संपूर्ण प्रकरणाकडे जर का कोणी अत्यंत बारकाईने पाहिले तर, त्याला एकीकडे व्यक्तिगत शोकांतिका दिसून येतील तर, दुसरीकडे वैचारिक बजबजपुरी आढळून येईल. व्यक्तिगत शोकांतिका या अर्थाने की, एकेकाळी ज्यांच्याबद्दल असे वाटत होते की, ही मंडळी जीवनात काहीतरी भरीव कार्य करून दाखवतील, त्यांचेच आयुष्य पूर्णपणे व्यर्थ गेल्याचे दिसून येत आहे. माझ्या मताच्या पुष्टीसाठी मी ब्रिटनमधल्या तरुण डाव्या बुद्धिमंतांचे उदाहरण घेईन. हे सगळे मार्क्सवादी कालबाह्य ठरलेल्या रिव्हिजनिझमकडे – अधिकृत मार्क्सवादाच्या तथाकथित सुधारित आवृत्तीकडे परत वळले आहेत. (रिव्हिजनिझम : मार्क्सच्या सिद्धांताचा सुधारित आणि नव्या दृष्टीकोनानुसार लावला गेलेला अर्थ. मार्क्सवादाला ही नवी वैचारिक कलाटणी सर्वात प्रथम कार्ल काउत्स्की (१८५४ – १९३८) या जर्मन झेकोस्लोव्हाक मार्क्सिस्ट – सोशॅलिस्ट डेमॉक्रॅटने दिली होती.) गंमत म्हणजे एवढे कमी होते म्हणून की काय या तरूण ब्रिटिश मार्क्सवाद्यांनी आपल्या विचारसरणीला 'पॉप – संस्कृती' आणि 'गे–संस्कृती' या दोन संस्कृतीचे शेपूट जोडून दिले. (पॉप अँड गे कल्चर : पॉप्युलर कल्चर. उच्चवर्गीयांच्या तुलनेत खालच्या वर्गातील लोकांची संगीत, कला इत्यादींविषयीची, संस्कृती. गे–कल्चर. इंग्लंड व अमेरिकेत 'गे' ही संज्ञा पायुवाजांना वापरतात. 'गे' म्हणजे प्रॅक्टिसिंग, होमोसेक्स्चुअल्स). वर उल्लेख केलेल्या ब्रिटिश बुद्धिमंतांना आजवर कधी शारीरिक श्रमाच्या कामाबद्दल आदर वाटत नसे, तो अशा प्रकारे अलीकडे एकाएकी वाटू लागला आहे.

कष्टाच्या कामात त्यांना जणू नव्या सद्गुणांचाच साक्षात्कार आज होत आहे. 'मार्क्सिझम टुडे' या मासिकाच्या धर्तीवर ही सर्व मंडळी अलीकडे असे भासवू पाहात आहेत की मार्क्सवाद, पॉप–संस्कृती आणि गे–संस्कृती या सर्वांची त्यांनी केलेली भेळ हीच उद्याच्या डावेपणाची खरी सामुग्री होय. पूर्व युरोप आणि सोव्हिएट युनियनमधे मार्क्सवादाची जी दुर्दशा झाली त्यानंतर निर्माण झालेल्या एका मार्क्सवादी गटाची ही हकिकत. असाच आणखीसुद्धा दुसरा एक गट आहे. पहिल्या गटाच्या मानाने हा गट तसा लहान आहे. परंतु असा गट आहे हेही तितकेच खरे आहे. या दुसऱ्या गटाची भूमिका वरील गटापेक्षा सर्वस्वी भिन्न आहे. पहिल्या गटाला असे वाटते की, मार्क्सवादी विचारसरणीच्या बाबतीतील आजवरची संकुचित व कर्मठ भूमिका टाकून देऊन मार्क्सवादाला अधिक व्यापक बैठक द्यावी – तळागळातले का होईना पण जास्तीत जास्त लोक मार्क्सवादी विचाराकडे आकर्षित करून घ्यावेत. मूळ

सिद्धांतसूत्रांमध्ये पाणी घालून ती पातळ करून पाहावे. उलट दुसऱ्या गटाची भूमिका मूळ सिद्धांतसूत्रे पूर्वीपेक्षाही अधिक कर्मठ बनावीत; सिद्धांतसूत्रांच्या बाबतीत जास्तीतजास्त आक्रमक भूमिका घ्यावी अशी आहे. या दुसऱ्या गटाला असे वाटते की, ''सैद्धांतिक आक्रमकपणामुळे'' कामगारवर्ग जास्त प्रमाणात आपल्याकडे आकृष्ट होईल व तसा तो आकृष्ट झाला की, 'कामगारवर्गाला' संघर्षाला जुंपता येईल. सारांश, मार्क्सवादातले निरनिराळे गट नव्या परिस्थितीमुळे इतके संभ्रमित झाले आहेत की, काय करावे, कोठे जावे हेच त्यांना कळेनासे झाले आहे. आताच वर पाहिले त्याप्रमाणे काहींना वाटते की, आपण सामान्य जनतेसारखे व्हावे आणि जनतेला आकृष्ट करावे. आणखी काहींना वाटते की, ही क्लृप्ती तितकीशी फायद्याची नाही. आपण आपली 'जुनीच श्रद्धा' अधिक प्रखरपणे झुंजवावयास हवी, जास्तीत जास्त सिद्धांतवादी बनावयास हवे म्हणजे 'कामगारवर्ग' आपल्या बाजूला वळेल व 'संघर्षाला' उद्युक्त होईल.

मार्क्सविद्येचे तारू दारूण वस्तुस्थितीच्या खडकावर फुटल्यानंतर मार्क्सवाद्यांचे काय हाल होत आहेत ते दोन गटांच्या बाबतीत आताच आपण पाहिले. असाच प्रकार इतरही मार्क्सवादी गटांच्या बाबतीत घडत आहे. मार्क्सविद्येच्या पठडीतला प्रत्येक गट जे काही घडले आहे ते जणू आपल्या गावीच नाही, आपणाला त्याची फारशी झळ लागलेली नाही, असे दाखविण्याच्या प्रयत्नात आज व्यग्र आहे. त्यामुळे मार्क्सवाद्यांपैकी काहीजण अलीकडे ''पर्यावरणवादी'' बनले आहेत. अर्थात मनापासून नाही तर, एक सोयीस्कर मुखवटा म्हणून. करणे जे आडात नाही ते पोहऱ्यात कोठून येणार? आजवर संपूर्ण आयुष्य 'वर्गसंघर्ष एके वर्गसंघर्ष' हा मंत्र घोकण्यात गेल्यानंतर एका सकाळी अवचितपणे कोणी 'पर्यावरणवादी' बनणार तरी कसा? 'पर्यावरणवाद' म्हणजे सृष्टीबद्दलची माणसाला वाटणारी जबाबदारी. ही जबाबदारी एका रात्रीत उत्पन्न होणे शक्य नाही. असो. ज्या मार्क्सवाद्यांना ही बतावणी जमू शकली नाही ते डाव्या रंगमंचावरून एकाएकी अदृश्य बनले आहेत. या सर्वांना पक्षामध्ये काही काम उरले नव्हते आणि प्रतिष्ठाही उरली नव्हती. आणि हा अपमान सहन न झाल्याने त्यांनी सरळ डाव्या चळवळीतून अंग काढून घेतले होते.

संभ्रमित मार्क्सवाद्यांमध्ये काही थोडे माजी सरकारी समाजवादीसुद्धा आहेत. या माजी सरकारी-समाजवादयांना 'कसबी कामगारांच्या सुखी गोकुळाचे स्वप्न' पुन्हा एकदा खुणावू लागले आहे. त्यांची कल्पना अशी की, सध्याच्या आपत्तीवर मात करण्यासाठी आपण छोट्या वसाहती, छोटे उद्योग, उद्योगधंद्यांचे विकेंद्रीकरण, स्थानिक उद्योगधंदे इत्यादी उपाय अवलंबिणे आवश्यक आहे. छापील आणि यंत्रावरचे मोठ्या प्रमाणातील उत्पादन (व त्याच्याशी संबंधित श्रमजीवी किंवा कामगार) बाजूला सारून त्यांच्या जागी वरील उपाययोजना जारी केली की समोरची आपत्ती दूर होईल; परंतु हे म्हणजे अकलेचे दिवे पाजळणेच होय. हा ''फोर्ड-पश्चातवाद'' अस्तित्वात येण्याची शक्यता नाही. कारण तो कल्पनारंजित आहे. का कल्पनारंजित आहे? कारण



अनुक्रमणिका

हे की, हा उपाय सुचविणाऱ्या मंडळींच्या स्वप्नातील कसबी आणि सर्जनशील कामगार उत्पादन प्रमाणाच्या बाबतीत फोर्ड–जमान्यानंतरच्या कामगाराची बरोबरी कधीच करू शकणार नाही. एका शब्दात कामगारांच्या छोट्या वसाहतींचे स्वप्न रंगविणाऱ्या मार्क्सवाद्यांचा तथाकथित सर्जनशील कामगार हा काही झाले तरी वीर स्टाक्नोव्हाइटची केवळ अर्धवट नक्कलच असू शकतो. (ॲलेक्सी स्टाकानोव्ह. एक रशियन कामगार. कामगाराचे वैयक्तिक उत्पादन जास्तीत जास्त निघाले पाहिजे या दृष्टीने १९३५ मधे रशियात एक चळवळ सुरू करण्यात आली होती व ॲलेक्सी स्टाकानोव्ह या कामगाराने त्या चळवळीत आपला आदर्श प्रस्थापित केला होता. स्टाकानोव्ह हा कोळशाच्या खाणीतला कामगार होता. कोळसा खणून काढण्याच्या नव्यानव्या पद्धती वापरून आणि खाणीत जास्तीत जास्त खपून त्याने कोळसा खणून काढण्याचा विक्रम प्रस्थापित केला होता.) असो. एकूण प्रकार हा असा आहे. सर्वात गमतीची गोष्ट ट्रॉटस्कीवाद्यांची. ट्रॉटस्कीवादी म्हणजे ढोंगी मार्क्सवादी. आपली मूलभूत भूमिका नि प्रवृत्ती स्वातंत्र्यावाद्यांची आहे असे ट्रॉटस्कीवादी भासवितात. त्यांना वाटते की, पूर्व युरोपमध्ये आज ज्या राजकीय क्रान्त्या घडून येत आहेत त्या 'स्टॅलिनवादाच्या' आणि 'स्टॅलिनवादी पक्षाच्या' आहेत आणि त्याच कारणाने त्या ''ट्रॉटस्कीवादी'' भूमिकेच्या बाजूच्या आहेत. त्यांचे तर्कशास्त्र पुढीलप्रमाणे आहे. ट्रॉटस्कीवादी कम्युनिस्ट 'स्टॅलिनवादी कम्युनिस्टां'च्या विरोधी आहेत. तेव्हा जे कोणी स्टॅलिनवादी कम्युनिस्टांच्या विरोधी ते केवळ तेवढ्याच कारणाने ट्रॉटस्कीवादी कम्युनिस्टांच्या बाजूचे ठरतात. हा युक्तिवाद म्हणजे हास्यास्पदतेचा कळसच होय. या महाशयांच्या ध्यानात येत नाही की, आज जे काही चालले आहे ते केवळ स्टॅलिनवादाच्या विरुद्धच चालले आहे असे नाही; तर लक्षावधी कामगारांना स्टॅलिनवादच नव्हे, तर ज्या ज्या कशाला समाजवादी अपयशाचा पुसटसा वासही येत असेल ते ते सर्व मोडित काढायचे आहे. कामगारांचा रोख समाजवादाच्या अपयशावर आहे. ट्रॉटस्कीवादी आणि त्यांच्याच जातकुळीचे समाजवादी हे मान्य करीत नाहीत याचा साधा अर्थ असा की, समाजवादाच्या बाबतीत आज जे काही घडत आहे त्याचे श्रेय ज्याचे त्याला म्हणजेच सामान्य जनतेला द्यावे असे त्यांना वाटत नाही.

डाव्यांच्या बौद्धिक गोंधळाचा पुरावा म्हणून 'द न्यू लेफ्ट रिव्ह्यू' या नियतकालिकाइतके अन्य दुसरे चांगले उदाहरण क्वचितच कुठे सापडेल. ( न्यू लेफ्ट रिव्ह्यूची पूर्वपीठिका लक्षात घेण्यासारखी आहे. हंगेरीत १९५६ साली रशियन साम्राज्यशाहीच्या विरूद्ध प्रचंड उठाव झाला. तो दडपून टाकण्यासाठी रशियाने रणगाडे वापरले. मोठ्या प्रमाणावर मनुष्ये ठार मारली. त्याचा निषेध म्हणून ब्रिटिश कम्युनिस्ट पक्षातील एक तृतियांश सदस्यांनी सदस्यत्वाचा राजीनामा दिला. तथापि या सदस्यानी कम्युनिस्ट पक्षाचा त्याग केला होता तरी, मार्क्सवादाचा त्याग केला नव्हता. कम्युनिस्ट पक्षाचा त्याग करणारांमधीलच काही विचारवंतांनी कित्येक नियतकालिके सुरू केली होती. 'न्यू रिझनर' हे त्यापैकी एक. 'युनिव्हार्सिटी लेफ्ट रिव्ह्यू' हे दुसरे.



अनुक्रमणिका

कालांतराने ही दोन्ही नियतकालिकं एकत्र झाली व त्यातून 'न्यू लेफ्ट रिव्हयू' जन्मास आले. भारताचे वैशिष्ट्यच हे की, असे काही येथे घडले नाही. कम्युनिस्ट पक्षातून राजीनामा देऊन कोणीही बाहेर पडला नाही. कै.धों.वि.देशपांडे व त्यांच्यासारख्या अनेकांनी हंगेरीतल्या उठावाशी आपल्याला कर्तव्य नाही व म्हणून त्या घटनेकडे दुर्लक्ष करावे असे प्रतिपादन केले होते. याच काळात ना.ग.गोऱ्यांना नाजी गोरे म्हणण्यात आले. (हंगेरीत रशियनांनी ठार केलेल्या नेत्यांमध्ये इम्रनाज हे पंतप्रधान होते. तेव्हा ना.ग.गोरे यांच्याविरुद्ध प्रचार करताना ना.ग.चे नाजी केले गेले.) सध्या 'न्यू लेफ्ट रिव्हयू' बचावात्मक पवित्र्यात आहे. एकेकाळी 'न्यू लेफ्ट' रिव्हयूची भूमिका बचावात्मक नव्हती. 'न्यू लेफ्ट रिव्हयू'ची भूमिका जरी बचावात्मक असली तरी, या जगातील सर्वच्या सर्व विषय आपणाला पूर्णपणे कळतात आणि कोठलीही घटना प्रत्यक्ष घडण्यापूर्वी तिचे ज्ञान आपणाला असते हा आपला नेहमीचा हास्यास्पद पवित्रा या नियतकालिकाने टाकून दिलेला नाही. समाजवादी विचारसरणीचा बोजवारा उडाला आहे, ही गोष्ट संपादक महाशयांना स्पष्टपणे दिसत आहे. कोठल्याही शहाण्या मनुष्याने ते स्वत: होऊन कबूलही केले असते. परंतु 'न्यू लेफ्ट रिव्हयू' ते कबूल करणार नाही. अर्थात या अडचणीतून स्वत:ला बाहेर काढण्यासाठी 'न्यू लेफ्ट रिव्हयूने' युक्ती काढलेली नाही, असे नाही. त्यांनी युक्ती काढलीच आहे 'न्यू लेफ्ट रिव्हयू' असे भासवू पाहाते की ज्या कोणाला मार्क्सविद्येची मूलभूत आणि प्रारंभिक तत्त्वे व्यवस्थित माहीत होती त्यांना डाव्या चळवळीचे पुढे काय होणार हे आधीपासून सांगता आले असते. (याला म्हणतात दुरदर्शीपणा. काहीही घडून येवो. न्यू लेफ्ट रिव्हयू हे नियतकालिक ज्ञानवंत खरे; परंतु ज्ञान त्यांना विशिष्ट प्रसंग घडून गेल्यानंतर होत असते, तो प्रसंग घडण्याच्या आधी नाही. न्यू लेफ्ट रिव्हयू म्हणजे सावध पत्रकारितेचा आदर्श नमुनाच की!) 'सोहो'च्या ('सोहो' हा लंडनचा एक भाग. या भागात 'न्यू लेफ्ट रिव्हयू'ची कचेरी आहे ) सज्जातून अखिल भूतलाची पाहणी करताना आणि संपूर्ण जागातिक परिस्थितीचा आढावा घेताना संपादकमहाशयांना 'पश्चिमी कृतींमध्ये' साम्राज्यवादाची लक्षणे भासमान होतात. तसेच पूर्व युरोपमध्ये आणि सोव्हिएट संघराज्यात समाजवादाचे पुनरुज्जीवन घडून येणार आणि 'वर्ग संघर्षसुद्धा' सुरू होणार असेही त्यांना जाणवते. एका अंकात याच नियतकालिकाने अगदी पूर्ण ''वेगळी'' भूमिका घेतल्याचेही माझ्या नजरेस पडले आहे. कारण या अंकात हे नियतकालिक 'समाजवादी लोकशाही' किंवा 'लोकशाहीवादी समाजवादाच्या' प्रेमात पडल्याचे दिसते. तेव्हा असे म्हणावेसे वाटते की 'द न्यू लेफ्ट रिव्हयू' ची शैली आणि बहिरंग यात जरी सातत्य राखलेले दिसत असले तरी अंतरंगाच्या बाबतीत सगळा बौद्धिक गोंधळ उडाला आहे. समाजवादाला एवढे प्रचंड अपयश का आले याचा चारी अंगानी विचार करणे न्यू लेफ्ट रिव्हयूच्या ताकदीबाहेरचे काम आहे. मुख्य म्हणजे इतकी वर्षे संपादक म्हणून आपण चूक करीत होतो हे स्वत:शी कबूल करणे हेच मुळात त्यांना जमण्यासारखे नाही.

येथे गॅलिलिओ या विख्यात खगोलशास्त्रज्ञाची आठवण होते. गॅलिलिओ म्हणत होता की पृथ्वीभोवती सूर्य फिरतो हे मत चूक असून सूर्याभोवती पृथ्वी फिरते हे मत बरोबर आहे. सत्य गॅलिलिओच्या बाजूला होते. परंतु ख्रिस्ती धर्ममार्तंड गॅलिलिओच्या विरुद्ध होते. या धर्ममार्तंडांनी गॅलिलिओवर दडपण आणताच त्याने एकदम घुमजाव केले. मार्क्सवाद्यांवर असे दडपण कोणीच आणलेले नाही. दडपण आहे ते वस्तुस्थितीचे. वस्तुस्थिती किंवा सत्य त्यांच्या विरोधात गेले आहे. मार्क्सवादी स्वत:ला प्रबोधन आणि ज्ञानयुगाचे वारस म्हणवून घेत असतात. तेव्हा त्यांनी सत्य काय ते बोलून दाखववायास हवे होते. परंतु ते न करता त्यांनी मौन धारण केले असून अशा प्रकारे ते सत्याचा गळा घोटू देत आहेत. प्रा. ख्रिस्तोफर हिल आणि इ. पी. थॉम्पसन, एरीक हॉक्स्वॉम आणि पेरी अँडरसन ही मार्क्सविद्येच्या क्षेत्रातील फार मोठी माणसे. मार्क्सविद्येवरचे मातव्बर भाष्यकार तेव्हा क्रांती, सामाजिक वर्ग, साम्राज्य इत्यादी विषयांवरील त्यांचे मौलिक विचार बदललेल्या परिस्थितीत त्यांनी खरे तर बोलून दाखववायास हवेत. अनेकांना ते ऐकावयास आवडले असते. प्रा. ख्रिस्तोफर हिल म्हणजे ब्रिटिश इतिहासाचे गाढे अभ्यासक. क्रॉम्वेल आणि इंग्लीश क्रांती या विषयातील तज्ज्ञ. तीच गोष्ट एरिक हॉब्स्वॉम यांचीसुद्धा. ते व्यासंगी अर्थशास्त्रज्ञ आणि इतिहासकार. पेरी अँडरसन हेही वरील दोघांच्या तोडीस तोड असे विद्वान. साम्राज्यवाद अणि अर्थकारणावरचे त्यांचे लिखाण खूपच प्रसिद्ध आहे. भरीस ते 'द न्यू लेफ्ट रिव्हयू'चे कार्यकारी संपादक सुद्धा आहेत. चवथे इ. पी. थॉम्पसन. हे देखील मार्क्सवादी थोर विचारवंत. इंग्लंडमधील कामगारवर्ग आणि कामगारवर्गाच्या चळवळी यावर ते सातत्याने लिखाण करीत असतात. तेव्हा क्रांती, वर्ग, साम्राज्य इत्यादी विषयावर आता त्यांनी भाष्य करणे आवश्यकच आहे. परंतु प्रश्न असा आहे की असे भाष्य आता ते करणार आहेत काय? माझी खात्री आहे की यापैकी काहीही ते करणार नाहीत, किंवा जर काही भाष्य त्यांनी केले तर ते जुजबी असेल. 'हिस्टरी टुडे' या मासिकाच्या एप्रिल'९१ च्या अंकात 'मार्क्सविद्येची सध्याची अवस्था' या विषयावर ख्रिस्तोफर हिल यांनी एक लेख लिहिला आहे. त्यात त्यांनी 'मार्क्सवाद्यांच्या जंतरमंतर भाषेबद्दल' स्वत:चे मत प्रगट केले आहे. ही भाषा त्यांना आता गैरलागू वाटू लागली आहे. मात्र तसे असले तरी सतराव्या शतकातील इंग्लंडबद्दलच्या त्यांनी धारण केलेला जो 'मार्क्सवादी दृष्टीकोन' त्याच्यापासून ते 'फार दूर' गेले आहेत अशातला भाग नाही. 'मार्क्सवादी' या शब्दाभोवतीची अवतरणचिन्हे त्यांच्या एकूण भूमिकेबद्दल खूप काही सांगू शकतील. खरे पाहता पूर्व युरोप आणि सोव्हिएट संघराज्य या दोन्ही ठिकाणी जे काही घडत आहे त्याचा विचार करता 'डाव्या भूमिकेच्या बौद्धिक दृष्टीकोनात' फार मोठे बदल होऊ घातले आहेत असे जाणवते. परंतु डाव्या विचारवंतांपैकी फारच थोड्यांना हे कबूल होईल. बहुतेकजण हे मान्यच करू इच्छित नाहीत. आज घडले आहे ते असे. एकेकाळच्या सगळ्या जादूगार प्रास्पेरोमहाशयांनी स्वत:जवळची होती नव्हती ती कामचलावू मार्क्सवादी

जादू टाकून दिली असून जादूच्या काड्या जमिनीत पुरून टाकल्या आहेत. मात्र तुम्हाला ते कधीच माहीत होणार नाही. कारण स्वत: होऊन त्यांच्यापैकी एकहीजण ते बोलून दाखविणार नाही.

ॲडम स्मिथ (स्कॉटिश अर्थशास्त्रज्ञ १७२३–९०), डेव्हिड रिकार्डो (मुक्त अर्थव्यवस्थेचा पुरस्कार करणारा ईंग्लिश अर्थशास्त्रज्ञ. १७७२–१८२३), मॅक्स वेबर (जर्मन समाजशास्त्रज्ञ १८६४–१९२०), फर्नांड ब्रॉडेल (फ्रेंच इतिहासकार) यांच्यापासून ते फ्रेडरिख फॉं हायेक (आस्ट्रियन–ब्रिटिश अर्थशास्त्रज्ञ या सगळ्या बिगरमार्क्सवाद्यांचे आणि प्रतिमार्क्सवाद्यांचे म्हणणे आज खरे ठरले आहे. ट्रिएरवासी म्हातारबुवांनी (कार्ल मार्क्स) प्रसृत केलेल्या सत्यांपेक्षा या मंडळींनी शोधून काढलेली सत्ये अधिक सखोल, अधिक प्रगाढ, आकलनशक्ती वाढविणारी, कमी साचेबंद, अधिक लवचिक आणि जास्त टिकाऊ ठरत आहेत. एक काळ असा होता की, जेव्हा आम्हा सर्वांना वाटत होते की अथांग आकलनाच्या नंदनवनाच्या दरवाजाची कावालिस्टिक किल्ली किंवा जादूची किल्ली मार्क्सवादाच्या या म्हातारबुवांपाशी आहे. प्रत्यक्षात शेवटी असे दिसून आले की म्हातारबुवांनी देऊ केलेली विद्या हे शास्त्र नव्हते आणि विज्ञानही नव्हते. ती केवळ जादूगारांची किमया होती. अंधारातून प्रकाशाकडे घेऊन जाणारा रस्ताही तो नव्हता, उलट प्रकाशाकडून तो रस्ता तुम्हाला अंधाराकडे घेऊन जात होता. (आणि कित्येकांच्या बाबतीत तर मनाच्या आजारपणाकडे घेऊन जाणारा तो रस्ता होता.) एके काळची स्वर्गातली बाग आज तुच्छतेला, दारुण अवहेलनेला प्राप्त झाली आहे. अर्थात त्यात काही चूक आहे असे नाही. कारण मार्क्सविद्येच्या चावीमुळे जे पदरात पडले होते ते ज्ञान नव्हते, ज्ञानाचा तो केवळ आभास होता. निव्वळ बौद्धिक लकाकी.

मार्क्सविद्येने स्वत:च्या चेल्यांना किती मोठमोठी आश्वासने दिली होती ती पाहा : तंत्रविज्ञानाच्या तत्त्वज्ञानाची आणि उत्पादनाच्या इतिहासाची किल्ली आपण देत आहोत असे आश्वासन मार्क्सवादाने दिले होते. मानवी दुरावा आणि मानवी स्वभाव उलगडून दाखविणारी परंतु प्रत्यक्षात शहाण्यांना मूर्ख बनविणारी उपपत्ती वा प्रतिउपपत्तींचे वचनही तेथे देण्यात आले होते. म्हटल्यास कसल्याही प्रसंगात कामास येणारे वा कसल्याच प्रसंगात कामास येण्याची शक्यता नसलेले "दुतोंडी वाद-प्रतिवादात्मक" 'अंतर्विरोधनामक' चटपटीत अतिभौतिकशास्त्राचे– असे अतिभौतिकशास्त्र की वेळप्रसंगी ज्याचा गैरवापर केला जाऊ शकत होता – आश्वासनही तेथे होते. या अतिभौतिकशास्त्राच्या जोरावर जगातील सगळी रहस्ये तुम्ही उलगडू शकता किंवा कोठलेच रहस्य उलगडता येत नाही.

फार कशाला यांच मार्क्सविद्येने आपल्या चेल्यांसाठी त्याच वेळी इतिहासाचा जणू पाया, सृष्टीचे जणू आदिकारण व कारणांचे कारण, प्रश्न आणि उत्तर जेथे एकत्र आहेत अशी जागतिक 'संघर्षाची' एक नैतिक बोधकथासुद्धा सादर केली होती. भरीत भर

म्हणून की काय (ग्रीक नाटकांमध्ये कथानकाचा गुंता सुटत नाही असं दिसताच आकाशातून देव खाली उतरून तो गुंता सोडवतात अशी क्लृप्ती वापरण्यात येत असे त्या धर्तीवर) भक्तीभावाने आम्हाला हात जोडता यावेत म्हणून एका बाजूला शोषित श्रमजीवी, मध्ये सर्वशक्तीमान परमेश्वर आणि दुसऱ्या बाजूला श्रमजीवींचा उद्धार करणारा तारणहार असेही उत्तर मार्क्सविद्येने मेहरबानी म्हणून आम्हाला पेश केले होते. सध्या मार्क्सविद्या अडचणीत आहे. त्या अडचणीवर मात करण्यासाठी मार्क्सविद्येच्या भक्तांनी अलीकडे एक नवी क्लृप्ती शोधून काढली आहे. तिचाही उल्लेख येथे करावयास हवा. ही क्लृप्ती अशी. खुद्द मार्क्सवादाच्याच समग्र वाङ्मयातून पोस्ट–मॉडर्निस्ट किंवा अतिअद्यावत रंग घेऊन मार्क्सवादाला चकाकी आणण्याचे प्रयत्न करणे. उदा. अलीकडे असे भासविले जात आहे की खुद्द स्वत: मार्क्स हा उदारमतवादी, संशयखोर आणि हाडाचा मूर्तिभंजक असल्याने स्वत:चे उच्चाटण त्याला खुपले नसते. हा प्रसंग त्याने हासत स्वीकारला असता या म्हणण्यात अर्थातच काहीही तथ्य नाही. मार्क्सवाद्यांनी चालविलेल्या अनेक बतावण्यांपैकी ती एक बतावणी आहे इतकेच.

मार्क्सवादाची अब्रू वाचविण्यासाठी मार्क्सवादाच्या भक्तानी हे जे सगळे वहाणे चालविले आहेत त्याच्या कडे लक्ष देण्याचे वास्तविक काहीही कारण नव्हते. परंतु मार्क्सवाद्यांनी बोलायचे थांबविल्यामुळे आपले बौद्धिक जीवन पांगळे बनत असल्याने आपणाला बोलावे लागत आहे. लज्जा रक्षणासाठी डाव्यांनी धारण केलेले वर्ग–कल्पनारूपी पिंपळाचे पान निसटून खाली पडल्याने–कला, वाङ्मयीन वाद, इतिहासलेखन इ.इ. अनेक बौद्धिक श्रेत्रातील फार मोठा प्रदेश उजाड बनला आहे. आज बाद झालेली विचारप्रणालीच्या रूपातील भरंवशाची सत्ये अणि नैतिक बोधचिन्हे, दोन्हींपैकी पहिली जरी कितीही चुकीची असली आणि दुसरी कितीही फसवी नि बोगस असली; तरीसुद्धा ज्या मतप्रणालीच्या उपस्थितीमुळे प्रत्येक वादग्रस्त प्रश्नाला काही ना काही बाजू प्राप्त होत असे, जोर येत असे, ती पूर्वीची बौद्धिक भांडणे आज लुप्त झाली आहेत. मतभिन्नतेच्या जागी आता मतैक्यतेची लाट आली आहे. उजव्या विचारसरणीचे वर्चस्व असणारी मतैक्यता. (उजवा शब्द अगदी सगळ्या अर्थांनी घ्यायचा.) आणि सत्य जरी त्यांच्या बाजूने आहे तरी आवेशाच्या बाबतीत त्यांची बाजू खचितच लंगडी आहे. आवेश डाव्यांमध्येच पाहावयास सापडत असे. जे आहे त्याच्या विरुद्ध कायम ओरड करीत राहणे विरोध करीत राहणे हे जे डाव्यांच्या 'संघर्षाचे' सर्वात महत्त्वाचे व्यवच्छेदक लक्षण तेच आज अदृश्य झाले आहे; आणि यात खरे नुकसान उजव्यांचे आहे. डाव्यांनी बौद्धिक मैदान सोडल्याची खरी झळ उजव्यांना पोहोचणार आहे. कारण त्यामुळे उजव्यांच्या शक्तीला ग्रहण लागेल. डाव्या मतप्रणाली विस्कळीत बनून जर का वाट फुटेल, तिकडे पळ काढू लागल्या तर त्यात उजव्यांचा शक्तिपात घडून येईल.

परंतु खरा प्रश्न असा की, पूर्व युरोप आणि सोव्हिएट युनियन या दोन सत्ताकेंद्रातील

सरकारी समाजवादाने मार खाल्ल्याने एके काळी स्वत:ला 'मार्क्सवादी' म्हणवून घेणाऱ्यांच्याच नव्हे; तर ब्रिटन अणि अन्य देशातील लोकशाही समाजवाद्यांच्याही चैतन्यावर विपरीत परिणाम का व्हावा? या प्रश्नाचे उत्तर असे की हे सर्व समाजवादी, मग ते निव्वळ नावाचेही का असेनात, ते सर्वजण मार्गदर्शनासाठी वरील दोन 'सत्ताकेंद्राच्या' सुरळीत अस्तित्वावर अवलंबून होते. आपण योग्य मार्गावर आहोत याची खात्री त्यांना या दोन सत्ताकेंद्राच्या अखंडित अस्तित्वावरून मिळत होती; परंतु पालटलेल्या परिस्थितीत ही खात्रीच त्यांच्याकडून हिरावून घेतली गेली आहे.

गोष्ट खरी की, बिगर–भांडवलशाहीचे जग सदोष होते. विद्रूप, स्नेहशून्य, भावनाहीन होते. क्रूर, निष्ठूर, बेफिकीर, भीती घालणारे, जुलमी, खंक, पोलीसी राजवटीचे, सर्व काही होते. होही गोष्ट खरी की नैतिकदृष्ट्या आजही ते प्रारंभीच्या पतित अवस्थेतच आहे. तसेच हेहां खरं की किंग स्ट्रीटवरील पूर्ण अध:पतित कम्युनिस्ट सोडल्यास इतर कोठल्याच कम्युनिस्टाला सोव्हिएट युनियन ध्रुवताऱ्यासारखी वाटत नव्हती. परंतु मनाने समाजवादी बनलेला प्रत्येकजण संपूर्ण जग काळ्या आणि पांढऱ्या अशा फक्त दोन रंगात पाहू लागतो; थोडक्यात हे जग म्हणजे रणभूमी असून या रणभूमीवर सुपष्ट शक्ती व दुष्ट शक्ती अशा दोन शक्तींचे तुंबळ युद्ध सुरू आहे असे मानणाऱ्या मॅनी नावाच्या दुसऱ्या-तिसऱ्या शतकातील तापशाचा नि त्याच्या धार्मिक पंथाचा अनुयायी बनू लागतो. 'बिगर–भांडवलशाही' राजवटी केवळ अस्तित्वात आहेत एवढे दिसले तरी त्याला ते पुरेसे असते. लगेच त्याची कल्पनाशक्ती काम करू लागते आणि त्याला आशा वाटू लागते की ज्याअर्थी बिगर–भांडवलशाही राजवटी अस्तित्वात आहेत, त्या अर्थी बाजारपेठेच्या घृणास्पद कायद्याचा अंमल नसलेली व्यवस्था केव्हा ना केव्हा अस्तित्वात येईल नि आपण त्या व्यवस्थेमध्ये सुखाने वास्तव्य करू. तेव्हा काय (आणि आता काय) मठ्ठ डोक्याच्या मार्क्सवादी–लेनिनवाद्यांपासून, ते भेकड हृदयाच्या लोकशाही समाजवाद्यांपर्यंत सर्वांना बाजारपेठेच्या कायद्यावर चालणारी राज्यव्यवस्था म्हणजे जंगलच्या कायद्यावर चालणारी व्यवस्था असेच वाटत आले आहे.

जुन्या जमान्यात, मॅनी पंथीयांप्रमाणे द्वंद्वामध्ये विचार करणारे नि सुधारण्याच्या पलीकडे असलेले (विशेषत: जे आहे ते ज्यांना कायम नापसंत असते असे) समाजवादी तर समाजवादी प्रयोगाला आलेल्या अपयशामुळे पूर्वीपेक्षासुद्धा अधिक उत्साही बनत असत. समाजवादाचे आजचे अपयश हे त्यांना उद्याच्या यशाचे खात्रीलायक चिन्ह; नव्हे समाजवादी ध्येयाला दिला गेलेला होकारच वाटत असे. हे सर्वजण काल्पनिक रामराज्यात रमणारे असल्याने आकांक्षा – मग ती आकांक्षा मूर्खपणाची असो वा दुष्टपणाची; फक्त आकांक्षा आहे एवढी गोष्ट त्यांना पुरेशी होती. आपली झेप, मग ती झेप स्टॅलिनची का असेना, ती आवाक्याच्या पलीकडची हवी; नाही तर मग स्वर्गाच्या कल्पनेला अर्थ तो काय उरला? परंतु आज हे चित्र पालटले आहे. आज असे दिसते की एकांतिक कम्युनिस्ट आणि कम्युनिझममध्ये बदल आवश्यक आहे असे म्हणणारे

(पुढाऱ्यासकट सर्व) दोघेही अवाक् बनले आहेत. समाजवादी गटाने प्रत्यक्षात 'प्रति-क्रांतीचा भांडवलशाही' मार्ग तरी पत्करला आहे किंवा (सोव्हिएट युनियनप्रमाणे) त्या मार्गाने जाण्याच्या बेतात तरी ते आहेत.

बौद्धिकदृष्ट्या विचार केल्यास असे म्हणावेसे वाटते की, या प्रकारचा मानसिक संभ्रम परवडण्यासारखा नाही. डाव्यांनी आता काही ना काही ठाम भूमिका घेतलीच पाहिजे. आधीच खूप उशीर झाला आहे. परंतु मला खात्री आहे की बहुसंख्य डावे या बाबतीत कसलीही हालचाल करणार नाहीत. त्यांच्यापाशी तेवढा वकूवच उरलेला नाही. खरे तर डाव्यांना आज जी बौद्धिक उडी घ्यावी लागणार आहे किंवा त्यांनी घेणे आवश्यक आहे तिचा आवाका फारच मोठा आहे. अनेक प्रकारचे निषेध त्यांची वाट अडवून उभे आहेत. 'सरकार' किंवा 'स्टेट' नावाच्या कल्पनेशी त्यांचे चांगले जमते; परंतु 'राष्ट्राच्या' -नेशनच्या- कल्पनेचे त्यांना वावडे आहे. 'राष्ट्र' हा शब्द कानावर पडताच डावे कावरेबावरे होतात. वांशिक जणीव होणे हे त्यांना वर्णवादाचे लक्षण वाटते. नैतिक विचारसरणींमधील संघर्षाचे जग तर त्यांना जवळजवळ अज्ञात आहे, परके आहे. त्यांना हे कळत नाही की जगाचा ढाचा आज संपूर्णपणे बदलून गेला आहे. भांडवलशाहीचा इतिहास माहीत नसला तरी आज फारसे बिघडणार नाही; परंतु धर्मसंस्थेचा इतिहास माहीत नसून चालणार नाही. 'कम्युनिस्ट जाहीरनामा' किंवा 'कामगार पक्षाची घटना' यांसारखी पुस्तके आज त्यांनी वाचली नाहीत तरी बिघडणार नाही; परंतु 'कुराण' न वाचून त्यांचे चालणार नाही. तथापि डाव्यांची विचारपद्धती इतकी ढोबळ स्वरूपाची आहे की सूक्ष्म आणि तरल असे काहीही त्यांना कळण्यासारखे नाही. नवा मूलभूत विचार त्यांना अजिबात कळत नाही. या बाबतीत त्यांचे वाचन गावंढळ पातळीवर राहिले आहे. अर्थव्यवस्था आणि वर्ग, साम्राज्यवाद आणि मुक्ती किंवा 'लिबरेशन' अशा विषयांनी त्यांची वर्षेच्या वर्षे आणि त्या वर्षांबरोबर त्यांची बौद्धिक शक्ती दोन्हीही खाऊन टाकली आहेत. एके काळी या डाव्यांच्या संस्कृतीने हर्झेनला दूर ठेवून एंगल्सला आणि ऑर्वेलला दूर ठेवून, टॉवनेला (Towney) जवळ केला आहे. (हर्झेन, अलेक्झांडर आयव्हानोविच १८१२-१८७०, रशियन पत्रकार आणि राजकीय विचारवंत. बोल्शेविझम आणि पॉप्युलिझम या दोन विचारसरणींशी संबंधित. बोल्शेविझम शब्दाचा अर्थ - बहुसंख्य, मेजॉरिटी. पॉप्युलिझम हे एका राजकीय विचारसरणीचे नाव. ही विचारसरणी असे सांगते की राजकीय उद्दिष्टये साध्य करण्यासाठी पक्ष व राजकीय संस्थांची मदत न घेता खुद्द जनतेनेच सरकारवर दबाव आणावा आणि स्वत:च्या प्रयत्नाने स्वत:ला हवे ते पदरात पाडून घ्यावे.) राजकीय विषयांच्या संबंधात मूलग्राही विचार करणाऱ्यांशी शत्रुत्वाने वागण्याच्या बाबतीत डाव्यांचा हात कोणीच धरू शकणार नाही. या बाबतीत त्यांचा अगदी पहिल्यापासून हातखंडा आहे.

ते काही असले, तरी एखाद्या डाव्याने जर ठरविले की, बौद्धिकदृष्ट्या नवे काहीतरी शोधायचे तर ते त्याला करता येणार नाही असे नाही. आखाती युद्धाचेच

उदाहरण घ्या. विशेषत: इराकने कुवेतची केलेली लुटालूट हाच मुद्दा घ्या. या विषयात ज्यांना गम्य आहे अशांना स्वत:चे तज्ज्ञ मत व्यक्त करण्यासाठी हा एक अगदी उत्तम व नमुनेदार विषय होता. ज्यांना सखोल ऐतिहासिक ज्ञान आहे त्यांना तर ते ज्ञान बोलून दाखविण्याची व स्वतंत्र नैतिक भूमिका घेण्याची आणि स्वत:चे नैतिक मत व्यक्त करण्याची ही एक अमूल्य संधी होती. मार्क्स जर हयात असता तर त्याने नक्कीच आखाती युद्धावर लिहिले असते.

यापैकी काहीही केले गेले नाही. मग डाव्या विचारवंतानी केले होते तरी काय? डाव्यांनी फक्त खून अणि छळाची बोलकी उदाहरणे दिली. ग्रंथालये अणि उपाहारगृहे आणि वसतिगृहे जाळून भस्मसात केली गेली त्याचीही वर्णने दिली. स्त्रियांच्या सौंदर्यप्रसाधनाच्या साहित्याची जी लुटालूट झाली त्याचीही वर्णने दिली. बस्स, मामला खतम. तात्त्विक स्पष्टीकरण आणि भेदक भाष्य, विशेषत: ऐतिहासिक दृष्टीकोनातून करता येण्यासारखे विश्लेषण, विवेचन, भाष्य यापैकी दुर्दैवाने एकही गोष्ट डाव्यांनी केली नाही. समजा खऱ्या अर्थाने नव्या 'नव-डाव्यांना' ('न्यू लेफ्ट') जर पुन्हा एकदा अवसान प्राप्त झाले असते तर हे चित्र नक्कीच वेगळे दिसले असते. बौद्धिक भाष्य करण्यासाठी आखाती युद्ध ही एक अमोल पर्वणीच त्यांच्या साठी होती म्हणा. त्याच्या अंगात नवे अवसान संचारले असते तर आखाती युद्धावर स्वतंत्र भाष्य करून त्यांनी नक्कीच बाजी मारली असती. कारण नवे अवसान अंगात संचारणे याचा अर्थ 'समाजवादी' विचारसरणीच्या लोढण्यातून मनाने मुक्त होणे; परंतु त्याच वेळी मानवी आत्म्याच्या सांदीकोपऱ्यांवर चिकित्सक बुद्धीचा प्रकाशझोत टाकण्याचे आणि मानवजातीला पुढे घेऊन जाण्याचे स्वत:चे कर्तव्य टिकवून धरणे. ज्या अर्थी नव-डाव्यांनी हे केले नाही त्या अर्थी ते पूर्वी होते तेथेच राहिले आहेत असेच म्हणावे लागत आहे.

आखाती युद्धात जे अनन्वित अत्याचार कुवेती जनतेवर केले गेले त्याबद्दल डाव्यांनी निश्चित भूमिका घेऊन काही बोलावे अशी आमची अपेक्षा होती. परंतु नाना पंथांच्या भाष्यकारांकडून आमच्या पदरात पडले ते असे : 'इन्डिपेन्डन्ट' नावाच्या नियतकालिकात रॉबर्ट फ्रिस्क हे गृहस्थ लिहितात की, "जेव्हा कोठे दहशतीचे साम्राज्य थैमान घालीत असते तेव्हा त्याच्या मागची तार्किक कारणमीमांसा शोधू पाहाणे, उदा. जुन्या ऐतिहासिक वैरातून हा प्रसंग घडून आला, किंवा इराकी गुप्तहेरखात्यातील मानसिक विकृतीने पछाडलेल्या एका विभागाचे ते कृत्य होते या प्रकारचा अन्वयार्थ लावू पाहणे ही मानवी मनाची एक नैसर्गिक प्रवृत्ती आहे. कारण ज्या घडामोडींचा अर्थ लागत नाही त्या घडामोडी मन अस्वस्थ बनवितात. तेव्हा काही ना काही स्पष्टीकरण मनाचे समाधान करू पाहाणे हे आपण समजू शकतो. परंतु या प्रकारचे सगळे तर्क हे शेवटी केवळ 'अंदाजी तर्क' असतात." म्हणजेच श्री. रॉबर्ट फ्रिस्क यांच्या मताने हे तर्क 'कल्पनारंजित' असतात. कुवेतमध्ये जे घडले तो पारंपारिक वैराचा प्रकार नव्हता किंवा इराकी गुप्तहेरखात्याचेही ते दुष्ट कारस्थान

नव्हते. कारण हे 'तर्क' कल्पनारंजित आहेत हा निर्णय देऊन झाल्यांनतर फ्रिस्क महाशय लेखाचा शेवट करताना लिहितात की, ''अत्यंत दुष्ट, अतिशय भयानक, जणू साक्षात पापच असे काहीतरी कुवेतच्या नशिबी आले होते.'' कुवेतवर ''साक्षात पापच कोसळले होते'' असे फ्रिस्क महाशय म्हणतात, परंतु या 'पापाचे' नाव मात्र कोठेही ते उच्चारीत नाहीत!

विश्लेषणात्मक चिकित्सेचे हे ढळढळीत अपयश आहे. आता प्रश्न असा की, 'वसाहतवाद–विरोधासारख्या' शब्दिक अवडंबराच्या मदतीने वाद घालणारे; परंतु आता त्या शब्दावडंबराला ज्यांनी सोडचिठी दिली आहे ते 'नव–डावे' स्त्रीपुरुष प्रस्तुत अपयश कसे भरून काढणार आहेत? आजवरचा डाव्यांचा बौद्धिक इतिहास तपासला तर, अंकित देशातील लोकांची पाश्चात्त्य राष्ट्रांनी केलेली लूट आणि पिळणूक या एका संकल्पनेपलीकडे त्यांच्या चिकित्सेची मजल पुढे कधी गेलेली नाही. ठोकळेबाज अणि धोपट स्वरूपाची विधाने करण्याची सवय टाकून द्यायची म्हटल्यास 'नव–डाव्यांनी' नवा प्रारंभ कोठून करावा? मुख्य म्हणजे डाव्यांची सगळी क्रमिक पुस्तके एकजात बाद ठरून जुन्या बाजारात किंवा फूटपाथवर रद्दीच्या भावात विक्रीस आलेली असताना डाव्यांनी वाचावे तरी काय?

आखाती युद्धाच्या प्रसंगाकडे पुन्हा वळायचे तर, असे म्हणता येईल की, या युद्धामुळे उठलेला आगीचा डोंब आणि धुराने काळवंडलेले आकाश या दोन्ही घटनांचा अर्थ लावण्याचे काम डाव्या विचारवंतांना जरी जड जात असले; तरी तैमुरलंगाचा समकालिन आणि मॅकियावेली, व्हिको आणि गिबन या सगळ्यांचा एक महान पूर्वसुरी– मध्ययुगीन अरबी इतिहासकार इवन खाल्दून, याला काही ते जड गेले नसते. या सर्व प्रकाराचा अर्थ त्याने पटकन ओळखला असता, कारण अरबांमधल्या आपापसातल्या लढायांचा अर्थ लावताना उपयोगी पडतील अशा संकल्पना त्याच्यापाशी होत्या. त्यामुळे कसल्याही प्रकारचा बौद्धिक गोंधळ न घालता आणि शब्दावडंबरही न माजविता इराकी सैन्याने रुग्णालयातील रक्तपेढया, खोल्या वातानुकूलित करण्याची यंत्रे, स्त्रियांच्या ओष्ठशलाका इ.इ.ची जी लूटमार केली, चामडयाच्या वस्तू, रंगीत मण्यांच्या माळा, चहाच्या भांड्याचे चांदीचे संच, स्त्रियांच्या पायातील जोडे, कचरा वाहून नेणारे ट्रक्स, प्राणिसंग्रहालयातील प्राणी, मिक्सर्स, टॉयलेट पेपर्स, दूरचित्रवाणी संच, आणि जे जे हाताला लागले त्याच्यावर जो डल्ला मारला त्याचा खरा अर्थ काय, हे त्याने तत्काळ सांगितले असते. इवन खाल्दून याने जगाचा इतिहास–'मुकादिमाह' लिहिला आहे. त्याचा हा ग्रंथ आकाराने चांगलाच जाडजूड आहे. प्रख्यात इतिहासकार अरनॉल्ड टॉयन्बी यांच्या मते असा ग्रंथ पूर्वी कधी झाला नाही व पुढेही कधी व कोठे होणार नाही. तसे पाहिल्यास टॉयन्बीचे हे मत काहीसे अतिशयोक्तीपूर्ण आहे हा भाग निराळा. परंतु तरीसुद्धा हा ग्रंथ फार मोठा आहे हे कबुलच करावे लागेल. अरब एकमेकांच्या मालमत्तेची लूटमार करतात आणि ती त्यांची जन्मजात सवय आहे ही गोष्ट इवन खाल्दूनच्या पूर्णपणे ध्यानात आली होती. या

त्यांच्या सवयीला उद्देशून इवन खाल्दून आपल्या ग्रंथाच्या पहिल्या पुस्तकातील दुसऱ्या प्रकरणात लिहितो की, "अशी लुटालूट करणे हा त्याच्या अरब जातभाईंचा नैसर्गिक स्वभाव आहे. ईतरांच्या मालकीची प्रत्येक वस्तू लुटून नेणे हा त्यांना त्यांचा धर्म वाटतो.... इतरांच्या हक्काच्या वस्तूंची लूटमार करताना ते कसल्याही प्रकारचा विधिनिषेध बाळगीत नाहीत. खिडक्यांचे वा दारांचे पडदे, लाकडी सामान, शोभेच्या वस्तू, भांडीकुंडी– ज्या ज्या वस्तूंवर त्यांची नजर पडेल ती ती वस्तू ते जबरदस्तीने उचलून घेतात."

इब्न खाल्दून हा स्वत: अरब वंशाचा. स्वत:च्या जातभाईंबद्दल त्याने हे स्वत:च लिहून ठेवले आहे. म्हणजे त्याच्या पाठी अनुभव आहे. म्हणूनच त्याच्यावर विश्वास ठेवावयास हरकत नाही. परंतु डाव्यांची भूमिका अशी की, वंशवादी दृष्टीकोनातून करण्यात येणारी ऐतिहासिक भाष्ये खरी नसतात. डाव्यांचा हा चिरतन निष्कर्ष आहे. कारण त्यांचे वेदग्रंथ, त्यांचे प्रमाणग्रंथ त्यांना तसे शिकवितात. वंशवादी भाष्यांच्या बाबतीत डावे वाजवीपेक्षा थोडे अधिकच हळवे बनलेले असल्याने इब्न खाल्दून व्यक्त करतो तशी ठाम मते त्यांना कधीच मान्य होत नाहीत; साहजिकच वंशवादी दृष्टीकोनातून केल्या जाणाऱ्या भाष्यांना ते दंतकथा ठरवून उडवून लावीत असतात. खरे तर डाव्या विचारसरणीचे वैशिष्ट्यच हे आहे की, अरबांच्या बाबतीत तुम्ही जी जी प्रतिक्रिया व्यक्त कराल ती ती त्यांना एक तर पाश्चात्त्यांनी पौर्वात्यांबद्दल दाखविलेल्या खोट्या प्रेमाचा, खोट्या मेहरवानीचा भाग तरी वाटतो किंवा ती त्यांना वंशवादी प्रतिक्रिया तरी वाटते. मात्र इवन खाल्दून हा कोणी सामान्य आसामी नव्हता ही गोष्ट ध्यानात ठेवावयास हवी. त्याला अरबी जगातातील ज्ञानवृद्धांतील ज्ञानवृद्ध म्हणता येईल; तो अध्यापक होता; तो दरबारी मुत्सदी, कायदेपंडित, गाढा विद्वान होता. त्याचा जन्म १३३२ मधील ट्यूनिसचा. अनेक प्रकारचे मानसन्मान मिळवून १४०६ मध्ये इजिप्त येथे तो मृत्यू पावला. ज्याने संपूर्ण अरब जग पाहिले होते असा हा इवन खाल्दून अरबांच्या सवयींविषयी लिहितो की, "एकदा का त्यांनी (म्हणजे) अरबांनी एखाद्या राष्ट्रावर स्वत:चा अंमल प्रस्थापित केला की, त्या राष्ट्रातील नागरिकांची मालमत्ता लुटून स्वत:ची भर करणे हा ते आपला एकमेव उद्योग म्हणा, कर्तव्य म्हणा, समजतात." पुढे असे का? असा प्रश्न उपस्थित करून स्वत:च त्या प्रश्नाचे उत्तर देताना तो म्हणतो की, "अरबांचा स्वभावच मूलत: रानटी आहे. या रानटी स्वभावामुळे लुटालूट करून जिंकलेल्या प्रदेशाची राखरांगोळी करणे एवढच त्यांना समजते. जी जी ठिकाणे अरबांच्या भक्ष्यस्थानी पडतात ती ती अगदी अल्पावधीत पार रसातळाला जाऊन मिळतात" वस्तुस्थितीचा अनुभव घेऊन इवन खाल्दूनने बनवलेले हे मत आहे. परंतु चुकीच्या विचारांची झापडे लावून फिरणाऱ्या डाव्या इतिहासकाराला हे सर्व – 'ज्ञान' या संज्ञेला पात्र नाही असे वाटत राहील. 'मानवी स्वभाव' ही संकल्पनाच डाव्यांना कधी पटली नाही. मग ती संकल्पना अरबांच्या बाबतीत वापरली जावो वा अन्य कुणाच्या! डाव्यांच्या मताने सत्य छपविण्याव्यतिरिक्त या संकल्पनेचा अन्य

दुसरा काहीही उपयोग नाही. फक्त फसवणूक करण्यासाठीच 'मानवी स्वभाव' हा शब्द वापरला जातो. प्रत्यक्षात तसे काहीही असत नाही, असे ते समाजात. प्राचीन काळापासून आजतागायतपर्यंत जगभर ज्या असंख्य लहानमोठ्या उलथापालथी झाल्या; त्यातील डाव्यांना काहीच कळले नाही, त्याचे आश्चर्य वाटावयास नको. कारण डाव्यांना 'मानवी स्वभाव' म्हणजे काय हेच कळलेले नाही.

अर्थात अरब संस्कृतीच्या कित्येक ग्रंथांमध्ये इब्न खाल्दूनच्या दृष्टीकोनावर टीका झालेली आहे आणि काहींनी तर मोजक्या शद्वात त्याची खरडपट्टीही काढली आहे ही ही गोष्ट स्पष्ट आहे. परंतु कुवेतवरील सद्दाम हुसेनच्या आक्रमणानंतर एखाद्या समाजवाद्याने 'मुकादिमा'चे समजा जरी काळजीपूर्वक वाचन केले, तरी त्यालासुद्धा त्या ग्रंथातून काही ना काही नवे ज्ञान प्राप्त होईल. समाजवाद्यांच्या दृष्टीने जग आज निर्दय बनले आहे. ते दिशा शोधत आहे. अशा वेळी तर हे वाचन त्यांना नक्कीच उपयुक्त ठरेल. सद्दाम हुसेनचा म्हणजेच बगदादचा दावा असा की, आखाती युद्धात आपला विजय झाला आहे. पाश्चात्त्यांना त्याच्या या दाव्याचे, फारच आश्चर्य वाटत आहे. परंतु युद्ध करण्यातील अरबांचा मुख्य हेतू विचारात घेता नि अरबांची युद्धनीती समोर ठेवल्यास आपण जिंकलो असे बगदाद का सांगत आहे ते लगेच कळेल. युद्धाचे एकमेव उद्दिष्ट शत्रुच्या मालमत्तेची लुटालूट जाळपोळ आणि विध्वंस हेच असल्याने व त्यात बगदाद यशस्वी झाल्याने बगदादचा जय झाला या दाव्यातील सत्यतेबद्दल काहीच शंका नाही. इब्न खाल्दून काहीशा उपरोधाने म्हणतो तसे "फक्त सपाट भूमीच अरब जिंकू शकतात" आणि "जी राजवट कमकुवत असेल तिच्यावरच ते हल्ला करतात. एकदा हल्ला केला की संधी सापडताच पुन्हा पुन्हा हल्ला करीत राहातात." इब्न खाल्दून याचा हा निष्कर्ष ध्यानात ठेवण्यासारखा आहे. इब्न खाल्दून हे जणू मुसलमानातील 'बीड' नावाचे आदर्श इतिहासकार! (थोर इतिहासकार बीड. ६७३-७३५. इंग्रजी इतिहासकार आणि विद्वान संशोधक धर्मगुरू होते. इंग्लिश चर्चवर त्यांनी लॅटिन भाषेत ग्रंथ लिहिला आहेत. त्यांनी दुसरेसुद्धा कित्येक ग्रंथ लिहिले आहेत.) सांगायची गोष्ट ही की, मुसलमानातले हे बीड जे सांगतात, ते साम्राज्यशाही विरोधी डझनभर हाब्स्वॉमनासुद्धा जमणार नाही. (हॉब्स्वॉम, एरिक जॉन अर्नेस्ट. ब्रिटिश इतिहासकार १९१७– 'पास्ट अँड प्रेझेंट' या नावाच्या ब्रिटिश इतिहासवाचक जर्नलचा एक संस्थापक.)

कुवेतवर स्वारी करणारा सद्दाम हुसेन हा अरब, जुन्या अरबी परंपरेतला पुढारी आहे. म्हणजे लढवैय्या आणि लुटालूट करणारा. कुवेती समाज 'अल्–सबाह' कुटुंबाच्या अमलाखाली आहे. या कुवेती समाजाकडे (आता पराभूत झालेला) सद्दाम हुसेन कोठल्या दृष्टीने पाहात असला पाहिजे याचाही धडा इब्न खाल्दून डाव्यांना देऊ शकेल. अर्थात ते समजू घ्यावे अशी त्यांची स्वतःची इच्छा असली तरच! खाल्दून म्हणतो की "ज्या ठिकाणाची प्रजा चैनीत आणि ऐषआरामात जीवन व्यतीत करू लागते, चैनीच्या आणि ऐषआरामाच्या वस्तू मोठ्या प्रमाणावर जमा करण्यात व्यग्र

बनते आणि आरामी जीवनाला सोकावते तेथील प्रजेच्या शौर्याला उतरती कळा लागते..... कारण त्या प्रजेला आरामशीर जीवनाची चटक लागते आणि राज्यकर्त्या घराण्याच्या छायेत सुखी समाधानी व आरामदायक आयुष्य घालविण्यात लोक धन्यता मानू लागतात.'' हे भाष्य कुवेतींशिवाय अन्य दुसऱ्या कोणत्या लोकांना लागू पडण्यासारखे आहे? इराकी त्यांच्यावर तुटून पडण्याच्या आधी त्यांच्याइतके श्रीमंत जगात अन्य कोण बरे होते? कुवेती जनतेचे दरडोई उत्पन्नच याला साक्ष आहे. खाल्दून पुढे लिहितो की, ''त्या श्रीमंत लोकांची मुले पुढे पुढे इतकी मिजासखोर बनतात की स्वत:ची कामे स्वत: करणे, स्वत:ची काळजी स्वत: घेणे याचीही त्यांना लाज वाटू लागते.'' कुवेतच्या एकूण लोकसंख्येपैकी ६५ टक्के मंडळी बाहेरून आलेल्यांपैकी होती. मूळ कुवेती लोकांची वैयक्तिक सेवा करून देशातील अन्य सगळी श्रमाची कामे हेच परदेशी लोक करत.

इब्न खाल्दून पुढे म्हणतो की, ''ज्या राजवटीमध्ये खाजगी आणि सार्वजनिक कामे करण्यासाठी परदेशी लोक नोकरीत ठेवले जातात ती राजवट लवकरच कोसळणार यात शंकाच नसते. सर्व प्रकारच्या कामांसाठी देशाबाहेरील परकी लोकांची नेमणूक केली जाणे याचाच अर्थ त्या राजवटीचे पतन जवळ आहे, असा आहे.'' अर्थात वादप्रतिवादाच्या थाटात विचार करणाऱ्या अथवा 'शास्त्रशुद्ध विचारसरणीच्या' जातिवंत डाव्या विचारवंतांना इब्न खाल्दूनचे हे मत केवळ अंधविश्वास व दुराग्रही वाटेल यातही काही शंका नाही. तरीसुद्धा इब्न खाल्दून याच्या मताने ''असे लोक स्वत:च्या कर्माने स्वत:चे मरण जवळ आणतात. असे वागणारी जमात अन्य राष्ट्रांकडून गिळंकृत केली जाते.''

ग्रंथाचे तात्पर्य म्हणून इब्न खाल्दून शेवटी म्हणतो की, ''अरबी युद्धाचे एकूण चार प्रकार आहेत. ते चार प्रकार असे : (१) धर्मयुद्ध (२) घरच्या बंडखोरां-विरुद्ध करण्यात येणारे युद्ध. (३) राजसत्ता काबीज करण्यासाठी केले गेलेले राजकुटुंबातील स्पर्धकांचे आपापसातील युद्ध (४) परकी राष्ट्रातील संपत्ती लुटण्यासाठी केले गेलेले युद्ध.'' कुवेतवरील इराकची स्वारी चौथ्या प्रकारात मोडेल : दुर्बल बनलेल्या आणि ऱ्हास झालेल्या शेखशाहीवर लुटालूट करण्यासाठी व त्या सत्तेचा शेवट करण्यासाठी केला गेलेला तो हल्ला होता.

या जातीच्या युद्धात पेटवून देण्यात आलेल्या तेलविहिरी आणि लुटून नेली गेलेली सुगंधी द्रव्याची खोकी ही विजयाची चिन्हे ठरतात. या असल्या प्रकरणात डाव्यांना अभिप्रेत असणारा वसाहतवाद आणि वंशवाद यापैकी कशाचाही संबंध असू शकत नाही. डावे आणि विशेषत: मार्क्सवादी डावे इतिहासकार 'अर्थशास्त्राच्या कायद्यांमध्ये' कदाचित पूर्ण पारंगत असतीलही; तसेच सामाजिक प्रक्रियेच्या अनुभवातील रहस्यांचे खाजगी साक्षीदारही ते असतील, त्या रहस्यातील काही रहस्ये कदाचित खरीखुरीही असतील; परंतु जे विचारवंत मार्क्सवादाच्या ओझ्यापासून मुक्त असतात ते भले कितीही 'अशास्त्रीय' असोत; जगाच्या व्यवहारामध्ये तुलनेने तेच

अधिक मुरब्बी असण्याची शक्यता अधिक आहे. इब्न खाल्दून अशा मुरब्बी मंडळीत मोडतो.

येथे खरे तर एक यापेक्षाही अधिक गहन प्रश्न दडून आहे. गेले जवळजवळ शतकभर डाव्या इतिहासलेखन पद्धतीच्या निपुणतेचा एक खोटाच दबदबा निर्माण होऊन राहिला आहे. या खोट्या दबदब्यामुळे पाश्चात्त्य संस्कृतीसह इतर अनेक संस्कृती केवळ दिपून गेल्या होत्या नि त्यांनी बौद्धिक हाय खाल्ली होती, इतकी की प्रकाशाला 'प्रकाश' आणि अंधाराला 'अंधार' म्हणण्याइतकीसुद्धा हिंमत त्यांच्यापाशी उरली नव्हती. व्यक्ती, लोकसमुदाय आणि इतर अनेक गोष्टींबद्दल स्वत:चे खरे व प्रामाणिक मतही या संस्कृती उघडपणे नोंदवू शकत नव्हत्या. डाव्यांचे दुर्बोध आणि गूढ शब्दप्रयोग–की जे सारे तोंडपाठ आहेत असे दिसताच पगारी नोकरी मिळण्याची हमखास हमी होती, त्या शब्दप्रयोगाना, तावूनसुलाखून सिद्ध झालेल्या संपूर्ण ज्ञात शहाणपणावर कडी करू दिली गेली होती. सर्वांत कहर म्हणजे डाव्यांच्या शब्दकोशात युक्त आणि अयुक्त, नैतिक आणि अनैतिक, सुष्ट आणि दुष्ट, इष्ट आणि अनिष्ट या जातीच्या नीतिवाचक कोटींचा पूर्ण अभाव असतानासुद्धा आजूवाजूच्या जगाबद्दल ते आपल्या प्रतिक्रिया मोठ्या दिमाखात व्यक्त करीत होते. खरे तर समाजवादामध्ये जरी 'बंधुत्व' आणि 'आंतरराष्ट्रीय सहानुभूती' अशासारख्या गोड गोड आणि तोंडदेखल्या शब्दांची रेलचेल असली तरी डाव्यांच्या प्रत्यक्ष व्यवहारात मात्र, सापेक्ष आणि पंथीय भूमिकाच प्रकट होत होती. खुद्द स्वत:च्याच शास्त्राच्या उजेडाने डावे इतके दिपून गेले होते की, जगभराच्या मूढ आणि मूर्खशिरोमणी सोसेस्कूंची (रुमानियातील कम्युनिस्ट हुकूमशहा व त्याच्याच जातीचे अन्य महापुरुष) बोळवण कोणत्या शब्दात करायची किंवा इराकी आक्रमकाला कोणत्या नावाने संबोधायचे हेच त्याना कळत नव्हते. हा सर्व प्रकार शब्दात मांडण्यासाठी ज्या शब्दांची आवश्यकता होती ते शब्दच त्यांच्यापाशी नव्हते.

दु:खात सुख एवढेच की आज आमच्या भोवतालचे जग विशेषत: एके काळी जे जग समाजवादी होते, ते पुन्हा एकदा नव्याने बांधून काढले जात आहे. नैतिक आणि आर्थिक अशी दोन्ही प्रकारची उद्दिष्टे डोळ्यासमोर ठेवून हे काम करण्यात येईल अशी आशा आपण करू या. विशेष म्हणचे खुल्या व मुक्त बाजारपेठेचा हक्क आणि कर्तव्ये यांचा पूर्वेला पुन्हा लागलेला शोध; तसेच देशाच्या नागरिकत्वाची उद्दिष्टे आणि स्वरूप याबद्दलची नवी व्याख्या करण्याचा पश्चिमेचा प्रयत्न; हे पाहून असे वाटले होते की, डाव्यांच्या बुद्धिचा आज जरी तोल गेला असला; तरी नव्या वातावरणात तो तोल सावरला जाईल. दुर्दैवाने यापैकी काहीही घडलेले नाही. किंबहुना कोठल्याही प्रकारची खातरजमा न करताच भांडवलशाही समाजव्यवस्थेमध्ये श्रमजीवींचे पद्धतशीरपणे शोषणच होत असते आणि काही झाले तरी ही समाजव्यवस्था अन्यायी व जुलमीच असते यासारखी गृहीतकृत्ये डावे जोवर टाकून देत नाहीत तोवर यापेक्षा काहीही वेगळे घडून येणार नाही. आता हेच पाहाना. नागरिकत्वाच्या संकल्पनेवर ब्रिटनमध्ये

एक सार्वजनिक वाद झाला (बौद्धिकदृष्ट्या तो एक अत्यंत निराशाजनक प्रकार होता). या सार्वजनिक वादामध्ये डाव्यांनीदेखील भाग घेतला होता; परंतु डाव्यांचा एकूण बौद्धिक पवित्रा प्रथमपासूनच धरसोडीचा व संदिग्ध होता. भांडवलशाही समाजव्यवस्थेमध्ये आपण राहत आहोत की भांडवलशाही हुकूमशाहीमध्ये, याबद्दलच त्यांच्या मनाचा निर्णय होत नव्हता. त्यामुळे नागरिकत्वाच्या संदर्भात भूमिका नेमकी कोणती घ्यावी हेच त्यांना ठरविता येत नव्हते. कारण समाजव्यवस्था 'भांडवलशाही – लोकशाहीवादी' असल्यास प्रस्थापित कायद्यात दुरुस्त्या करून काम भागू शकते. उलट ती जर का 'भांडवलशाही – हुकूमशाहीवादी' असेल तर तेथे प्रस्थापित कायद्यांमध्ये दुरुस्ती करून काम भागत नाही. तेथे जुने हटवून नवे आणावे लागते.

तेव्हा हे एक राजकीय त्रांगडे आहे या राजकीय त्रांगड्यातून बाहेर पडायचे झाल्यास डाव्यांना प्रतिगामी समाजवादी परंपरेपासून फारकत घ्यावी लागेल. परंतु नवा जन्म घेतलेले डावे जरी स्वातंत्र्यवादी असले तरी अंतःकरणातून आजही ते दूरवरचे 'अधिकारशाही समाजवादी' मनोरथ बाळगून आहेत. सकृद्दर्शनी प्रतिगामी समाजवादी परंपरेबरोबरच्या स्वातंत्र्यवादी डाव्यांच्या फारकतीचा प्रश्न तितकासा बिकट वाटत नाही. शेवटी डावे स्वतःला 'पुरोगामी' म्हणवून घेतातच ना! ते काही केवळ 'समाजवादी' नाहीत. आता 'पुरोगामीत्व' हा जर डावेपणाचा महत्त्वाचा गुणधर्म आहे; तर ही फारकत डाव्यांना जड जाऊ नये. तेव्हा तत्त्वतः तरी ज्या बौद्धिक भूमिकेचे पितळ उघडे पडले आहे ती भूमिका टाकून द्यावयास डाव्यांची काहीच अडकाठी असू नये. विशेषतः श्रमजीवी वर्गाच्या आशाआकांक्षांचा डाव्यांनी लावलेला फसवा अन्वयार्थ आणि अनुत्पादक 'कल्याणकारी स्वर्गलोका'ची भूतलावर प्राणप्रतिष्ठा करण्याचा त्यांनी घेतलेला वसा यासारख्या ज्या बाबी आता भ्रामक ठरल्या आहेत त्यांच्याशी संबंधीत भूमिका तरी त्यांनी सोडून द्यावयास काहीच हरकत नाही.

तथापि अशा प्रकारची स्वतःच्या चुकांची कबुली त्यांच्याकडून आजवर दिली गेलेली नाही. निदान या घटकेपर्यंत तरी असे काही घडलेले नाही. आता प्रश्न असा की, असे का व्हावे? या प्रश्नाचे उत्तर हे की, ही गोष्ट घडून येण्यासाठी डाव्यांना दोन गोष्टी कबूल कराव्या लागतील. एक म्हणजे त्यांना हे कबूल करावे लागेल की, पूर्व युरोप आणि सोव्हिएट संघराज्यामध्ये समाजवादाचा पराभव झाला, त्याचा अर्थ एका चुकीपासून डाव्यांची सुटका झाली होती, एवढाच केवळ नाही; तर समाजवादाचा पाडाव ही खऱ्या अर्थाने ऐतिहासिकदृष्ट्याच प्रगतीची बाब आहे. एवढेच नव्हे; तर कालबाह्य झालेल्या उत्पादनव्यवस्थांचे विरोधविकासात्मक धर्तीचे उच्चाटण कसे घडते याचे जे वर्णन मार्क्सवादी पोथ्यांमध्ये करण्यात आले त्याच्या बरहुकूम हे घडले आहे, हेही त्याला कबूल करावे लागेल. तथापि डाव्यांच्या बाबतीत महाकठीण गोष्ट जर कोणती असेल तर ती म्हणजे स्वतःच्या दुराग्रहाची मनमोकळी कबूली देणे ही होय. वस्तुतः श्रमजीवींच्या नावाने जे राजकारण आजवर डाव्यांनी केले, त्या राजकारणाचा

'भांडवल' या संस्थेने पूर्ण पराभव केला आहे. डाव्यांनी हे कबूल करावयास हवे; परंतु डावे ते कधीच कबूल करणार नाहीत. कारण हे कबूल करणे म्हणजे वस्तुस्थितीला नि:शंक मनाने देऊ केलेली पावतीच होय.

स्वत:च्या पराभवाची कबुली न देता ब्रिटनमधले डावे बुद्धीवादी – भरीत भर म्हणून की काय, पण ज्यांच्या गळ्यात बौद्धिकदृष्ट्या घसरणीस लागलेल्या मजूरपक्षाचा धोंडा बांधला गेला आहे – चारी बाजूंनी बदलाचे वारे घोंगावत असताना डोळे गच्च मिटून घेऊन तंबूच्या आत लपून बसावे तसे तोंड लपवून लपून बसले आहेत. जुना इतिहास ते विसरू शकलेले नाहीत. इतिहास आणि अर्थकारण, धर्मसंस्था आणि मानवी स्वभाव यांच्याबद्दल जे काही नवे धडे त्यांना घेता आले असते त्यातील फक्त थोडेच धडे ते शिकू शकले. अशा स्थितीत डाव्यांना आजही वाटते की उजव्यांना विरोध करीत राहाणे ही डाव्या राजकीय कृतीची परिसीमा आहे. या कोंडीतून कदाचित सुटका नसावी; तथापि या संबंधात असे म्हणावेसे वाटते की, जोवर हा बौद्धिक संभ्रम असाच टिकून राहील तोवर आमचे बौद्धिक जीवनही तसेच निकृष्ट राहील!

●●●



अनुक्रमणिका

# नवे पदार्थविज्ञानशास्त्र

## नाना जोशी

*[ अंक ४४- नवे पदार्थ विज्ञान शास्त्र छापताना काही चुका झाल्या आहेत. चुका पदार्थविज्ञान शास्त्राच्या संदर्भात फारच महत्त्वाच्या असल्याने त्या खाली दुरुस्त करून दाखवीत आहे.*

*पृ.६१४ : अणूमध्ये प्रोटोन्स, इलेक्ट्रोन्स व न्युट्रोन्स असतात. प्रोटोन्स आणि इलेक्ट्रोन्सची संख्या समान असते. न्युट्रोन्सच्या संख्येत कमीजास्त होऊ शकते.*

*पृ.६२५ : प्रोटोन्सचा वस्तुभार शून्य नसतो; तर न्युट्रिनोचा वस्तुभार शून्य असतो.*

*पृ.६१५ : कणांचा हा गुणधर्म फर्मी यांनी शोधून काढला होता. असे वाक्य आहे. हे वाक्य 'फर्मिऑन' कणांबद्दल आहे. कणांना फिरकी असते. हे एन्रिको फर्मी यांच्याही आधी ज्ञात होते. पण अर्धपूर्णांकांच्या फिरकीचे कण फर्मी यांनी शोधून काढले असल्याने तसल्या कणांना त्यांचे नाव देण्यात आले होते.*

*पृ.६५९ : खालून चौथी ओळ. 'पुंजविज्ञान' शब्दाऐवजी 'पुंजीवाद' शब्द आला आहे. क्वांटम फिजिक्सला 'पुंजविज्ञान' असा शब्द आहे.]*

*प्रस्तुत लेखमालेत 'मेकॅनिक्स' हा शब्द अनेकवार आला आहे. 'मेकॅनिक्स' ही संज्ञा अपेक्षेइतकी स्पष्ट झाली नसावी असे वाटल्याने ती खाली स्पष्ट करण्याचा प्रयत्न करीत आहोत. 'मेकॅनिक्स' ही संज्ञा पूर्वीच्या काळी 'स्टडी ऑफ मोशन' म्हणजे गतीच्या अभ्यासाला उद्देशून वापरण्यात येत असे. 'सिस्टीम' मग ती 'सिस्टीम' मानवाने तयार केलेली असो, वा नैसर्गिकरित्या अस्तित्वात असो; ती जडद्रव्यापासून बनलेली असते. आणि हे जडद्रव्य गतिमान असते. उदा. ग्रह आपल्या अक्षाभोवती प्रदक्षणा घालतात. रक्ताचे अभिसरण सुरू असते. रसायनांचा स्फोट होत असतो. माणसे चालतात, वगैरे.*

*प्रस्तुत लेखमालेतील व्यवस्थित न स्पष्ट झालेली दुसरी संज्ञा, 'वेव्ह' ही.*



अनुक्रमणिका

*भौतिकशास्त्रातील 'वेव्ह' किंवा लाट वा तरंग आणि आपल्या परिचयातील पाण्याची लाट, सूर-तरंग या दोन गोष्टींमध्ये उत्तर व दक्षिण ध्रुवाइतका फरक आहे. आपली व्यवहारबुद्धी आपणाला सांगते की जर लाट किंवा तरंग उत्पन्न व्हायचा असेल तर हेलकावा खाणारा काही तरी पदार्थ अस्तित्वात असायला पाहिजे. पाण्याला हेलकावा बसला की लाट येते. तंबोऱ्याच्या तारांना झणकार दिला की नादतरंग उत्पन्न होतात. किंवा पंखा जोरात हलवला की हवेच्या लाटा तयार होतात. येथे पाणी किंवा हवा असे काहीना काही माध्यम अस्तित्वात असते व त्यात लाटा तयार होतात. पाण्यात लाटा तयार होतात. पाणी हे माध्यम झाले. ह्या माध्यमाचे स्वरूप जड वस्तुंचे आहे. आणि ही जड वस्तू लाटा वाहून नेण्याचे कार्य करते. भौतिकशास्त्रामध्ये वापरली जाणारी 'मॅटर वेव्ह' ही संज्ञा वरील वर्णनामध्ये बसत नाही. कारण ही वेव्ह किंवा ही लाट जड माध्यमाचा वापर न करताच उत्पन्न होते. जडाचे स्वरूप दुहेरी आहे, असे आपण अनेकवार म्हटले. पैकी एक स्वरूप टिंबासारखे असते. किंवा कणासारखे आहे; तर दुसरे लाटेसारखे आहे. या दोनापैकी, कणासारखे म्हणजे कसे याचे चित्र आपण सहजगत्या डोळ्यांसमोर आणू शकतो. पण वेव्ह किंवा लाटेचे चित्र डोळ्यासमोर आणणे कठीण आहे. तंबोऱ्याच्या तारांवर बोट फिरविले की तारा वरखाली होतात व लाटा तयार होतात. भौतिकशास्त्रातल्या लाटांचे चित्र जर डोळ्यांसमोर आणायचे ठरले तर फक्त लाटा असतील परंतु त्या तारा नसतील. भौतिकशास्त्रात नेहमी वापरले जाणारे रूपक द्यायचे तर चेशायर मांजर समोर नाही; परंतु मांजराचे 'हास्य' आहे.*

**संपादक**

पुंज भौतिकीने अतिसूक्ष्म वास्तवाबद्दल जो नवा शोध लावला होता, त्यामुळे त्या वास्तवाचे संपूर्ण चित्रच कसे बदलून गेले आहे, ते आताच आपण पाहिले. या विचारामुळे आज इतकी शतके भरंवशाचे, निश्चित, अर्थपूर्ण वाटणारे विश्व एका क्षणात बेभरवशाचे, अनिश्चित, ॲब्सर्ड बनून गेले. अतिसूक्ष्म स्तरावर हे संपूर्ण विश्व लघुकणांपासून बनले आहे असे नवे विज्ञान सांगत होते आणि त्यात आक्षेप घेण्यासारखे वा बुचकळ्यात पडण्यासारखे काहीही नव्हते. परंतु त्याच वेळी हे विज्ञान आणखी असेही सांगत होते की या स्तरावर विश्वाचे स्वरूप दुटप्पी बनते. ते दोन रंगाचे आहे. पूर्वीप्रमाणे एका रंगाचे नाही. आणि हे दोन्ही रंग आलटून पालटून दिसतात, एकदम दिसत नाहीत.

अतिसूक्ष्म स्तरावर वास्तवाचे स्वरूप द्व्यर्थी आहे, ते दुरंगी आहे. ते एकरंगी नाही. हा पुंजभौतिकीचा शोध फारच थोड्या संशोधकांना पटत होता. त्यांच्यापैकी अनेकांना असे खात्रीपूर्वक वाटत होते की वास्तवाच्या पोटात आणखी खाली गेल्यास आपणास वास्तवाचे निर्विवाद स्वरूप सापडेल. कित्येकांनी तर वास्तवाच्या स्वरूपाबद्दलचे नवे समीकरण जुन्या परिभाषेत मांडून पाहण्याचाही प्रयत्न चालविला. ते म्हणू लागले, की आजवर वास्तवाचे वर्णन करताना आपण जडाची

परिभाषा वापरली, येथून पुढे जड आणि अजड दोन्ही एकत्रित करू आणि जड हे तरंगरूपी द्रव्यापासून बनले आहे असे चित्र घेऊ. तथापि, तरंगमय कणाचे चित्र डोळ्यांसमोर कसे आणायचे हा प्रश्न येथेही सुटत नव्हता. व त्यामुळे वास्तवाच्या स्वरूपाबद्दलचे हे नवे उत्तर सोडून दिले गेले. मात्र अनेक संशोधकांना अशी आशा वाटत होती की अंतिम वास्तवाच्या वर्णनाच्या संबंधातील ही अडचण कायम स्वरूपाची नसून ती तात्पुरती आहे. आणखी काही वर्षांनंतर संशोधनाने अधिक प्रगती केली म्हणजे हे पेच सुटेल व कोठेतरी एक ठाम उत्तर हाती येईल.

संशोधकांना ही आशा वाटण्याचे कारण, भौतिक पदार्थाबद्दलचा त्यांचा तोवरचा अनुभव हे होते. भौतिक पदार्थ कोठल्यातरी एका रूपात वावरू शकतात. एकाच वेळी दोन वेगवेगळ्या रूपात ते असूं शकत नाहीत. मख्य म्हणजे भौतिक पदार्थ काही झाले तरी भरीव स्वरूपातच अस्तित्वात आहेत, असेही त्यांना खात्रीपूर्वक वाटत होते. वैज्ञानिक संशोधकापैकी काहीजण मात्र लघुकणांचे स्वरूप नागमोडी लाटांसारखे आहे हे मान्य करीत होते. तरीसुद्धा त्यांचा प्रश्न हा होता की वास्तवाचे वर्णन करताना आपण म्हणालो की वास्तव तरंगरूपी आहे तर ते कणरूपी आहे, हेही आपणाला दिसून येते. म्हणजे वास्तव तरंगरूपी आहे, हे वास्तवाचे वर्णन शेवटी अर्धवटच राहाते. बरं, वास्तव हे 'तरंगरूपी कणासारखे' आहे असे वास्तवाचे वर्णन केले तर ते धेडगुजरी बनते आणि त्याचे सुस्पष्ट चित्र डोळ्यासमोर उभे करता येत नाही.

शेवटी भवती न भवती होता होता वैज्ञानिक अशा निष्कर्षाला आले, की हे वास्तव अंतीम अर्थाने केवळ संभाव्यता प्रॉबेबिलिटी म्हणून आहे, व त्यातील एक संभाव्यता कणरूपातली आहे तर दुसरी तरंग रूपातील आहे असे समजावे म्हणजे भांडण मिटेल. अर्थात हा निष्कर्ष स्वीकारला गेला होता तरी वैज्ञानिकांच्या मनाला शांती मिळाली होती असे नव्हे. मनुष्यप्राण्याला त्याच्या प्रश्नावरची उत्तरे नेहमी निर्विवाद हवी असतात, संशयात्मक आणि विवाद्य उत्तरांनी त्याचे समाधाने होत नाही. अनेक अर्थाने मनुष्य हा एक दुर्बल प्राणी आहे. या सृष्टीमध्ये वावरताना त्याला कधीच सुरक्षित वाटत नाही. ही सुरक्षितता मिळविण्यासाठी तो सतत प्रत्येक प्रश्नावर ठाम स्वरूपाचे उत्तर शोधत असतो. असे उत्तर जोवर मिळत नाही तोवर सभोवतालचे विश्व त्याला गूढ, अकालनीय व म्हणून अतर्क्य आणि धोकेबाज वाटते.

वास्तवाचे अंतिम स्वरूप कसे आहे या प्रश्नावरचे वरील उत्तर किती विरोधाभासात्मक आहे, हे वरवर पाहणाऱ्याच्या ध्यानात येणार नाही. ते खरोखरच उत्तरच नाही हेही कुणाच्या ध्यानात येणार नाही. थॉमस यंगचाच फोटोन्सचा प्रयोग घ्या. यंगने दोन छिद्रांचा पडदा वापरला आणि त्या पडद्याच्या पाठीमागे दुसरा एक अपारदर्शक पडदा लावला या पडद्यावर त्याला लाटांचे अस्तित्व दर्शवणारी नक्षी मिळाली याचा अर्थ फोटोन्स बंदुकीच्या गोळीप्रमाणे एका एका छिद्रातून पलीकडे जाण्याऐवजी एकावेळी दोन्ही छिद्रातून पलीकडे गेले होते. फोटोन्स आडव्या

लाटांसारखे वागले नसते तर त्यांना हे शक्य झाले नसते. अपारदर्शक पडद्याऐवजी फोटोग्राफिक फिल्म वापरून हाच प्रयोग केला असता नि प्रयोग करताना दोनापैकी फक्त एकच छिद्र खुले ठेवले असते तरी लाटांच्या नक्षीकामाऐवजी कणांचे नक्षीकाम उमटले असते यात शंका नाही. म्हणजे आम्ही लाटा नाहीत आम्ही कण आहोत असे ते फोटोन्स सांगू लागले असते. उलट दोन्ही छिद्रे उघडी ठेवून पायावर थबकत थबकत मारा न करता फोटोन्सच्या फैरीच्या फैरी झाडल्या असत्या तर लगेच लाटांचे नक्षीकाम मिळाले असते. आता प्रश्न असा, की पडद्याच्या दोन छिद्रांपैकी एकच छिद्र उघडे आहे, अथवा दोन्हीच्या दोन्ही छिद्रे उघडी आहेत ही माहिती पडद्याला स्पर्श करण्यापूर्वी फोटोन्सना मिळते कशी?

पुंजभौतिकीने या प्रश्नाचे जे उत्तर दिले आहे ते अगदी विचित्र आहे. पुंजभौतिकी सांगते की फोटोन्स वरवर पाहाता जरी भरीव कणांसारखे भासत असले तरी प्रत्यक्ष वेळ येताच कण अथवा लाट या दोनापैकी कोठलेही रूप ते घेऊ शकतात. याचा दुसरा अर्थ असा की, फोटोग्राफिक प्लेटला स्पर्श करण्यापूर्वी पडद्याची स्थिती फोटोन्सना कळते. याचाच आणखी अर्थ असा की, पडद्याला स्पर्श करण्यापूर्वी फोटोन्सचे स्वरूप ना धड कणात मोडणारे असते ना लाटात मोडणारे ते त्याच्या अधेमधे कुठेतरी असते. किंवा फोटोन्स नेहमी धुरकट अवस्थेत वावरतात. (फोटोन्स हे विशालकाय ड्रॅगनसारखे आहेत. त्यांचे तोंड पहाता येते व त्यांची शेपटी पाहाता येते, त्यांचा मधला भाग धुक्यात हरवलेला असल्याने पाहाता येत नाही. या स्वरूपाचे फोटोन्सचे वर्णन वर येऊन गेलेच आहे.) थोडक्यात असे की, अन्य भरीव वस्तुंप्रमाणे फोटोन्स वा फोटोन्सच्या जातीचे इतर विविध प्रकारचे लघुकण (सबॲटोमिक पार्टिकल्स) ही सिंगल ऑब्जेट्स किंवा त्या सुट्या वस्तू नव्हेत. प्रारंभी मारा करताना आणि शेवटी माराची निशाणी उमटवितानाच काय ते हे लघुकण सुट्या वस्तू असतात किंवा सुट्या वस्तुसारख्या वागतात असे म्हणणे अधिक बरोबर ठरेल. बंदूकीतून सुटल्यापासून ते निशाणावर जाऊन खूण करेपर्यंतच्या मधल्या काळात त्या स्वत:चीच अनेक पर्यायी रूपे म्हणून वावरतात आणि त्यावेळी निसटून जाण्यासाठी किती वाटा आहेत याचा शोध घेत असतात. फोटोन जेव्हा फोटोग्राफिक प्लेटला स्पर्श करतो तेव्हाच तो संभाव्यतेच्या प्रांतातून प्रत्यक्षतेच्या प्रांतात पदार्पण करतो. येथे एक गोष्ट स्पष्ट करावयास हवी. प्रस्तुत चर्चेमध्ये आम्ही जरी फक्त फोटोन्सबोलत असलो तरी हेच वर्णन इतरही सर्व प्रकारच्या लघुकणांना लागू आहे. सगळ्याच प्रकारचे लघुकण संभाव्यरूपाने अस्तित्वात असतात. लघुकण प्रसंगी जड वस्तुप्रमाणे वागतात तशाच प्रकारे ते तरंगाप्रमाणे वागतात असा या साऱ्याचा अर्थ.

लघुकण एका वेळी येथे तेथे वा तेथे म्हणजे एकापेक्षा जास्त ठिकाणी उपस्थित असू शकतो ही गोष्ट जेव्हा वैज्ञानिकांच्या निदर्शनास आली, तेव्हा त्यांच्यापुढे अनेक नवे प्रश्न उभे ठाकले. येथे त्या सर्व प्रश्नांचा विचार करण्याचे आपणास कारण नाही. त्यातील फक्त एकाच प्रश्नाशी चालू विवेचनाच्या संबंधात आपणास कर्तव्य

आहे. आणि तो प्रश्न म्हणजे या सर्व प्रकरणामध्ये प्रयोगकर्त्याची भूमिका कोणती हा होय. जुन्या भौतिकीमध्ये हा प्रश्न उपस्थित होण्याचे कारणच पडत नाही. कारण तेथे सर्व प्रयोग प्रयोगकर्तानिरपेक्ष असतात. प्रयोगकर्ता कोणीही असला तरी त्याचा परिणाम प्रयोगाच्या फलितावर तेथे घडून येत नाही. नव्या भौतिकाचे तसे नाही. आपण म्हटले की लघुकण येथे, वा तेथे तेथे असतो, पण प्रयोगकर्त्याच्या व त्या लघुकणाचे निरिक्षण करू पाहाणाराच्या दृष्टीने त्या लघुकणाचे स्थान कोणते असते? कारण येथे तेथे वा तेथे हे वर्णन अतिशय अस्पष्ट आहे. या प्रश्नाचे उत्तर असे की नव्या अथवा पुंजभौतिकीप्रमाणे लघुकणाचे स्थान निरिक्षक-सापेक्ष असते. जुन्या भौतिकीप्रमाणे नव्या भौतिकीमध्ये प्रयोगाच्या फलितामध्ये प्रयोगकर्त्याचा सहभाग भरीस घालावा लागतो तरच प्रयोगाचे वर्णन पूर्ण होऊ शकते. लघुकणांच्या बाबतीत लघुकणांचे स्थान व गती दोन्ही एकदम मापता येत नाहीत. एका वेळी दोन्हींचे माप घ्यायचे म्हटले, तर दोन्ही अनिश्चित होतात. अशा वेळी मग निरीक्षकाला आधी स्थिर बिंदू ठरवून घेऊन स्थान वा गती मापावी लागतात. नव्या विज्ञानाचे एक जनक हायझेन्बर्ग यांनी अगदी स्पष्टच दाखवून दिले की अतिसूक्ष्म पातळीवर लघुकणांवर अनिश्चिततेच्या तत्त्वाचा अमंल सुरू होतो. लघुकणांच्या वागण्यासंबंधी पुंजभौतिकीची तात्पर्ये आणि हायझेन्बर्गप्रणीत अनिश्चिततेचे तत्त्व, ही दोन्ही जर का एकत्रित केली तर लघुकणांबद्दल आपणास पुढील माहिती मिळते. तू कोठे आहेस वा कोठे चालला आहेस म्हणजे तुझा प्रवेग काय आहे या सारखा प्रश्न विचारणारा प्रयोगकर्ता हजर नसेल तर लघुकण या शब्दाला काहीही अर्थ नसतो. प्रयोगकर्त्याने विचारलेल्या त्या प्रश्नावरोबरच लघुकण अस्तित्वात येतो. दुसऱ्या शब्दात, क्लासिकल भौतिकाच्या अर्थाने लघुकणांना वस्तुनिष्ठ अस्तित्व नाही. क्लासिकल भौतिकीप्रमाणे जडद्रव्याला वस्तुनिष्ठ अस्तित्व आहे. तुमच्या म्हणजे निरिक्षकाच्या (ऑब्झर्व्हरच्या) हजर असण्यानसण्यावर या जडद्रव्याचे अस्तित्व अवलंबून नाही. परंतु लघुकणांना हे वर्णन लागू नाही. लघुकण या केवळ टेंडन्सीज्/प्रवृत्ती असतात. कशाच्या प्रवृत्ती? तर कणाच्या अथवा तरंगाच्या प्रवृत्ती. लघुकणांचे मूलभूत स्वरूप संभाव्य अस्तित्वाचे आहे. ते प्रत्यक्षतेचे नाही. ही संभाव्यता कोणती हे पहाण्यासाठी निरिक्षक जेव्हा पुढे सरसावतो तेव्हाच या संभाव्यतेचे रूपांतर प्रत्यक्षतेमध्ये घडून येते; आणि ही प्रत्यक्षता निरिक्षक ज्या प्रकारचा प्रश्न त्या संभाव्यतेला विचारतो त्याच्याशी निगडीत असते. स्थूल पातळीवरील वास्तवाच्या बाबतीत असा प्रकार नसतो. तेथे स्थान आणि प्रवेग दोन्ही जोडीने पाहाता येतात. सारांश, अतिसूक्ष्म स्तरावर वास्तव व्यक्तिनिष्ठ बनते. ते वस्तुनिष्ठ रहात नाही; आणि वास्तवाचे वर्णन लिहिताना ते वर्णन शोधणाऱ्या निरिक्षकाच्या उद्दीष्टांचीही, निरिक्षक स्थान शोधत होता की प्रवेग, याचीही नोंद त्या वर्णनात घालावी लागते; कारण ही नोंद घेतली तरच ते वर्णन पूर्ण बनते.

अतिसूक्ष्म पातळीवरील वास्तव अतिशय संदिग्ध असते. असे आपण म्हटले; नव्हे

खऱ्या अर्थाने ते वास्तव नसतेच, वास्तवाच्या त्या निव्वळ प्रवृत्ती असतात असेच आपण म्हटले; आणि वास्तवाच्या या संदिग्धतेची काही उदाहरणे आपण पाहिली. तथापि तेवढ्या वर्णनावरून हे वास्तव किती संदिग्ध आहे हे ध्यानात येण्यासारखे नाही. उदा. वास्तवाच्या अस्तित्वाची दखल घेऊ पाहाणारा साक्षी नसेल तर वास्तव अस्तित्वात नसते, असे जर का कोणी सांगितले तर ते एखाद्याला खोटे वाटेल. परंतु प्रत्यक्ष वस्तुस्थिती काहीशी तशीच आहे असे म्हणावे लागते. फोटोनचेच उदाहरण घेऊ. दोन छिद्रवाल्या पडद्याच्या प्रयोगात इकडून तिकडे सोडलेला फोटोन फोटोग्राफिक प्लेटवर जाऊन खूण करीपर्यंत मधल्या काळात कोणत्या अवस्थेत होता हे जसे सांगता येत नाही; मधल्या काळात तो फोटोन अक्षरश: अदृश्य पिशाच्च्यासारखा वागत असतो, हे जसे खरे आहे; तसेच प्लेटवर तो फोटोन कोठे आपटला हे शोधून काढण्यासाठी जोवर तुम्ही प्लेटकडे आपली नजर वळवत नाही तोवर तो फोटोनही अदृश्यच असतो. प्लेटकडे तुम्ही नजर वळविली की लगेच तो दृश्यमान होतो. तुम्ही म्हणाल की तांत्रिक क्लृप्ती वापरून फोटोनचा ठावठिकाणा तुम्ही निश्चित कराल तर तेही शक्य नसते. फोटोन कोठे आपटला हे शोधून काढण्यासाठी तुम्हाला प्लेटकडेच नजर वळवावी लागेल. फोटोग्राफिक प्लेटवर फोटोन साधारण कोठे खूण करील याचा सर्वसाधारण अंदाज तुम्ही करू शकता (प्रॉबॅबिलीटी देऊ शकता). परंतु फोटोनचा ठावीठकाणा पाहू इच्छिणारा निरिक्षक जोवर पुढे सरसावत नाही, तोपर्यंत हा अंदाज– म्हणजे ही संभंव्यता फक्त संभाव्यताच राहाते. ती प्रत्यक्षता बनत नाही. जुन्या भौतिकाप्रमाणे वास्तव वस्तुनिष्ठ आहे. त्यामुळे 'हाऊ रियल इज रिअल' हा प्रश्न तेथे उपस्थित होऊ शकत नाही. जुन्या भौतिकीप्रमाणे पदार्थांना व्याप्ती असते, म्हणजे अवकाशाची काही ना काही जागा पदार्थ अडवितात. तसेच त्यांना स्वत:ची गती असल्यास त्यांच्या स्थानाचे आणि गतीचे गणित एकदम मांडता येते. नव्या अथवा पुंजभौतिकीला हे मान्य नाही. तेथे एका वेळी वास्तवाचा फक्त एकच गुणधर्म मापता येतो; तसेच प्रयोगातील निरिक्षकाचा हिस्सा वगळून तेथे प्रयोगाचे निष्कर्षही मिळविता येत नाहीत. त्यामुळे 'हाऊ रिअल इज रिअल' हा एक नवा प्रश्न पुंजभौतिकीने संशोधकांसाठी उत्पन्न केला आहे. लघुकणांच्या अस्तित्विाची नोंद घेऊ पाहाणारा प्रयोगकर्ता निरिक्षक उपस्थित नसेल तर लघुकण शेवटपर्यंत संभाव्यरूपातच जर का वावरणार असतील तर द्रष्ट्याच्या रूपात जाणीवशक्ती हजर नसल्यास हे वास्तव देखील वास्तव नसेल असेच म्हणावे लागते.

याच्यातून दुसराही एक प्रश्न उपस्थित झाला होता. वास्तव हे अणुसारख्या घट्ट विटांपासून बनले आहे असे आजवर आपण मानत होतो; परंतु पुंजभौतिकी आपल्या त्या समजुतीला धक्का देत होती. वास्तवं घट्ट विटांचे बनले आहे या शब्दाचा अर्थ ज्या अणुंपासून ते बनले आहे त्या अणुंचे अधिक विभाजन होत नाही असा आपण करीत होतो. तथापि नवे पार्टिकल फिजिक्स असे दाखवत होते की अणु ही वास्तवाची शेवटची स्थिती नसून त्याच्या नंतरसुद्धा वास्तवाची आणखी एक स्थिती आहे. पार्टिकल

फिजिक्स दाखवत होते की अणुचे आणखी तुकडे होतात; मात्र तुकड्यांचे अंतिम स्वरूप काय वा कशा प्रकारचे आहे हे सांगता येत नाही, कारण ते स्वरूप निर्विवाद अर्थाचे नसून ते संभाव्य अर्थाचे आहे.

तथापि ज्या वास्तवामध्ये आम्ही वावरतो ते वास्तव जर का भरीव पदार्थापासून तयार झालेले नाही तर त्या वास्तवाची वास्तविकता अथवा रिॲलिटी नेमकी कशा स्वरूपाची आहे? दुसऱ्या शब्दात या नव्या वास्तवाचा फॉर्म्युला काय असावा? एका विवक्षित मर्यादेपर्यंत आमचे जग घन असल्यासारखे वागते हे आपण अनुभवतो. पण एकदा ती मर्यादा ओलांडली की हे परिचित, ओळखीचे घट्ट पदार्थांचे जग अकस्मात अपरिचित, अनोळखी, मायावी जगामध्ये रूपांतरीत होते असेही आपल्या निदर्शनास येते. अशा वेळी आपले मन आपल्याला विचारते की कोठला फॉर्म्युला वापरून आणि नेमक्या कोठल्या स्तरावर निसर्ग ही जादू घडवून आणतो?

अणुच्या वरच्या स्तरावर जग आपल्या अपेक्षेप्रमाणे वागताना आढळते. मात्र खालच्या स्तरावर तेच जग एकाएकी आभासमय बनते असे नवे विज्ञान सांगते. नव्या विज्ञानाचे हे तात्पर्य काही वैज्ञानिकांना कबूल होते तर कहींचा त्याला विरोध होता. थोडक्यात वास्तवाच्या अंतीम स्वरूपाबद्दलच्या वैज्ञानिक तात्पर्यामुळे खुद्द वैज्ञानिकांमध्येच दोन तट पडले होते. पैकी एका तटाचे म्होरके होते आल्बर्ट आईन्स्टीन व दुसऱ्याचे म्होरके होते नील बोर. आइन्स्टीन म्हणत होते, की वास्तवाची अखेरची अवस्था कोठल्यातरी एका प्रकाराचीच असेल व ती घन स्वरूपाचीच असली पाहिजे. एकच वास्तव एकदा असे व दुसऱ्यांदा तसे वागू लागले तर त्याचा अर्थ परमेश्वर मनुष्यप्राण्याशी छापकाट्याचा जुगार खेळत आहे. परमेश्वर असे कधीच करणार नाही.

विश्वाच्या अंतीम स्वरूपाबद्दलचा नव्या भौतिकीने तयार केलेला आराखडा आइन्स्टीनना बिलकूल कबूल नव्हता. त्यांना ठामपूर्वक असे वाटत होते की हा सगळा संशोधनातील त्रुटीचा परिणाम आहे. संशोधन आणखी पुढे गेले की ही त्रुटी दुरुस्त होईल आणि वास्तव पुन्हा एकदा ओळखीच्या वास्तवाप्रमाणे म्हणजे निर्विवाद प्रकारे वागू लागेल. म्हणजेच ते जड जगाप्रमाणे वागू लागेल. तेथे पदार्थांना विक्षेपमार्ग असतील. स्थिती आणि गती एकदम शोधता येतील. लघुकण अथवा पार्टिकल वर्णन करताना नेहमी दोन प्रश्न उपस्थित केले जातात. एक प्रश्न कणाच्या स्थितीबद्दलचा. दुसरा संवेगाबद्दलचा – मुमेंटबद्दलचा कणाला विचारला जाणारा पहिला प्रश्न 'तू कोठे आहेस?' हा असतो तर दुसरा प्रश्न 'तू कोठे चालला आहेस?' हा असतो. हे प्रश्न विचारून कणाची स्थिती (पोझीशन) आणि गती (मुमेंटम = वस्तुमान x गती) दोन्ही शोधून काढली जातात. कण नेहमीसाखा वागू लागेल. याचा अर्थ स्थिती, गती दोन्ही एकदम मापता येतील असा होय आईन्स्टन यांना पूर्ण खात्री होती की अखेरच्या स्तरावर वास्तव नेहमीच्या परिचित जड वास्तवाप्रमाणे वागणार आहे. याचा थोडक्यात अर्थ



अनुक्रमणिका

असा की, पार्टिकल फिजिक्सने वास्तवाच्या अंतिम रचनेबद्दल काढलेली क्रांतिकारक आणि विरोधाभासात्मक तात्पर्ये आइन्स्टन स्वत: त्या क्षेत्रातील एक मातब्बर वैज्ञानिक असतानासुद्धा मान्य करीत नव्हते. किंवहुना आईन्स्टीन मातब्बर वैज्ञानिक होते. म्हणूनच त्यांना ही तात्पर्ये मान्य होत नव्हती. कारण ही तात्पर्ये मान्य करणे म्हणजे वास्तवाला निश्चित बूड नाही हेच मान्य करण्यासारखे होते. आइन्स्टीन यांची ठाम खात्री होती की वास्तवाचा तो आभासात्मक चेहरा नव्या विज्ञानाने चितारला आहे, त्या चेहऱ्याच्या मागे आणखी एक चेहरा असला पाहिजे व हा चेहरा जुन्या विज्ञानाच्या तत्त्वांशी सुसंगत आहे.

जुने विज्ञान म्हणजे न्यूटनप्रणीत विज्ञान किंवा क्लासिकल विज्ञान. क्लासिकल विज्ञानाच्या तात्पर्याप्रमाणे वास्तवाचा कोठलाही तुकडा मग तो आकाराने लहान असो वा मोठा सारख्याच पध्दतीने वागावयास हवा. तो वेगवेगळा वागूच शकत नाही. कारण ते तुकडे एकाच समान कायद्याखाली वावरतात; निदान त्यांनी वावरावेतरी ही अपेक्षा. परंतु नवे विज्ञान सांगत होते की ते समान कायद्याखाली वावरत नाही. स्थूल वास्तवापेक्षा सूक्ष्म वास्तव वेगळ्या कायद्यांनी बांधलेले आहे; तथापि असे होते तरी आइन्स्टीन यांचे ठाम मत होते की, हे सर्व तात्पुरते आहे. सूक्ष्म वास्तवाबद्दलचे संशोधन आणखी पुढे गेले की पुन्हा एकदा स्थूल आणि सूक्ष्म दोन्ही वास्तवे समान कायद्याने चालतात हे प्रत्ययास येणार आहे. या काळात मॅक्स बर्न नावाच्या आपल्या एका मित्राला पाठविलेल्या पत्रात त्यांनी म्हटले आहे की "पुंजभौतिकीने शोधून काढलेल्या उपपत्तीला प्रारंभी भले कितीही मोठे यश प्राप्त होवो आणि मला म्हातारचळ लागल्याने वास्तवाच्या अंतिम स्वरूपाबद्दलच्या नव्या मंडळींचा नकाशा मी नाकारीत आहे असेही भले कितीही लोकाना वाटो, मी तुला खात्रीपूर्वक सांगतो की एक ना एक दिवस आमच्यापैकी कोणाची अंत:प्रेरणा अचूक होती हे संपूर्ण जगाला दिसून येईल" (ए.पी.फ्रेंच. आइन्स्टीन 'असिंटेनरी व्हाल्यूम' पृ. २७६)

एकीकडे आइन्स्टीन यांना वाटत होते की विज्ञानातील ही अवस्था तात्पुरती आहे तर दुसरीकडे बोर यांना वाटत होते की ती कायमची आहे. येथून पुढे वास्तवाच्या रचनेबद्दलचे चित्र बदलणार नाही, वास्तव टिंब आणि तरंग दोन्ही रूपात अस्तित्वात असते, त्याचे असणे संभाव्य जातीचे असते. नि हेच चित्र अखेरचे आहे.

आइन्स्टीन आणि बोर यांच्यातले हे भांडण पुढे जवळ जवळ तीस वर्षे सुरू होते. कालांतराने आस्पेट प्रयोगानंतर त्याचा निर्णायक निकाल लागला.

*** *** ***

आइन्स्टीन आणि नील बोर हे दोघेही ऑब्सेसिव्ह स्वभावाचे गृहस्थ असल्याने अंगावर घेतलेले काम अर्ध्यावर सोडू शकत नव्हते. आब्सेसिव्ह ही एक मानसशास्त्रीय संज्ञा असून चांगल्या आणि वाईट अशा दोन्ही अर्थांनी ती वापरतात. आब्ससिव्ह स्वभावाचे लोक एखाद्या गोष्टीच्या मागे लागले की त्या गोष्टीचा सोक्ष

मोक्ष लावल्यावरच मागे वळतात. ऑब्सेसिव्ह शब्दाचा हा चांगला अर्थ उलट तीच कृती परत परत करत रहाणे - उदा. तासनतास हात धूत बसणे खिडक्यांच्या व दाराच्या खिट्यावरोवर लागल्या आहेत की नाही याची परत परत खात्री करून घेऊ पाहणे इत्यादी कृती ऑब्सेसिव्ह शब्दाच्या वाईट अर्थामध्ये मोडतात. आइन्स्टीन आणि बोर हे चांगल्या अर्थाने ऑब्सेसिव्ह होते. कारण हातात घेतलेल्या कामाचा ते ध्यास घेत असत. ध्यास घेऊन वागणारांची आणखीदेखील इतर काही लक्षणे सांगता येतील. असे लोक कमालीचे निग्रही असतात. किंवा हट्टी असतात असेही हवं तर म्हणा तसेच त्यांना तपशिलाचे वेड असते. स्थूल माहितीवर त्यांचे समाधान होद नाही. ते शब्दाचे पक्के असतात. दिलेला शब्द ते कधीही मोडत नाहीत. स्वच्छतेची त्यांना स्वाभाविक आवड असते. स्वयंशिस्त आणि संयम याचे ते भोक्ते असतात. ते दीर्घोद्योगी असतात. आयुष्याला अर्थ, देणारे एखादे वेड आयुष्यात नसेल तर त्याना आयुष्य जगल्या सारखे वाटत नाही. आइन्स्टीन आणि बोर दोघेही वृत्तीने ऑब्सेसिव्ह असल्याने आपले वेड सिद्ध करण्यासाठी ते आयुष्यभर झटले असा याचा मथितार्थ.

वास्तवाचे स्वरूप घोटाळ्यात पाडणारे आहे हे बोर यांचे प्रमेय खोडून काढायचेच असा चंग बांधलेले आइन्स्टीन मग गाठ पडेल तेथे बोरना पेचात टाकणारे प्रश्न विचारीत राहिले. पुंजवाद्यांना खोटे ठरविण्यासाठी संधी मिळेल तिथे ते त्यांच्यावर टीका करू पाहात. वास्तव शंभर टक्के वास्तविक आहे. ही त्यांच्या दृष्टीने केवळ शास्त्रीय समजूत नव्हती, ती त्यांची जणू धार्मिक श्रद्धा होती.

पुंजवाद्यांचा पराभव करण्यासाठी पुंजवादाच्या मध्यवर्ती प्रमेयाला धरून नाना प्रकारचे आक्षेप आइन्स्टीननी घेतले. तसेच नाना प्रकारचे कूटप्रश्नही उपस्थित केले. या प्रकारच्या कूटप्रश्नांना 'थॉट एक्सपिरीमेंट' असे म्हणतात. कारण हे प्रयोग खरे, परंतु ते प्रयोग शाळेत करून पहाता येण्यासारखे नसतात. एकतर प्रयोगाची सोय प्रयोग शाळेत नसते; किंवा दुसऱ्या काही अडचणीमुळे हे प्रयोग फक्त बौद्धिक पातळीवरच केले जाऊ शकतात. थोडक्यात म्हणजे, डोक्यातल्या डोक्यात प्रयोग करून प्रयोगातील तार्किक गफलतींचा शोध घ्यायचा असतो. पुंजवाद्यांना कोंडीत पकडण्यासाठी असे अनेक 'बौद्धिक प्रयोग' आइन्स्टीन यांनी त्या काळात सुचविले. या प्रयोगातून पुढे जो खराखरा प्रयोग सुचला व केला गेला, त्याला शा‍स्त्रीय जगामध्ये 'आस्पेक्ट प्रयोग' असे नाव आहे. या प्रयोगामध्ये भाग घेणाऱ्या एका प्रमुख प्रयोगकर्त्याचे नाव होते. प्रा. आस्पेक्ट व त्यामुळे त्या संपूर्ण प्रयोगालाच पुढे आस्पेक्ट प्रयोग असे नाव मिळाले. आस्पेक्ट प्रयोगानंतर आइन्स्टीन बोर वादावर शेवटचा पडदा पडला. पण ही झाली पुढची हकीकत. त्याआधी आइन्स्टन व बोर या दोघात ज्या अनेक बौद्धिक चकमकी घडून आल्या त्याची माहिती घेऊ.

या चकमकीमधला एकमेव प्रश्न वास्तव किती प्रमाणात खरोखर वास्तविक आहे? ते 'वस्तुनिष्ठ' आहे की व्यक्तिनिष्ठ' हा होता. पुंजवादी म्हणत होते की वास्तव हे व्यक्तिनिष्ठ अर्थाने वास्तविक आहे. ते वस्तुनिष्ठ अर्थाने वास्तविक



अनुक्रमणिका

नाही. ते दोन वेगवेगळ्या प्रकारे वागते. आणि चाचणी घेणाऱ्यावर त्याच्या वागण्याचे स्वरूप अवलंबून आहे. चाचणी घेणारा ज्या प्रकारचा प्रयोगसंच प्रयोगासाठी घेतो त्याप्रमाणे वास्तवाचे स्वरूप त्याला दिसते. याच्या उलट आइन्स्टीन म्हणत होते, की वास्तव वस्तुनिष्ठ अर्थाने वास्तविक आहे. आपले म्हणणे सिद्ध करण्यासाठी त्यांनी मग पुजवाद्यांना एक बौद्धिक प्रयोग सुचवला. आइन्स्टीन म्हणत होते की वास्तवाचे स्वरूप एकेरी आहे म्हणजे भरीव कणांसारखे आहे. पुंजवाद्यांचे म्हणणे ते दुहेरी म्हणजे कणासारखे आणि तरंगासारखे दोन्ही प्रकारचे आहे. पुजवाद्यांनां तार्किक गफलतीमध्ये अडकविण्यासाठी आइन्स्टीन यांनी एक युक्ती केली. त्यांनी वास्तव एकेरी स्वरूपाचे असल्यास कोणकोणते पुरावे हजर असतील याची एक यादी बनविली आणि ते पुरावे खोडण्याचे आव्हान पुंजवाद्यांना दिले. पुंजवाद्यांना आव्हान देताना वास्तव कदाचित दुहेरी स्वरूपाचे असल्यास कोणते पुरावे पुढे येतील, आणि त्या पुराव्यांचा फडशा पाडायचा झाला तर काय केले पाहिजे, किंबहुना वास्तव दुहेरी स्वरूपाचे असेल तर काय हा प्रश्नच त्यांनी विचारात घेतला नाही. परिणामतः त्यांच्या विरोधकांनी वास्तव दुहेरी स्वरूपाचे आहे हे सिद्ध करण्यासाठी मिळतील ते पुरावे गोळा करण्याचा कार्यक्रम जारी ठेवला. नि शेवटी आइन्स्टन यांना खोटे पाडले.

हे बौद्धिक भांडण आइन्स्टीन व बोर या दोघांत होते. हा उल्लेख वर आलाच आहे. बोर हे डॅनिश वैज्ञानिक. बोर आणि हायझेन्बर्ग हे दोघे पुंजवाद्यांच्या उपपत्तीचे शिल्पकार! गणिती आराखडा मॅथेमॅटीकल फॉर्मलिझम आणि त्या आराखड्यातील गर्भित परिणामांची चर्चा असे पुजंवाद चे दोन भाग आहेत असे मानले तर पहिल्या भागाची जबाबदारी हायझेन्बर्ग यांनी आपल्या शीरावर घेतली होती असे म्हणता येईल. ही एक प्रकारे बोर - हायझेन्बर्ग या दोघातली कामाची वाटणीच होती, म्हणा ना! पुंजवादाच्या गर्भित अर्थाबद्दल सामान्यपणे बोर हेच बोलत असल्याने आइन्स्टीन यांचे भांडणही त्यांच्याशीच जुंपले होते.

वैज्ञानिक परिसंवादाच्या निमित्ताने बोर आणि आइन्स्टीन जिथे जिथे एकमेकाला भेटत तिथे तिथे बोर यांना अडविण्याचा प्रयत्न आइन्स्टीन करीत. १९३० चा परिसंवादाचा असाच एक प्रसंग : मधल्या विश्रांतीच्या काळात बोर यांच्याशी आइन्स्टीनची गाठ पडली, ताबडतोब आइन्स्टीन यांनी आपला नेहमीचा विषय सुरू केला. ते म्हणाले की, पुंजवाद्यांच्या प्रतिपादनामध्ये एक ठळक बौध्दिक गफलत राहून गेली आहे. तुम्हा लोकांचे म्हणणे असे की सूक्ष्म वास्तवावर अन्सर्टनटी तत्त्वाचा अंमल चलातो. क्वांटम (ऑफ एनर्जी) चे स्थान शोधले तर तिचा प्रवेग पाहाता येत नाही. आणि प्रवेग हुडकला तर स्थान सापडत नाही. किंवा क्वाँटा (शक्तिकणा) मधील उर्जेचा वस्तुभार किती आणि नेमक्या कोणत्या क्षणी त्या कणामध्ये ती उर्जा संचारली या दोन गोष्टींपैकी एका खेपेस.फक्त एकच गोष्ट हुडकता येते असे तुम्हा लोकांचे म्हणणे आहे. आता इ = एमसी हे समीकरण घ्या. हे सूत्र सांगते की मॅटर अथवा जडद्रव्याप्रमाणेच एनर्जीला अथवा ऊर्जेलाही सी[२] किंवा वस्तुभार असतो. एम

ह्णजे मास, सी म्हणजे व्हेलॉसीटी (प्रकाशाची), इ = एमसी[२] या सूत्राचा एक अर्थ असा की पार्टिकल्स आणि अँटिपार्टिकल्स अथवा कण आणि प्रतिकण हे जर का एकत्र आले तर ते एकमेकांना नष्ट करून टाकतात (ॲनिहिलेट करतात). कणांचा प्रतिकण असतो ही गोष्ट आता सर्वश्रुत आहे. जसे इलेक्ट्रोन आणि इलेक्ट्रोनच्या उलट पॉझीट्रॉन (पॉझीट्रॉन सोडल्यास इतर प्रतिकणांना प्रतिपूर्वप्रत्ययाचीच नावे आहेत; जसे प्रोटॉन-अँटिप्रोटॉन, न्यूट्रॉन-अँटिन्यूट्रॉन अपवाद इलेक्ट्रॉनचा). आइन्स्टीन म्हणाले की, एक पेटी घेऊ या. या पेटीच्या एका बाजूला एक छिद्र ठेवायचे. त्या छिद्रावर झडप ठेवायची. पेटीच्या आत एक घड्याळ बसवायचे. हे घड्याळ झडपेचे नियंत्रण करील. पेटीच्या आत एक घड्याळ बसवायचे. हे घड्याळ झडपेचे नियंत्रण करील. पेटीच्या आत लाइट सोअर्स (प्रकाशस्रोताची सोय) ठेवायचा. झडप आणि घड्याळ ही अशी बसवायची की झडपेतून एका वेळी फक्त फोटोन आत जाईल. म्हणजेच झडप फक्त निमिषमात्र उघडेल नि लगेच बंद होईल. या प्रयोगातून आइन्स्टीनना असे सुचवायचे होते की हा प्रयोग केला की शक्तिकणाचा वस्तुभार आणि नेमक्या कोणत्या क्षणी त्या शक्तीकणामध्ये उर्जा संचारली ही दोन्ही मापे एकदम घेता येतील. पुंजवाद्यांच्या मताने एकावेळी या दोनांपैकी फक्त एक माप घेता येते. एक माप घेतले की दुसरे माप दूर पळते. आइन्स्टीन यांच्या मताने ही दोन्ही मापे घेता येणार होती. प्रयोग करण्यापूर्वी पेटी व इतर सरंजामाचे वजन करायचे आणि प्रयोग केल्यावर पुन्हा एकदा तेच वजन घ्यायचे की काम होत होते. घड्याळामुळे फोटोने बाहेर केव्हा गेला ते समजले असते. आणि दोन्ही वजनातील फरकामुळे शक्तिकणांमध्ये किती उर्जा संचारली हेही समजणार होते.

बोर यांना आइन्स्टीन यांनी जेव्हा वरील कूटप्रश्न घातला तेव्हा तेथे दुसरे अनेक वैज्ञानिक हजर होते. त्याक्षणी तरी बोर यांना त्या प्रश्नाचे उत्तर देता आले नाही. किंवहुना आइन्स्टीन यानी आपणास हरवले असेच बोर यांना तेव्हा वाटले. त्या वेळच्या बोर यांच्या मन:स्थितीचे वर्णन तेथे हजर असलेल्यांपैकी एकाने लिहून ठेवले, आहे. तो म्हणतो की, " आइन्स्टीन यानी मांडलेला मुद्दा ऐकून बोर तर स्तंभितच झाले. ती संपूर्ण संध्याकाळ ते अगदी अस्वस्थ होते; नव्हे दु:खीच होते. तेथे जमलेल्या प्रत्येकापाशी ते त्या विषयावर बोलत होते. आणि सांगत होते की, आइन्टीन्टन यांचे मत जर बरोबर ठरले तर भौतिकाची भावी प्रगतीच कुंठीत होणार आहे. बोर परत परत हेच एक वाक्य बोलत होते परंतु आइन्स्टीन यांनी उपस्थित केलेल्या प्रश्नावर त्यांना उत्तर मात्र सांगता येत नव्हते." (एल. रोझेन फेल्ड - प्रोसिडिंग्ज ऑफ द फोर्टीन सॉल्वे कॉन्फरन्स न्यू यार्क इंटरसायन्स १९६८ पृ. २३२)

त्या दिवसाचे परिषदेचे काम संपवून आइन्स्टीन आणि बोर दोघेही हॉलमधून बाहेर पडले तेव्हा आइन्स्टीन यांच्या चेहऱ्यावर स्वर्ग कमावल्याची तर बोर यांच्या चेहऱ्यावर सर्वस्व गेल्याची भावना दिसत होतीबोर त्यांना ती रात्र अगदीच वाईट गेली. उजाडता कोठे त्यांना त्या कूटप्रश्नाचे उत्तर सुचले नि उत्तर सुचले तेव्हा उत्तर इतके

सोपे आहे, हे पाहून खुद्द त्यांनाच हसू आले होते. कारण ते उत्तर खुद्द आइन्स्टीन यांच्या सापेक्षतावादाच्या थिअरीतच अध्याहृत होते.

*** *** ***

टीपण : सापेक्षतावादाच्या थिअरीज दोन. एकीचे नाव स्पेशल सापेक्षतावाद, तर दुसरीचे जनरल सापेक्षतावाद. प्रकाशाच्या वेगापेक्षा अधिक वेगाचे धावू शकणारी पार्टिकल्स असू शकतात काय या प्रश्नाचा विचार स्पेशल थिअरीमध्ये केला जातो. स्पेशल थिअरी असे सांगते की काहीना काही वस्तुभार असणाऱ्या पार्टिकल्सचा प्रवेग– (तांत्रिक भाषेत ज्यांचा मास अथवा वस्तुभार नॉन-झीरो आहे अशी पार्टिकल्स) वाढविण्याचा कितीही जरी प्रयत्न केला तरी हा प्रवेग प्रकाशाच्या प्रवेगाची बरोबरी करू शकत नाही. याचे कारण हे आहे की एखाद्या वस्तुचा प्रवेग अतिशय मोठ्या प्रमाणावर वाढविताच त्या वस्तुचा वस्तुभारही त्याच वेळी वाढू लागतो. आपल्या दैनंदिन भाषेत ती वस्तू पहिल्यापेक्षा जास्त जड बनते) वस्तुभार वाढला आणि ते पार्टिकल जड झाले की त्या पार्किलचा इनर्शिया – त्याचे स्थितीसात्यतही वाढू लागते. परीणामत: त्या पार्टिकलला प्रवेग वाढविण्यासाठी अधिक उर्जा खर्चावी लागते. याचा अर्थ प्रकाशाच्या प्रवेगाची बरोबरी गाठण्यासाठी इन्फिनीट उर्जा, अनंतपट उर्जा खर्चावी लागेल. असो; तर ही झाली स्पेशल थिअरी ऑफ रिलेटिव्हिटी.

रिलेटिव्हिटीसंबंधिची जनरल थिअरी सृष्टीतील गुरुत्वाकर्षण शक्तीबद्दल भाष्य करते. अर्थात सृष्टीमध्ये गुरुत्वाकर्षण शक्तीप्रमाणेच इतरही दुसऱ्या शक्ती, फोर्सेस आहेत. गुरुत्वाकर्षण बलाप्रमाणेच सृष्टीमध्ये इलेक्ट्रोमॅग्नेटिक अथवा विद्युतचुंबकीय बल, स्ट्राँग न्यूक्लिअर फोर्स व वीक न्यूक्लिअर फोर्स अशी आणखी दुसरीही बले आहेत. या चार बलांमधील गुरुत्वाकर्षण बल हे सर्वात कमी ताकदीचे बल होय. मात्र या बलांच्या प्रभावाचा विचार केला तर गुरुत्वाकर्षण बल खूप अंतरावरून प्रभाव गाजविते असे दिसून येते. उदा. लक्षावधी अथवा कोटी प्रकाशवर्षाच्या अंतरावरून सुद्धा गुरूत्वाकर्षण बलाचे अस्तित्व जाणवू शकते. विश्वामध्ये गुरूत्वाकर्षण बल अस्तित्वात आहे म्हणूनच सूर्यमाला परस्परांना धरून आहेत.. गुरुत्वाकर्षण बल नसते तर सूर्यमाला कोठल्या कोठे भरकटत गेल्या असत्या. गुरूत्वाकर्षण बलाच्या उलट स्ट्राँग फोर्स वा बलाची कथा आहे. हे बल फक्त १० सेंमी इतक्या परिघातच स्वत:चा प्रभाव दाखवू शकते. हा परीघ वाढला तर स्ट्राँग फोर्सचा प्रभाव शून्यावर येतो. 'वीक फोर्सचा' प्रभाव तर आणखीनच कमी आहे. हा फोर्स फक्त १० सेमी च्या स्केलमध्येच प्रभाव दाखवू शकतो. हा परिघ मोठा होताच वीक फोर्स निकामी बनतो. हे अंतर किती असा प्रश्न कोणी केला तर त्याला असे सांगता येईल की ॲटॉमिक न्यूक्लिअसचा परिघ $१०^{-१३}$ इतका असतो. आणि वरच्या परीघापेक्षा तो १०० पटीने अधिक आहे.

गुरुत्वाकर्षण बलाप्रमाणेच विद्युतचुंबकीय बलसुद्धा दूरच्या अंतरावरून प्रभाव दाखवू शकते. (मॅक्रोस्कोपिक डिस्टंन्सिस) आपल्या वापरातील वीज हा विद्युत-चुंबकीय बलाचा परिणाम आहे. प्रकाश हा देखील विद्युतचुंबकीय रेडिएशनचाच प्रकार आहे. क्ष-किरण, गामा-किरण, इन्फ्रा रेड अल्ट्राव्हायोलेट रेडिएशन हे सगळे विद्युचुंबकीय बलाचेच प्रकार होत. इलेक्ट्रॉन ऋणविद्युतभारित असतात; तर ॲटोमिक न्यूक्ली धन-विद्युतभारीत असतात. विद्युतचुंबकीय बलाच्या प्रभावामुळेच इलेक्ट्रॉन पार्टिकल्स ॲटॉमिक न्यूक्लिकडे खेचली जातात. अणुंना एकत्रीत बांधून ठेवून त्यांच्या गठ्ठयातून परमाणू तयार करणे किंवा परमाणू (मोलेक्यूल्स) एकत्र बांधून ठेवणे ही सगळी कामे विद्युतचुंबकीय बलामुळे घडतात. जडद्रव्यामध्ये आढळणारा जडत्वाचा गुणधर्म विद्युतचुंबकीय बलावर अवलंबून आहे असे शेवटी म्हणावे लागते.

आता स्ट्राँग फोर्सची माहिती घेऊ. ॲटॉमिक न्यूक्लिच्या ठिकाणी प्रोटोन्स आणि न्यूट्रॉन्स ही दोन पार्टिकल्स अस्तित्वात असतात. ही पार्टिकल्स एकत्रीत ठेवण्याचे काम स्ट्राँग फोर्स करतो. लेप्टॉन्स नावाची पार्टिकल्स वगळता बरिऑन्स आणि मेसॉन्स या पार्टिकल्सवर स्ट्राँग फोर्सचाच ताबा चालतो. मेसॉन्स आणि बॅरिऑन्समध्ये क्वॉर्क्स असतात. हे क्वॉर्क्स एकत्रीत ठेवण्याचे काम स्ट्राँग फोर्समुळे घडते.

स्ट्राँग फोर्सप्रमाणेच वीक फोर्ससुद्धा वैश्विक व्यवहारामध्ये महत्त्वाची कामगिरी बजावतो. विश्वामध्ये जर का विकफोर्स नसते तर ताऱ्यांचा आणि ग्रहांचा गोळा बनला असता. चार बले (फोर्सिस) सेंटर

| फोर्स शक्ती (स्ट्रेंथ) | कोणावर प्रभाव चालतो | पल्ला १०$^{-१३}$ |
| --- | --- | --- |
| स्ट्राँग १ | बरिऑन्स,मेसॉन्स,क्वॉर्क्स | सेमी. |
| विद्युतचुंबकीय १/१०० | सगळेच्या सगळे विद्युत- | |
| १०$^{-५}$ | भारित कण(पार्टिकल्स) | १०$^{-५}$ इन्फिनिट |
| वीक १०$^{-३९}$ | सर्व पार्टिकल्स | सेमी |
| गुरुत्वाकर्षण | सर्व पार्टिकल्स | इन्फिनिट |

*** *** ***

आइन्स्टीन यांनी नील बोरना जे कोडे घातले होते त्याचे उत्तर त्या कोडयातच म्हणजे खुद्द आइन्स्टीन यांच्या जनरल रिलेटिव्हच्या थिअरीतच होते. आइन्स्टीन यांचा हा सिद्धांत गुरुत्वाकर्षणासंबंधी आहे. आइन्स्टीन यांची थिअरी असे सांगते की गुरुत्वाकर्षण शक्ती आणि काळ ही दोन्ही परस्परावलंबीत आहेत. गुरुत्वाकर्षण शून्य असेल तर काळसुद्धा शून्य असतो. आइन्स्टीन यांनी सुचविलेल्या प्रयोगाप्रमाणे



अनुक्रमणिका

गुरुत्वाकर्षण वगळून टाकले तर पेटीचे वजनच करता येणार नाही. गुरुत्वाकर्षण नाही तर पेटीचे वजनसुद्धा नाही. याचा अर्थ आइन्स्टीन यांनी जे समीकरण मांडले होते त्या समीकरणामध्ये गुरूत्वाकर्षणाची भर घातली गेली होती. गुरुत्वाकर्षणाचा घटक गाळून टाकताच पुंजवादाने सांगितलेली अनिश्चितता पुन्हा एकदा हजर होणार होती. आइन्स्टन यानी टाकलेला बार त्यांच्या स्वत:च्याच थिअरीमुळे फुसका ठरला होता.

तथापि एवढयावर थांबले तर ते आइन्स्टन कसले? कोठलाही थिॲराटिकल फिजिसिस्ट फक्त थिअरीवर केव्हाच संतुष्ट नसतो. आइन्स्टीन तर सर्वश्रेष्ठ थिॲराटिकल फिजिसिस्टपैकी एक होते. तेव्हां नुसता सिध्दांत घेऊन ते स्वस्थ वसणे शक्य नव्हते. सामान्यपणे प्रत्येक नव्या थिअरीने काही अंदाज (प्रेडिक्शन्स) वर्तवावे आणि प्रयोगान्ती ते सिद्ध व्हावेत अशी विज्ञानाची अपेक्षा असते. प्रयोगामुळे थिअरीचे खरेपण सिद्ध होते. वा ती खरी नाही हे तरी सिद्ध होते. थिअरीचा विचार गंभीरपणे करायचा तर तिची परीक्षा आणि तीसुद्धा प्रयोगान्ती परीक्षा झाली पाहिजे असे आइन्टीन यांचे मत होते. एखादी थिअरी समजा काही वस्तुस्थितीचे स्पष्टकरण देत असेल. परंतु विज्ञानात त्याला फार महत्त्व नसते. कारण त्या वस्तुस्तिथीचे स्पष्टीकरण द्यावे याच मुख्य हेतूने ती थिअरी तयार केली असल्याने ते स्पष्टीकरण तिच्याकडून मिळणार यात काहीच शंका असत नाही. म्हणून प्रत्यक्ष प्रयोगाचे महत्त्व; कारण तीच वस्तुस्थिती स्पष्ट करून सांगणारी दुसरी आणि तुलनेने अधिक चांगली थिअरीही असू शकते. दोन थिअरींमध्ये चांगली थिअरी कोठली हे शेवटी प्रयोगावरुनच सांगितले जाऊ शकते.

असो; तर बोर आणि हायझेन्बर्ग याना पेचात पकडून त्यांची थिअरी खोटी ठरवायचे स्वत:चे प्रयत्न आइन्स्टीन यांनी चालूच ठेवले. या खेपेस त्यांनी बोरीस पॉडोल्स्की आणि नाथन रोझेन आणखी दोघा फिजिसिस्टना मदतीला घेतले. या तिघांनी मिळून एक संशोधनपत्र तयार केले. या संशोधनपत्राचा मुख्य रोख पुंजवादातील अनिश्चिततेच्या तत्त्वावर होता. पुंजवाद म्हणत होता की पुंजवादातील अनिश्चितता अबाधित (ॲवसोल्यूट) स्वरूपाची आहे. तर आइन्स्टीन-पॉडोल्स्की- रोझन म्हणू पहात होते की ती आवाधित स्वरूपाची नाही.

ही अनिश्चितता अबाधित कशी नाही हे सिद्ध करण्यासाठी या त्रयीने एक नवा 'थॉट-एक्स्पिरिमेंट' रचला. थॉट एक्सपिरिमेंट म्हणजे मनाच्या प्रयोगशाळेत करून पहायचा प्रयोग. अशा प्रयोगात प्रयोगकर्ता.प्रयोगाचे समीकरण मनातल्या मनात मांडतो आणि त्या समीकरणातील पदे परस्परांना कोठे छेद देतात किंवा कसे याचा शोध घेतो. असे समजा की प्रत्येक थिअरी हा एक बंद नकाशा आहे. अशा वेळी त्या थिअरीने सूचित केलेला प्रयोग या नकाशाच्या आत राहून करावा लागेल. थिअरी काही बंधने सुचविते. आणि प्रयोग अर्थातच ती बंधने पाळून करावा लागतो. थॉटएक्सपिरिमेंटमध्ये प्रयोग करणारा ही बंधने ओलांडून जाता येतात काय याचा शोध घेऊ पहातो.

अनिश्चिततेच्या थिअरीचेच उदाहरण घेऊ. अनिश्चिततेच्या थिअरीने काही बंधने निश्चित केली आहेत. प्रयोगकार मग ही बंधने पार करता येतात काय याच शोध घेईल. हे प्रयोग म्हणजे बौद्धिक चाचण्याच असतात. अशा चाचण्या घेऊन वादग्रस्त थिअरी स्वत:शी कितपत सुसंगत आहे वा तिचा एकूण पल्ला किती आहे हे शोधले जाते. तर आइन्स्टीन यांनी बोरना एक नवा थॉट-एक्सपिरिमेंट सुचवला. या खेपेला आइन्स्टीन आणि पोडोल्स्की व रोझेन ही त्यांची सहकारी मंडळी. या सर्वांना पूर्ण खात्री होती की 'आपण जिंकणार आणि बोर हरणार. कारण नव्या थॉट-एक्सपिरिमेंटचे उत्तर आपल्या बाजूचे येणार असून या उत्तरावरोवरच पुंजवाद्याना कबूल करावे लागणार आहे की त्यांनी तयार केलेले वास्तवाचे नवे चित्र कायम टिकणारे नसून पून्हा एकदा जुने चित्र प्रस्थापित होणार आहे.'

आइन्स्टीन-पोडोल्स्की-रोझेन या त्रयीने सुचविलेला हा नवा बौध्दीक-प्रयोग पार्टिकल विश्वातील दोन पार्टिकल व्यवस्थेशी - टु पार्टिकल सिस्टिमशी– संबंधीत होता. टू पार्टिकल सिस्टीम ही एक वैशिष्ट्यपूर्ण सिस्टिम आहे. दोन पार्टिकल सिस्टिममधल्या पार्टिकल जोडी पैकी दोन्ही भागीदार पुढे जरी वेगवेगळ्या दिशांनी गेले आणि तसे ते जातातच तरी एकदा झालेली ओळख ते पुढेही कायम ठेवतात. कारण त्यांची मापे परस्पर संबद्ध असतात. तांत्रिक भाषेत बोलायचे तर असे म्हणता येईल की, पार्टिकल्सची जोडी फुटून दोन्ही पार्टिकल्स एकमेकांपासून जरी खूप दूर अंतरावर गेले तरी त्यांचे पोलरायझेशन (त्यांची विद्युत आणि चुंबकीय स्पंदने एका विशिष्टच दिशेत बांधलेली असतात.) कोन समान असतात. याचा अर्थ असा की, या पार्टिकल जोडगोळीतील एका पार्टिकलचे माप घेतले की तेच माप दुसऱ्याही पार्टिकलचे असेल असे आधीपासून सांगता येते.

पुंजवाद सांगत होता की अतिसूक्ष्म पातळीवर पार्टिकलची स्थिती प्रवेग यापैकी एका वेळी फक्त एक वर्तवता येतो. आइन्स्टीन प्रभृतींचा प्रयोग सांगत होता की टूपार्टिकल सिस्टिम वापरून या अडचणीवर मात करता येईल. टूपार्टिकल व्यवस्थेप्रमाणे जे माप एका पार्टिकलचे तेच दुसऱ्याही पार्टिकलचे असल्याने एका पार्टिकलची स्थिती शोधायची आणि दुसऱ्या पार्टिकलचा प्रवेग काढायचा. जे एकाचे माप तेच दुसऱ्याचेही माप हा नियम असल्याने या विशिष्ट प्रयोगात स्थिती आणि प्रवेग दोन्ही आपणाला एकाच वेळी मिळवता येणार आहेत. दुसऱ्या शब्दात, या प्रयोगामुळे अनिश्चिततेचे तत्त्व खोटे पडणार होते. फक्त एक खबरदारी घ्यावी लागणार होती. पार्टिकलच्या जोडगोळीतील दोन्ही पार्टिकल्स एकमेकांपासून खूप दूर अंतरावर असताना मापे गोळा करावी लागणार होती. म्हणजे एकाची माहिती दुसऱ्याला कळली असे घडणार नव्हते. आइन्स्टीन प्रभूतींनी सुचविलेला प्रयोग हा असा होता. या खेपेस आपण बाजी मारणार याची आइन्स्टीन वगैरेंना पक्की खात्री होती.

वरील चर्चा वाजवीपेक्षा अधिक अमूर्त झाली असावी असे वाटते. तेव्हा एक प्रत्यक्ष उदाहरण घेऊनच बोलू या. सबॲटॉमिक पार्टिकल्सचा क्षय होतो किंवा ती decay होतात

हे आपणा सर्वांना माहीतच आहे. येथे वापरण्यात आलेला 'डिके' हा शब्द शस्त्रीय अर्थाने वापरण्यात आला आहे. सबॲटॉमिक पार्टिकल्स स्वाभाविकपणेच अतिशय अस्थिर असतात. त्यामुळे त्यांचे डिस्इंटिग्रेशन होते किंवा त्यांचा क्षय होतो आणि ती पूर्वीपेक्षाही अधिक हलक्या दर्जाच्या पार्टिकलमध्ये रूपांतरीत होतात. या प्रक्रियेला 'डिके' हा शब्द वापरण्यात येतो. हा शब्द decadere या मूळ फ्रेंच शब्दावरून निघाला आहे. 'दिकॅदेर' शब्दाचा अर्थ 'To fall into' असा आहे. आपला नेहमीचा अणु न्युट्रॉन, इलेक्ट्रॉन आणि प्रोटॉन अशा तीन घटकांपासून बनलेला आहे. प्रोटॉन सोडून अन्य सगळ्या सबॲटॉमिक पार्टिकल्सचा क्षय होत असतो. प्रोटोन्सचाही क्षय होतो; परंतु इतर सबॲटॉमिक पार्टिकल्सच्या वेगाने नाही. इतर पार्टिकल्स जन्माला येतात न येतात तोच तो क्षय पावतात. प्रोटॉन्सचा क्षय इतक्या जलद होत नाही. इतर पार्टिकल्सच्या वेगाने जर का प्रोटोन्सचाही क्षय झाला असता तर पाया निखळून पडलेल्या इमारतीसारखी ही संपूर्ण सृष्टी कोसळून पडली असती. प्रोटोन्सचा क्षय होऊन त्यातून नवे हलके पार्टिकल्स उत्पन्न होतात त्याला विलंब लागतो. विश्वातील सगळ्याच्या सगळ्या प्रोटोन्सचा क्षय होणार आहे. ही गोष्ट जरी खरी असली तरी त्यासाठी $१०^{३१}$ वर्षे म्हणजे एकावर एकतीस शून्ये इतका अवधी जावा लागेल. इतका अवधी गेल्यानंतर विश्वातील सगळे प्रोटोन्स नष्ट झालेले असतील किंवा दुसऱ्या हलक्या दर्जाच्या पार्टिकल्समध्ये त्यांचे रूपांतर झालेले असेल. असो. तर चालू चर्चेच्या दृष्टीने महत्त्वाची गोष्ट म्हणजे पार्टिकल्सचा क्षय होतो आणि मूळ पार्टिकल्समधून नवी अधिक हलकी पार्टिकल्स बाहेर पडतात ही होय. आइन्स्टीन यानी सुचविलेल्या प्रयोगासाठी टू-पार्टिकल व्यवस्था आवश्यक होती. पॉझिट्रोनियम या पार्टिकलचा क्षय होताच अशी टू-पार्टिकल व्यवस्था मिळते. पॉझिट्रोनियमची पार्टिकल्स अतिशय अस्थिर असतात. म्हणजेच त्यांचा क्षय लगेच होतो. पॉझिट्रोनियमचा क्षय होताच त्यातून इलेक्ट्रोन आणि पॉझिट्रॉन (किंवा ॲंटी इलेक्ट्रॉन) ही दोन पार्टिकल्स बाहेर पडतात. पैकी पॉझीट्रॉन धनविद्युतभारीत आणि इलेक्ट्रॉन ऋणविद्युतभारीत असल्याने जन्माला येताच ती परस्परांचा संहार करून टाकतात. हे घडताच तेथे प्रकाशकणांच्या - पोटोन्सच्या- रूपात उर्जा बाहेर पडते. इलेक्ट्रॉन आणि पॉझीट्रॉन एकमेकाला गिळून टाकतात तेव्हा त्यातून ते फोटोन बाहेर पडतात; ते दोन असतात. म्हणजेच त्यांची जोडी असते. या जोडीतील एक एक फोटोन अवकाशाशी (स्पेसशी) विशिष्ट कोन करून दोन दिशांना उडत जातात (हेच पोलरायझेशन होय). पोलरायझेशन म्हणजे प्रकाशलहरींची प्रवास करण्याची दिशा. आपल्या उगमाशी कोन करून या लहरी प्रवास करतात. फोटोनची ही जोडगोळी एकदम जन्माला आलेली असल्याने जे माप त्यापैकी एका फोटोनचे तेच दुसऱ्याचेही असते. हे माप वस्तुनिष्ठ स्वरूपाचे असते. म्हणजेच हे माप कोण घेतो याच्याशी त्या मापाचा संबंध नसतो. अनिश्चिततेच्या सिध्दांताप्रमाणे सबॲटॉमिक पार्टिकल्सची मापे घेणारा त्या मापांवर परीणाम करीत असतो. व त्यामुळे स्थितीचे माप घेताना प्रवेगाचे माप बिघडवतो. जोडीने वावरणारी पार्टिकल्स



अनुक्रमणिका

पोलरायझेशनमुळे विरुद्ध दिशांना जात असल्याने एकाचे माप घेण्याच्या प्रयत्नाचा काहीही परिणाम दुसऱ्यावर होऊ शकत नाही. शिवाय दोन्ही पार्टिकल्समध्ये प्रचंड अंतर राखून मापे घ्यायची असल्याने निरोपाच्या देवाण-घेवाणीचाही संबंध रहात नाही. दोन्ही पार्टिकल्समध्ये आपण इतके अंतर ठेवू शकतो की जे प्रकाशाच्या वेगापेक्षा अधिक असेल. म्हणजेच तेवढे अंतर कापण्यासाठी आणि तत्काळ संपर्क साधण्यासाठी दोन्ही पार्टिकल्सना प्रकाशाच्या वेगापेक्षा अधिक वेगाने प्रवास करणारे साधन हाताशी घ्यावे लागेल. तसे साधन अस्तित्वात नाही. तेव्हा एका पार्टिकलच्या बाबतीत केल्या गेलेल्या प्रयोगाची हकीकत तावडतोव दुसऱ्या पार्टिकलला कळण्याची शक्यता नाही. आइन्स्टीन प्रभृतींची खरी भिस्त याच गोष्टींवर होती. पार्टिकल्सच्या जोडीतील एका पार्टिकलवर प्रयोग करताना दुसरे पार्टिकल विचलित होता कामा नये व तसे येथे घडू शकते हे आइन्स्टीन प्रभृतींच्या दृष्टीने महत्त्वाचे होते.

आइन्स्टीन प्रभृतींच्या पेचावर बोर यांनी दिलेले उत्तर अगदी साधे होते. बोर त्या त्रयीला म्हणाले, की तुम्ही सबॲटॉमिक येथे फोटोननामक पार्टिकलबद्दल गैरसमज करून घेतला आहे. तुम्ही असे समजत आहात की फोटोन हा फोटोनच आहे वा तो अन्य काही आहे हे पाहावयास जाणीवयुक्त कोणी हजर नसतानाही फोटोन अस्तित्वात असतो असे आपण समजत आहात. परंतु खरी वस्तुस्थिती यापेक्षा अगदी वेगळी आहे. अतिसूक्ष्म पातळीवरचे वास्तव आभासमय असते. हा आभास काय आहे हे शोधून काढण्याचा हेतू धरून जेव्हा निरीक्षक वा शोधक पुढे सरसावतो (फोटोन कोठे आहे वा तो काय करीत आहे या प्रश्नाचे उत्तर शोधण्यासाठी उपकरणसंच घेऊन पुढे येतो) तेव्हाच संभाव्य स्वरूपातील फोटोनचे रूपांतर प्रत्यक्षातल्या फोटोनमध्ये घडून येते. याचा साधा अर्थ असा आहे की, वास्तव कसे आहे याचा वेध घेण्यासाठी मानवी जाणीवशक्तीसारखे काहीतरी जर का अस्तित्वात नसेल तर वास्तवसुद्धा फक्त संभाव्य स्वरूपातच अस्तित्वात असेल. स्थूल स्तरावरील वास्तवाची अवस्था याच्या अगदी विरुद्ध आहे. स्थूल वास्तव वस्तुनिष्ठ अर्थाने अस्तित्वात असते. हे वास्तव दृष्टीसापेक्ष नाही. तुम्ही असा वा नसा, हे वास्तव असेलच. अतिसूक्ष्म स्तरावरील वास्तव भुरकट अवस्थेत असते. ही भुरकट अवस्था काय आहे हे शोधून काढण्यासाठी जोवर जाणीवयुक्त कोणी त्या चित्रामध्ये प्रवेश करीत नाही तोवर ती भुरकट अवस्थादेखील बदलत नाही. किंवा कोणी निरीक्षक त्या चित्रामध्ये प्रवेश करीपर्यंत पोलरायझेशनचा प्रश्नही उद्‌भवत नाही. याचा थोडक्यात अर्थ असा, की पोलरायझेशनच्या मुद्याला धरून आइन्स्टीन आणि त्यांची मित्रमंडळी जे काही मांडू पाहात होती ते सर्व गैरलागू होते. सुक्ष पातळीवरील वास्तव जर का वास्तवाच्या कायद्याप्रमाणे वागत असते तर मात्र इलेक्ट्रॉन जोडीतील एकाची मापे घेऊन दुसऱ्याबद्दल मत देता येणे शक्य झाले असते. परंतु इलेक्ट्रॉन कणाचे स्वरूप काय ही गोष्ट त्या कणाचे माप घेतानाच फक्त सिद्ध होत असल्याने जोडीने जन्मलेले इलेक्ट्रॉन एकमेकांशी कायम संधान ठेवीत असल्याने एकाचे माप घेण्याचा प्रयत्न

करताच दुसराही लगेच प्रतिक्रिया व्यक्त करतो. सारांश इलेक्ट्रॉन व्यवस्था विचलित न करता ( डिस्टर्ब न करता) एकाचे निरीक्षण करून दुसऱ्याबद्दल अंदाज देण्याचा मनसुबा यशस्वी होत नाही. आइन्स्टीन यांनी सुचविलेला प्रयोग अशा प्रकारे व्यर्थ ठरत होता. जोडीने वागणाऱ्या इलेक्ट्रॉन कणांची मापे घेता आली असती; परंतु मापे घेताना ते इलेक्ट्रॉन आपल्या परीने स्वतंत्र होते याची हमी मिळाली नसती.

नील बोर असा काहीतरी युक्तिवाद करतील असा आइन्स्टीन प्रभूतींचा होरा होताच! त्यामुळे त्यांना नव्या पेचात अडकवण्यासाठी त्यांनी आधीपासूनच मोर्चे बांधले होते साहजिकच बोर यांचे उत्तर येताच आइनस्टीन त्यांना म्हणाले की ठीक आहे अतिसूक्ष्म स्तरावर वास्तव केवळ संभाव्य स्वरूपात वावरत असते. आणि त्याचा ठाव घेण्यासाठी जेव्हा कोणी निरिक्षक पुढे सरसावतो तेव्हाच संभाव्यरूपाचे रूपांतर प्रत्यक्षरूपामध्ये घडून येते ही गोष्ट आम्हाला कबूल आहे. परंतु असे असले तरी एक महत्त्वाचे कोडे शेवटी शिल्लक राहतेच उदा. आपण पॉझिट्रॉनियम लघुकणापासून प्रारंभ केला. पॉझिट्रॉनियम लघुकणांचा ऱ्हास झाला. ऱ्हास होताच फोटोनची जोडी बाहेर पडली आणि पोलरायझेशन घडून दोघे दोन दिशांना उडत गेले. आपण त्याचे माप घेण्याचा प्रयत्न केला तर ते माप चुकीचे येते. कारण एकाला हात लावताच दुसऱ्यावर त्याची प्रतिक्रिया उमटते. आपण असे करू, आपण त्यांचे मापच घ्यायचे नाही. आपण त्यांना त्यांच्या दिशेने जाऊ द्यायचे. उडत उडत हे दोन्ही फोटोन सूर्यमालेच्या टोकांना पोहचतील. हे फोटोन सूर्यमालेच्या टोकांना पोहचल्यावर त्यांची मापे आपण घ्यायची. एका टोकावरची प्रयोगशाळा एका फोटोनचे माप घेईल तर दुसऱ्या टोकावरची दुसऱ्याचे. तुमचे ( बोर, हायझेन्वर्ग प्रभूती) म्हणणे असे, की जे माप एका फोटोनचे तेच दुसऱ्या फोटोनचे असेल. जर हे खरे ठरले तर त्याचा कोठल्या तरी अज्ञात मार्गाने त्या फोटोन्समध्ये संदेशाची देवाणघेवाण होत होती. कारण अशी देवाणघेवाण घडत नसती तर समान मापे येण्याची शक्यता नव्हती, तथापि दोन फोटोनमध्ये अंतरच इतके प्रचंड आहे की प्रकाशाच्या वेगापेक्षा अधिक वेगाने प्रवास करणारे साधन मिळाले तरच हे शक्य होईल. बरे फोटोनची मापे एकदम व एकाच वेळी घेण्यात येणार असल्याने व इतक्या शीघ्र गतीने संदेश पोहचविणारा संदेशवाहक उपलब्ध नसल्याने, एकाच्या मापाचा परिणाम दुसऱ्यावर घडण्याचा व ती व्यवस्था विचलीत होण्याचा प्रश्नसुद्धा उपस्थित होणार नाही.

बोर यांना अशाप्रकारे कोंडीत पकडताना आइन्स्टीन प्रभूतींना अगदी खात्री होती की असा संदेश दिला जाणे प्राय: अशक्य आहे. सूर्यमालेच्या एका टोकावरील फोटोनचे माप घेताच त्या मापाचे पडसाद दुसऱ्या टोकावरील फोटोनच्या मापावर उमटणे याचा अर्थ लंडन आणि मुंबईत एकाच वेळी चालू असलेल्या बिलिअर्डच्या खेळात लंडनमधील चेंडूवर फटका मारताच मुंबईतल्या खेळातला चेंडू बिळात जातो असा आहे. ही एक प्रकारची पैशाचिक लीलाच होय. परंतु या प्रकारच्या पिशच्चलीलेवर-- घोस्टली ॲक्शन ॲट अ डिस्टन्सवर कोणीच विश्वास ठेवणार नाही. काही ना काही दृश्य

साधन वापरल्यावाचून एकमेकांपासून खूप दूर अंतरावरील व्यवस्था परस्परांशी संपर्क बांधू शकत नाहीत हा दैनंदिन अनुभव आहे. दृश्य साधनावाचून काळ आणि अवकाशाचा अडथळा पार करता येत नाही हे सामान्य सत्य आहे.

जोडगोळीतील सुटे फोटोन जरी जोडीने वागतात तरी मधे प्रचंड अंतर असताना हे दोन्ही फोटोन परस्परांशी तत्काळ संधान साधतील आणि एकाची नक्कल दुसरा करील ही गोष्ट आइन्स्टीन यांना शक्य कोटीतील वाटत नव्हती. कारण खुद्द त्यांनीच मांडलेल्या स्पेशल सापेक्षवादाच्या तत्त्वांच्या ते विरुद्ध होते. स्पेशल सापेक्षतावादाच्या सूत्रांना अनुसरून त्यांनी जे प्रयोग केले होते त्यात त्याना असे आढळून आले की काळाचे स्वरूप काळ मोजणाराच्या गतीवर ठरते. काळ युनिफॉर्म वा सर्वत्र सारखा नसतो. म्हणजेच अवकाशात प्रवास करणारा जर का सूर्यप्रकाशाच्या वेगाने प्रवास करीत असेल तर त्याचे घड्याळ जागच्या जागी थांबल्यासारखे वागेल. घड्याळाचे काटे पुढेच सरकणार नाहीत.

प्रवासाला निघताना त्याचे घड्याळ समजा सहा वाजलेले दाखवीत असेल, तर पुढेही ते सहाच वाजलेले दाखवील. याचा अर्थ, त्याचे घड्याळ मागे पडेल. उलट पृथ्वीतलावरची घड्याळे त्याच वेळी पुढे गेलेली असतील. स्पेशल सापेक्षतावादाचे परीणाम लक्षात घेऊनच आइन्स्टीन असे म्हणत होते की सूर्यमालेतील परस्परविरुद्ध टोकांवर असणाऱ्या फोटोनची मापे घेतली तर ती एकसारखी येणार नाहीत. कारण सृष्टीमध्ये instantaneous communication अथवा 'झटक्यात संपर्क' ही गोष्ट असंभाव्य आहे. आणि ती असंभाव्य असल्याने एकदम एकाच वेळी वास्तवाचे संपूर्ण स्वरूप आपणास मापता येणार नाही, हे पुंजवाद्यांचे म्हणणे खोटे आहे. आइन्स्टीन प्रभृतींच्या म्हणण्याचा अर्थ हा होता, की बोर हे जी अडचण दाखवित होते आणि अनिश्चिततेच्या तत्त्वामुळे ते घडते असे म्हणत होते तो शास्त्रीय उपकरणांच्या मागासलेपणाचा परीणाम होता. कालांतराने पुंजवादाचे संशोधन पूर्णत्वाला गेले की हा प्रकार लुप्त होईल.

जोडगोळीने अस्तित्वात येणाऱ्या फोटोनपैकी एकाचे माप सूर्यमालेच्या एका टोकावर घ्यायचे आणि दुसऱ्याचे दुसऱ्या टोकावर घ्यायचे हा जो प्रयोग आइन्स्टीन यांनी सुचविला होता तशा प्रयोगाला 'थॉट एक्सपिरिमेंट' म्हणतात हा उल्लेख वर आलाच आहे. प्रत्येक उपपत्तीच्या काहीना काही मर्यादा असतात. 'बौद्धिक प्रयोगा'मध्ये अशा मर्यादांवर उत्तर निघते काय याचा शोध घेण्यात येतो.

प्रस्तुत बौद्धिक प्रयोगाच्याच संबंधात बोलायचे तर असे म्हणता येईल की आइन्स्टीन यांची उपपत्ती काळाच्या संबंधातील अडथळ्यांबद्दल बोलते तर अडथळ्यांवर उत्तर मिळते काय याचा शोध हा प्रयोग करणारा घेऊ पहातो. आइन्स्टीन प्रतिपक्षाला म्हणत होते की प्रकाशाच्या वेगापेक्षा ज्याचा वेग जास्त आहे असे सृष्टीमध्ये काहीही नाही. तेव्हा जर तुम्ही प्रकाशापेक्षा अधिक वेगाने प्रवास होऊ

ॲक्शन ॲट अ डिस्टन्स' असे म्हणता येण्यासारखी गोष्ट जर घडून येताना आढळून आली तर वरच्यापेक्षा जास्त लेव्हल दिसून येईल. दोनापैकी काही जरी आढळून आले तरी आईन्स्टीन आणि बोर यांच्यातला वाद संपुष्टात येणार होता.

आता फक्त एकच अडचण होती. दोन फोटोनमधल्या कोरिलेशनची लेव्हल कशी मोजायची? कारण तेव्हा या प्रकारचे तंत्रवैज्ञानिक ज्ञान उपलब्ध नव्हते. १९७० मध्ये हे तंत्र वैज्ञानिक ज्ञान सुद्धा उपलब्ध झाले. लॉरेन्स लिव्हमोर प्रयोगशाळेत काम करणाऱ्या दोन वैज्ञानिकांनी ते शोधून काढ़ले. जॅन एफ क्लॉझर आणि स्टुअर्ट फ्रिडमन ही त्यांची नावे. या दोघांनी जे प्रयोग चालविले होते त्यात त्यांना 'ॲक्शन -अट-अ-डिस्टन्स' अस्तित्वात असू शकते हे सिद्ध करणारा पुरावा सापडला. आपला प्रयोग त्यांनी प्रसिद्धही केला. परंतु विद्वज्जगामध्ये त्यांच्यावर अविश्वास दाखविला गेला; आणि वेल-सूचित प्रयोग होता तेथे राहिला.

आणखी काही वर्षे उलटली. १९८२ साल उजाडले. एव्हाना वेल यांनी सूचित केलेला प्रयोग करून पाहाण्याची तयारी झाली होती. कारण ॲलन आस्पेक्ट, जीन डॉलवार्ड आणि जेरार्ड रॉजर या तिघांनी अशा प्रयोगाला आवश्यक ठरणारे शास्त्रीय उपकरण बनविले होते. या उपकरणाच्या चाचण्यासुध्दा त्यांनी घेतल्या होत्या या पार्श्वभूमीवर आइन्स्टीन बोर वादाचा कायमचा निकाल लावण्यासाठी प्रयोग केला गेला. या प्रयोगासाठी जुळे फोटोन लागतात. हे जुळे फोटोन मिळविण्यासाठी पाऱ्याची वाफ वापरण्यात आली. पाऱ्याच्या वाफेवर लेझर किरणांचा मारा केला गेला. मारा करताच पाऱ्यातून फोटोनच्या जोड्या बाहेर पडल्या. मग सेकंदाचा एक बिलिअंथ (१,०००,०००,०००) इतक्या अंशात काम करणारे स्विचिंग मशीन वापरून पाऱ्याच्या कणातून बाहेर पडलेले जुळे फोटोन पोलराय करून, काही विशिष्ट यार्ड इतके अंतर पार करण्याच्या आत त्या पोलरायेशनचे माप घेतले गेले. हा प्रयोग त्यांनी एकदा नव्हे, दोनदा नव्हे तर अक्षरश: अगणित वेळा केला. आणि हे माप घेतले. हे माप त्यांना खूपच वरच्या बाजूला झुकणारे मिळाले. याचाच अर्थ इन्स्टॅन्टेस ॲक्शन-ॲट-अ-डिस्टन्स हा प्रकार खरा होता. स्थूल सरोवरातील आणि अतिसुक्ष्म स्तरावरील दोन्ही वास्तवे जर का स्थूल स्थरावरील भौतिक नियम पाळत असती तर या प्रकारची गोष्ट घडू शकली नसती. अतिसूक्ष्म स्तरावरील वास्तवा स्थूल स्तरावरील नियम पाळले नव्हते. म्हणजेच आइन्स्टीन हरले होते. बोर जिंकले होते. पुंजवादाने बाजी मारली होती.

वरील चर्चा फारच अमूर्त आहे असे वाटते म्हणून परिचित उदाहरणात हीच चर्चा मांडून पाहू. आस्पेक्ट प्रयोग आजही वादग्रस्तच आहे. म्हणजे आस्पेक्ट यांनी प्रयोग करताना हातचलाखी केली होती असे तज्ज्ञांना वाटते असे नव्हे. आस्पेक्ट यांनी केलेला प्रयोग शास्त्रीयदृष्ट्या ठीक होता असेच या सर्वांचे मत आहे. परंतु जोड फोटोन्समध्ये जे कोरिलेशन आस्पेक्ट शोधून दाखवत होते तो केवळ योगायोगाचा भाग असावा असे तज्ज्ञांचे मत होते. शास्त्रीय प्रयोगाची रीत ठरलेली आहे. तेथे आधी अंदाज

आणि मागाहून प्रयोगाने अंदाजाचा शहानिशा हे तंत्र वापरले जाते. परंतु आस्पेक्ट प्रयोगात हे तंत्र वापरता येत नाही. कारण फोटॉन्स मधल्या कोरिलेशनच्या बाबतीत अंदाज करता येत नाही. दुसऱ्या शब्दात पोलरायझेशनमध्ये नेमक्या कोणत्या खेपेस कोणता कोन येणार हे सांगता येत नाही.

हा प्रकार काय आहे हे एका साध्या उदाहरणाने दाखविता येईल. समजा तुम्हाला एक जादूगार भेटला; आणि त्याने मंतरलेल्या पत्त्याचे दोन जोड तुम्हाला दिले आणि सांगितले की जे पान तुम्ही उचलाल नेमके तेच पान दुसऱ्या जोडातूनही बाहेर निघेल. समजा इकडे तुम्ही चौकटचा राजा उचलला तर दुसऱ्या जोडातील जे पान तुम्ही उचलाल तेसुद्धा चौकटचा राजाच असेल. आता अशी कल्पना करा की हे जोड तुम्ही तुमच्या दोन मित्रांना दिले आहेत. पैकी एक आहे मुंबईतला आणि दुसरा न्यूयॉर्क येथला. पत्ते पिसलेले आहेत. त्यामुळे कोठला पत्ता कोठे आहे हे दोघांपैकी एकालाही अगोदर माहीत नाही. आधी ठरल्याप्रमाणे जेव्हा मुंबईतला मित्र पत्ता ओढतो त्याच क्षणी न्यूयॉर्क मधलाही मित्र पत्ता ओढतो. पत्ते ओढावयास सुरवात झाली नि दोघाही मित्रांच्या ध्यानात आले की जादूगार म्हणत होता त्याप्रमाणे पत्ते खरोखरच भारलेले आहेत. मुंबईतला मित्र जे पान ओढत होता तेच पान न्यूयॉर्कमधला मित्रही ओढत होता. फार कशाला या दोन्ही मित्रांना मुंबई न्यूयॉर्क मधल्या अंतरापेक्षा अधिक अंतरावरच्या शहरात जरी ठेवले तरीही ती जादू काम करीत होती. एकदा, दोनदा नव्हे; तर जितक्या वेळा त्यांनी पत्ते काढले तितक्या वेळा पहिल्यासारखेच घडले. याने राणी काढली तर त्यालाही राणी मिळाली. हा प्रकार पाहून तुम्हाला वाटू लागते की जादूचे रहस्य जर का आपण जाणू शकलो तर एका क्षणात दूरदूरच्या शहरांशी आपण संपर्क साधू शकू. तुम्ही जादूगारांना जादूचे रहस्य विचारता जादूगार सांगतो की पत्ते पिसून वापरले तरच जादू काम करते. पत्ते प्रथमपासून लावून ठेवले तर जादू काम करीत नाही. दुसऱ्या शब्दात हा सगळा प्रकार रँडम तत्त्वावर काम करतो. आखून घेतले तर तो काम करीत नाही. जे पान तुम्ही मुंबईत उचलाल तेच जरी न्यूयॉर्कमध्ये उचलले जाते हे खरे असले तरी जर का कोणते पान उचलणार हे ठरवून त्याप्रमाणे ते पान तुम्ही उचलले तर जादू काम करणार नाही. स्थळ व काळाच्या मर्यादा न जुमानणारी टेलिफोनयंत्रणा तुमच्यापाशी आहे. परंतु ती तुमच्या तंत्राने मात्र चालत नाही. एवढंच जादूची टेलिफोन लाइन हाताशी असूनसुद्धा तुम्हाला तिचा काडीमात्र उपयोग नाही. जोडीने जन्माला येणारे फोटॉन एकमेकांपासून कितीही दूर गेले तरी एकमेकांशी क्षणात संपर्क साधतात ही गोष्ट सिद्ध झाल्याने फक्त एकच गोष्ट सिद्ध होत होती आणि ती ही की प्रकाशापेक्षा अधिक वेगाने सिग्नल पाठविले जाऊ शकतात. प्रकाशाच्या वेगावर मात करता येते. नोबेल पारितोषक विजेते ब्रायन जोसेफन (Brian Josephson) यांचे या संपूर्ण प्रकरणावरचे भाष्य मोठे मार्मिक आहे. ते म्हणतात की, " या विश्वाचे समजा दोन वेगवेगळे भाग केले तर हे दोन्ही भाग कोठल्यातरी अगम्य प्रकारे एकमेकांना ओळखू शकतात, एकमेकांशी संधान प्रस्थापित करतात असे यावरून म्हणावे लागते."



अनुक्रमणिका

आइन्स्टीन आणि नील बोर या दोन प्रख्यात शास्त्रज्ञांमध्ये घडलेल्या एका वादाची हकीकत सांगण्यासाठी या लेखांचा प्रपंच आपण केला होता. आणि अनेक वळणे घेत आपण तो वाद शेवटी समजून घेतला. हा वाद पुंजभौतिकी आणि पुंजयामिकी या दोन नव्या विषयांशी संबंधित असल्याने ही वळणे घ्यावी लागली. कारण त्यात आलेल्या संकल्पना अगदीच नवीन आणि अपरिचित असल्याने मधेमधे थांबून व त्या संकल्पनांची माहिती मिळवून मगच आपण पुढे जाऊ शकत होतो.

संशोधन शास्त्रज्ञांची वर्गवारी करायची झाल्यास, शोधक अथवा डिस्कव्हरर किंवा काहीतरी नवीन शोधून काढणारे आणि मापे घेणारे अथवा मेझरर अशी ती करता येईल. शास्त्राच्या विकासासाठी वरील दोन्ही जातीचे शास्त्रज्ञ आवश्यक आहेत. परंतु या दोघांपैकी शोधक शास्त्रज्ञाला नेहमीच जास्त महत्त्व द्यावे लागते. कारण शोधक शास्त्रज्ञ सतत दुर्मिळ घटनेचा– फेनोमेनाचा शोध घेत असतो. असे काही अस्तित्वात आहे काय हे शोधून काढण्यासाठी त्याचे माप घेणारा शास्त्रज्ञ हा ज्या गोष्टी शोधून काढल्या गेल्या आहेत. त्यांचीच अधिकअधिक अचूक मापे मिळविण्याच्या कामात व्यग्र असतो. शास्त्राच्या विकासासाठी दोन्ही जातीचे शास्त्रज्ञ आवश्यक आहेत असे आपण म्हटले. तरी स्वभाव पाहाता शोधक शास्त्रज्ञ हे मापे घेणाऱ्या शास्त्रज्ञांपेक्षा स्वभावाने जास्त आक्रमक असतात असे म्हणावे लागते. हे अर्थात बरोबरच आहे. कारण तसे नसते तर काहीतरी नवीन मिळवावे म्हणून ते धडपडलेच नसते. शोधक शास्त्रज्ञ इतरांपेक्षा आक्रमक तर असतातच परंतु बरोबरच्याशी स्पर्धा करावयासही त्यांना आवडते. शिवाय ते भांडखोर असतात आणि आग्रही व अंहकारी देखील असतात. त्यामुळेच की काय, शोधक शास्त्रज्ञांना स्वतःच्या संशोधनाबद्दल सार्वजनिकरित्या बोलावयास आणि त्या संशोधनाची जाहिरात करावयास आवडते. प्रस्तुत चर्चेतील आइन्स्टीन व बोर हे दोन्ने शोधक शास्त्रज्ञांच्या वर्गात मोडणारे शास्त्रज्ञ आहेत. आइन्स्टीन व बोर यांच्यासारख्या मोठ्या शोधक शास्त्रज्ञांबद्दल सांगण्यासारखी दुसरी गोष्ट ही, की शोधक शास्त्रज्ञांची तुलना कलावंतांशी करावी लागते. कलावंत आणि या प्रकारचे शास्त्रज्ञ या दोघांमध्ये काही महत्त्वाची साम्ये दिसून येतात. कलावंताना ज्या प्रकारे भव्यदिव्य चित्राचे आकर्षण असते, तसेच आकर्षण शोधक शास्त्रज्ञानाही असते. कलावंत आणि शोधक शास्त्रज्ञ दोघेही नव्या नव्या व्हिजनच्या शोधामध्ये असतात. कलावंत आणि शोधक शास्त्रज्ञ जी व्हिजन्स निर्माण करतात त्या व्हिजन्सवर एकूण तीन गोष्टींचा प्रभाव असतो. एक म्हणजे त्यांच्या गुरुजनांच्या विचारांचा– त्यांनी दिलेल्या शिकवणुकीचा प्रभाव या व्हिजन्सवर असतो. दुसरी गोष्ट अशी की ज्या कालखंडामध्ये ही मंडळी जगत असतात किंवा ज्या कालखंडाची ती अपत्ये असतात त्या कालखंडाचा त्या कालखंडातील ऐतिहासिक, सामाजिक, आर्थिक, वैचारिक विचारसरणींचा प्रभावसुद्धा त्यांच्या व्हिजन्सवर असतो. आणि तिसरी गोष्ट अशी, की त्यांच्या स्वतःच्या वैयक्तिक आवडीनिवडी, त्यांच्या प्रॉक्लिव्हिटीज यांचाही प्रभाव त्या व्हिजन्सवर असतो.



अनुक्रमणिका

नील बोर यांचीच गोष्ट घ्या. बोर हे स्वभावाने अतिशय हट्टी होत. डोक्यात एखादी गोष्ट घेतली की शेवटपर्यंत तिचा पिच्छा ते सोडीत नसत. एका शब्दात बोर यांची वृत्ती ऑब्सेसिव्ह होती. या ऑब्सेसिव्ह स्वभावाचा संशोधनाच्या कामात त्यांना खूपच उपयोग झाला होता. ऑब्सेसिव्ह व्यक्ती अतिशय जिद्दीच्या व चिकाटीने काम करीत रहाणाऱ्या असतात. बारीकसारीक तपशीलामध्ये त्यांना रस असतो. त्यांच्यापाशी उत्तम प्रकारची मानसिक एकाग्रता असते. ऑब्सेसिव्ह स्वभाव म्हणजे नव्या कल्पनेने पछाडले जाणे व तसे पछाडले गेल्यावर न थकता त्या कल्पनेचा पाठपुरावा करू पाहाणे. आइन्स्टीन– बोर वादाच्या प्रकरणात दोघांच्याही ऑब्सेसिव्ह स्वभावाचा खेळ आपण पाहिलाच.

सूक्ष्म पातळीवरील वास्तव परस्परपूरक पद्धतीने वागते असे बोर यांचे मत होते. हेच मत हायझेन्बर्ग यांचेही होते. आइन्स्टीन यांना मात्र तसे वाटत नव्हते. त्यामुळे बोर-हायझेन्बर्ग एका बाजूला आणि आइन्स्टीन दुसऱ्या बाजूला अशी एक शर्यतच या तिघांमध्ये लागली होती. सूक्ष्म पातळीवरील वास्तव स्थूल पातळीवरील वास्तवापेक्षा वेगळ्याप्रकारे वागते असे बोर यांच्या निदर्शनास आले होते. स्थूलपातळीवरील वास्तवाचे वर्णन करताना नेहमीच्या बाळबोध पद्धतीने ते करता येते. परंतु सूक्ष्म पातळीवरील वास्तवाचे वर्णन करताना ही बाळबोध पद्धत उपयोगी पडत नाही., तेथे दोन वेगवेगळ्या बाजूने ते वर्णन करावे लागते नि त्यासाठी विरोधाभासात्मक प्रतिपादने वापरावी लागतात असे बोर म्हणत होते. तर आइन्स्टीन यांच्या मताने ही सगळी तात्पुरती अडचण होती. नवी उपकरणे शोधण्यात आली की ही अडचण दूर होणार होती.

बोर सबॲटॉमिक पातळीवरील वास्तवाबद्दल बोलत होते . आणि त्यांचे म्हणणे असे होते की या पातळीवरील वास्तव दोन वेगवेगळ्या प्रकारे वागते. ते भरीव वास्तवासारखे वागते. आणि लाटेसारखेही वागते. तसेच प्रयोगकर्त्याने निवडलेल्या प्रयोगसंचाशी या वागण्याचा संबंध असतो. प्रयोगकर्त्याने सबॲटॉमिक पार्टिकल्सचे भरीव गोळ्याचे रूप पाहाण्यासाठी प्रयोगसंच घेतला तर त्याला भरीव गोळ्यांचा अनुभव येतो. लाटा पाहाण्याचा प्रयोगसंच घेतला तर लाटांचा अनुभव येतो. साहजिकच एक वर्णन देऊन सबॲटॉमिक पार्टिकल्सचे वर्णन पूर्ण होत नव्हते . हे वर्णन पूर्ण करण्यासाठी दोन वेगवेगळी वर्णने द्यावी लागत होती. असो; तर सूक्ष्म वास्तवाच्या वागण्याचे वर्णन करण्यासाठी बोर यांनी परस्परपूरकत्वाच्या प्रमेयाचा अवलंब केला होता. स्थूल वास्तवबाबद्दल बोलणाऱ्या शास्त्राला क्लासिकल फिजिक्स किंवा जुनी भौतिकी म्हणतात. सूक्ष्म म्हणजे सबॲटॉमॅटीक पातळीवरील वास्तवाबद्दल बोलणाऱ्या शास्त्राला क्वॉंटम अथवा न्यू फिजिक्स अथवा पुंज भौतिकी म्हणतात.

परस्परपूरकत्व प्रमेय ही पुंजभौतिकीची देणगी होय. परस्परपूरकत्व प्रमेयाप्रमाणे सूक्ष्म वास्वाची एका वेळी दोन वर्णने द्यावी लागतात. दोन वर्णने दिली तरच ह्या वास्तवाचे वर्णन पूर्ण होते; कारण हे वास्तव एका वेळी दोन वेगवेगळ्या प्रकारे



अनुक्रमणिका

वागू शकते . ते भरीव कणांसारखे वागू शकते. तसेच ते लाटांसारखे सुद्धा वागू शकते. स्थिती व गती ही भौतिकी पदार्थांची दोन लक्षणे आणि स्थूल स्थरावर जी लक्षणे एकदम मापता येतात, तीच लक्षणे सूक्ष्म पातळीवर एकावेळी फक्त एक अशा प्रकारे मापावी लागतात. नील बोर यांनी ही वस्तुस्थिती वर्णन करण्यासाठी परस्परपूरकत्वाची संकल्पना मांडली. परंतु बोर यांचा स्वभाव आब्सेसिव्ह प्रकारचा असल्याने परस्परपूरकत्वाचे अस्तित्व त्यांना प्रत्येक गोष्टीमध्ये दिसू लागले.

*** *** ***

## भौतिकीप्रमाणे अन्यक्षेत्रात परस्परपूरकत्वाचे अस्तित्व

परस्परपूरकत्वाची संकल्पना बोर यांनी मुळात रचली ती एकोणिसशे: विशीत! प्रकाशाचे स्वरूप कणाचे आहे की तरंगाचे या वादग्रस्त प्रश्नाचे उत्तर म्हणून परंतु पुढे मात्र ही संकल्पना ते समोर दिसेल त्या प्रत्येक क्षेत्राला लावू लागले. अगदी भौतिकीबाहेरच्या क्षेत्रालासुद्धा त्यांनी ती संकल्पना लावली. क्वाँटम फिजिक्स अँड फिलॉसॉफी एसेज् १९५२-१९६२ पृष्ठ क्रमांक सातवर ते लिहितात की, "सजीवांच्या ठिकाणी आतून बाहेरून एक प्रकारचे पूर्णत्व आढळते. आणि तीच गोष्ट जाणीवयुक्त मनुष्यप्राणी आणि त्याची संस्कृती यांच्याही बाबतीत दिसून येते. सजीव आणि त्याच्या बाहेरचे भौतिक जग, किंवा व्यक्ती आणि त्या व्यक्तीच्या भवतालची संस्कृती ही दोन्ही मिळून एक पूर्ण तयार होते असे म्हणता येईल. हा सर्व प्रकार जर का काळजीपूर्वक आपण पाहिला तर तो परस्परपूरक आहे असे म्हणता येते. .......मी येथे दाखल्याच्या भाषेत बोलत आहे किंवा वरवरचे साम्य दाखवत आहे असे यावरून कोणी समजू नये. मला केवळ साम्यावर आधारीत तुलना अभिप्रेत नसून तार्किक संबंध अभिप्रेत आहे. अशाच प्रकारचे तार्किक संबंध इतरही दुसऱ्या क्षेत्रामध्ये शोधून दाखवता येतील."

सूक्ष्मपातळीवरील पार्टिकल्सचे वागणे स्पष्ट करण्यासाठी प्रथम बोर यांनी परपस्परपूरकत्वाची संकल्पना तयार केली होती. परंतु कालांतराने त्या विशिष्ट संकल्पनेने त्यांच्या कल्पनाशक्तीचा असा काही विलक्षण कब्जा घेतला की प्रत्येक ठिकाणी त्यांना पूरकत्वाच्या तत्त्वाचा साक्षात्कार होऊ लागला. मनुष्यप्राणी आणि त्यांची संस्कृती, प्राणी आणि त्या प्राण्यांचा परिसर सगळीकडे त्यांना परस्परपूरकत्वाच्या कायद्याचा खेळ दिसू लागला.बोर यांचा स्वभाव ऑब्सेसिव्ह होता आणि ऑब्सेसिव्ह स्वभावाच्या व्यक्ती एकदा एक कल्पना डोक्यात घेतली की त्या कल्पनाच्या नादी लागतात याचा उल्लेख वर आलाच आहे.

बोर यांना त्यांच्या संशोधनात हा एक नवाच थिमा (Thema)सापडला होता. आणि तो थिमा वापरून ते अनेक प्रकारची वस्तुस्थिती स्पष्ट करू पहात होते. थिमा हा एक

तांत्रिक शब्दप्रयोग आहे. थिमा म्हणजे अनेक गोष्टींना अथवा घडामोडींना लावता येईल असे सर्वसाधारण तत्त्व. शास्त्रीय विवेचनातून अशी अनेक सर्व साधारण तत्वे काढून दाखविता येतील. सृष्टी हे एक यंत्र आहे हे तत्त्व घ्या. हासुद्धा एक थिमाच होता. हा थिमा वापरून मानवी शरीरापासून ते सृष्टीपर्यंत सर्व प्रकारच्या घडामोडींचे स्पष्टीकरण देण्याचा प्रयत्न एके काळी केला गेला होता. बोर परस्परपूरकत्त्वाचे तत्त्व याच पद्धतीने वापरू पहात होते.

परस्परपूरकत्वाचे तत्त्व सुचित करून बोर यांनी एक प्रकारे नव्या ज्ञानमीमांसेचा पायाच घातला होता. कारण या तत्त्वाच्या मदतीने ते अनेक क्षेत्रातील कोडी उलगडून दाखवीत होते. प्रयोगशाळेत ते स्वत: करीत होते ते संशोधन घ्या, किंवा मानसशास्त्रातील काही कूट प्रश्न घ्या, किंवा तात्त्विक प्रश्नातील काही बौद्धिक अडचणी घ्या. किंवा जीवशास्त्रीय प्रश्नांच्या बाबतीतला एखादा वाद घ्या अथवा मानवी नैतिक क्षेत्रातील न्यायतत्त्व विरुद्ध प्रेम-तत्त्व यासारखा वाद घ्या; परस्परपूरकत्वाचे तत्त्व वापरून बोर त्या वादाची सोडवणूक करू पाहत. वरपासून खालपर्यंत पाहावे तेथे बोर यांना परस्परपूरकत्वाचा प्रभाव आढळत होता. लिऑन रोझेन फेल्ड हे शास्त्रज्ञ नील बोर यांच्यावर लिहिताना जे लिहितात तेच मग आपणाला पटू लागते. रोझेन फेल्ड म्हणतात की, ''परस्परपूरकत्वाच्या तत्त्वाच्या भौतिक क्षेत्रातील प्रभावाचे त्यांचे आकलन जसजसे वाढत गेले, तसतसे मानसशास्त्र वा जीवशास्त्र वा इतर दुसरी शास्त्रे यांच्यातीलही पूरस्परपूरकत्वाच्या तत्त्वाचा प्रभाव त्यांना पटू लागला. रोझेनफील्ड लिहितात की, ''बोर यांना परस्परपूरकत्वाचे सूत्र इतके काही महत्त्वाचे वाटत होते की या सूत्राची उदाहरणे ते भौतिकी वगळता अन्य बौद्धिक क्षेत्रातही हुडकू पहात'' (नील बोर्स् काँट्रिब्युशन टु एपिस्टिमॉलॉजी पृ. ४९).

आयुष्यातील अखेरची तीस वर्षे तर बोर यांनी परस्परपूरकत्वाच्या सूत्राचा जणू ध्यासच घेतला होता. संधी मिळेल तेथे ते परस्परपूरकत्वाच्या सूत्राबद्दल बोलण्याचा प्रयत्न करीत होते; नव्हे काही ना काही करून भाषणात हे सूत्र आणल्यावाचून ते राहत नसत. रोझेनफिल्ड लिहितात की, 'या सूत्राचा सर्वसाधारण संदर्भात उल्लेख करण्याची पहिली संधी त्यांना एका परिसंवादाच्या वेळी मिळाली. कोपेनहेगन येथे १९३२ मध्ये हा परीसंवाद घडून आला होता. विषय होता जीवशास्त्राचा. बोर त्या परिसंवादामध्ये एक वक्ते होते. भाषणात प्रथम त्यांनी प्रकाशाचे दुहेरी स्वरूप उलगडून दाखविताना परस्परपूरकत्वाचे तत्त्व कसे उपयोगी पडते हे सांगितले व मागाहून भौतिकशास्त्राचा विषय सोडून ते जीवशास्त्राकडे वळले. ते म्हणाले की, ''भौतिकशास्त्रातील अनेक प्रकरणात परस्परपूरक संबंध जसे दाखविता येतात तशाच प्रकारे जीवशास्त्रामध्येही ते दाखविता येतात.'' त्या प्रसंगी त्यांनी जे भाषण केले त्याचा सारांश पुढीलप्रमाणे देता येईल. ते म्हणाले, की जीवशास्त्र वा सजीवांशी संबंधीत कोठलेही शास्त्र घ्या, सजीवांचा जीवनव्यापार उलघडून दाखविण्यासाठी नेहमी दोन प्रकारची स्पष्टीकरणे वापरण्यात येतात. एक यांत्रिक स्वरूपाची कार्यकारणात्मक स्पष्टीकरणे व दुसरी

टिलिऑलॉजिकल स्पष्टीकरणे म्हणजेच अंतिम प्रयोजनावर अथवा फलितावर आधारीत केली जाणारी स्पष्टीकरणे (टिलिऑलॉजीकल स्पष्टीकरणांसाठी हेतुवादी स्पष्टीकरणे असा शब्दप्रयोग करता येईल. उदा. डोळा हे इंद्रिय घ्या. डोळा नसेल तर सजीवांना जीवन अशक्य होईल. तेव्हा डोळ्यांमुळे सजीवांची जी जैविक सोय होते ती सोय विचारात घेऊन जणू काही तोच हेतू गृहित धरून डोळा हे इंद्रिय तयार केले गेले असे म्हणणे म्हणजे हेतुवादी स्पष्टीकरण देणे होय). फक्त यांत्रिक स्वरूपाच्या कार्यकारणात्मक स्पष्टीकरणांमुळे सजीवांच्या जीवनव्यवहाराचा संपूर्ण उलगडा करण्यासाठी काही काही बाबतीत हेतुवादी स्पष्टीकरणेसुद्धा मदतीला घ्यावी लागतात. सजीवांच्या जीवनाचे प्रयोजन जर का हिशेबात घेण्यात आले नाही तर सजीवांचा अमुक अवयव असाच का, तो तसा का नाही इत्यादी प्रश्नांचा समाधानकारक खुलासा मिळत नाही. म्हणजेच यांत्रिक स्पष्टीकरणे आणि हेतुवादी स्पष्टीकरणे दोन्ही परस्परांना पूरक आहेत. बोर यांनी दुसरे उदाहरण शरीरातंर्गत रासायनिक आणि प्राकृतिक (केमीकल अँड फिजिकल) प्रक्रियांचे दिले होते. ते म्हणाले, की या दोन्ही प्रक्रिया परस्पराना पूरक आहेत असे गृहीत धरून जर का त्यांचा विचार केला तरच त्यांचा व्यवस्थित उलगडा होऊ शकतो. जर का आपण तसे केले नाही तर आपल्या आकलनामध्ये उणीवा राहातात.

१९३२ साली परस्परपूरकत्वाचा विषय फक्त तज्ज्ञांपाशीच ते बोलत होते. कालांतराने हा विषय त्यांनी सामान्यांच्याही पातळीला आणला. १९३६ साली कोपेनहेगन येथेच आणखी एक परिसंवाद झाला. परिसंवादाचा विषय 'निरनिराळ्या शास्त्रांमधील एकता' असा होता. याही परिसंवादामध्ये बोर यांनी भाग घेतला होता. या खेपेस 'कॉजॅलिटी अँड कॉम्प्लिमेंटॅरिटी' ('कार्यकारणभाव आणि परस्परपूरकभाव') या विषयावर बोर बोलले आणि जीवशास्त्र या विषयावर एक आंतरराष्ट्रीय चर्चासत्र घडले . याही चर्चासत्राला बोर हजर होते. या वेळी त्यांनी 'आण्विक भौतिकी आणि जीवशास्त्र' या विषयावर भाषण केले. अशा प्रकारे त्यांच्या मृत्युचा दिवस उजाडेपर्यंत अनेक ठिकाणी आणि अनेक वेळा परस्परपूरत्वाच्या तत्त्वावर बोर बोलले होते. तथापि प्रत्येक खेपेस बोर जरी परस्परपूरकत्व या एकच विषयावर बोलत होते, तरी त्यांचे दाखले वेगवेगळे असत हे कबूल करावयास हवे. उदा. १९३८ साली दुसऱ्या महायुद्धाला आरंभ होण्याच्या दोन तीन दिवसच आधी मानववंशशास्त्रज्ञांच्या समुदायापुढे त्यांनी एक भाषण दिले होते. त्या भाषणात मानवी समाजाच्या विविध अंगांमध्ये परस्परांना पूरक गुणधर्म कसे असतात याची फोड त्यांनी केली होती.

१९६० च्या ऑक्टोबरमध्ये २१ तारखेला कोपनहेगन येथे एक परिसंवाद झाला. या प्रसंगी बोर यांचा विषय होता 'युनिट ऑफ ह्यूमन नॉलेज.' याही प्रसंगी 'संस्कृती भिन्न भिन्न असल्या तरी त्या भिन्नतेमध्ये सुद्धा एक प्रकारची एकता कशी असते हेच त्या भाषणाचे प्रमुख सूत्र होते. या भाषणाच्या वेळी त्यांनी सामाजिक व राजकीय संदर्भही वापरले होते. सांस्कृतिकदृष्ट्या जी राष्ट्रे परस्परांपासून भिन्न असतात अशा



अनुक्रमणिका

राष्ट्रांमध्ये सामंजस्य व सख्य कसे निर्माण करता येईल हा त्यांच्या चिंतनाचा व चिंतनाचा विषय होता. १९५५ मध्ये रॉयल डॅनिश अॅकॅडेमी ऑफ सायन्सिस या संस्थेपुढे त्यांनी एक व्याख्यान दिले होते. या व्याख्यानाला त्यांचा मुद्दा 'भिन्न भिन्न संस्कृती भिन्न भिन्न प्रकारच्या वातावरणामध्ये वाढलेल्या असतात. त्यांच्या परंपरा व सामाजिक शैली वेगवेगळ्या असतात. हे सर्व विचारात घेता भिन्न भिन्न संसकृतीच्या आराखड्यात दिसणारा भेद (कॉन्ट्रास्ट) शेवटी परस्परपूरक असतो हा होता. परस्परपूरकत्वाच्या तत्त्वाने बोर कसे भारले होते हे दाखविण्यासाठी एवढी उदाहरणे पुरेशी आहेत.

बोर यांना केवळ प्रयोगशाळेत काम करून समाधान होत नसे. त्यांना प्रयोगशाळेतील निष्कर्ष बाहेरच्या जगातील अधिक व्यापक ज्ञानाशी जोडून दाखवावेसे वाटे. त्यामुळेच त्यांना अर्न्स्ट माख या दुसऱ्या एक भौतिक शास्त्रज्ञाप्रमाणे 'तात्त्विक चर्चा करणारा शास्त्रज्ञ' (फिलॉसॉफायझिंग सायंटिस्ट') असे म्हटले जाते. माख यांच्या प्रमाणेच बोर यांचीही महत्त्वाकांक्षा जगातील सगळ्या विषयाचे ज्ञान एका समान सूत्रामध्ये एकत्रित करावे अशी होती. सगळ्या गोष्टी शेवटी परस्परांना पूरक असतात हे ते समान सूत्र होय. 'युनिटी ऑफ नॉलेज' या एका विषयावर बोर यांनी जवळपास डझनभर लेख लिहिले आहेत. यावरून तो विषय त्यांना किती महत्त्वपूर्ण वाटत होता हे ध्यानात येईल.

बोर यांनी मांडलेल्या परस्परपूरकत्वाच्या तत्त्वाबद्दल शेवटी एवढेच म्हणता येईल की त्यांच्या विशिष्ट क्षेत्रामध्ये जरी हे तत्त्व मान्य झाले होते तरी ज्ञानाच्या इतर क्षेत्रातील मान्यवरांना ते मान्य झालेले नव्हते. भौतिकीमधील त्या तत्त्वाची उपयुक्तता जरी कबूल केली जात होती तरी इतर क्षेत्रांना हेच तत्त्व लावून पाहण्याची संशोधकाची तयारी नव्हती.

*** *** ***

परस्परपूरकत्वाच्या प्रमेयाने नील बोर कसे भारले गेले होते हे आपण पाहिले. कण आणि तरंग किंवा अखंडित्व आणि खंडितत्व (कंटिन्युइटी अॅंड डिस्कंटिन्युइटी) हाच विश्वाच्या रचनेचा अखेरचा ढाचा आहे याबद्दल त्यांची आता खात्री झाली होती. विश्वाच्या स्वरूपाबद्दलच्या या अंतीम चित्राने त्याना एवढे वेड लावले होते, की जीवनाच्या प्रत्येक क्षेत्रामध्ये ते अशा प्रकारच्या परस्परपूरक जोड्या पुढे शोधू लागले. या जोड्या एका बाजूने एकमेकाला विरोध करतात तर त्याच वेळी दुसऱ्या बाजूने पूर्णत्वही आणून देतात. उदा. द्रष्टा आणि दृश्य ही एक जोडी त्यांनी लावली त्यांच्या मताने दृष्टा आणि दृश्य ही दोन्ने परस्परांच्या विरोधातही उभे असतात आणि परस्परांशी सहकार्य करून एक नवे अधिक व्यापक सत्यसुद्धा तयार करतात. अशाच प्रकारची दुसरी जोडी त्यांना दिसली ती क्लासिकल भौतिकीमधील 'कार्यकारणभाव तत्त्वाची' (प्रॉबॅबिलिस्टिक कॉडॉलिटीची) ही दोन्ही कार्यकारण भावतत्त्वे आपापल्या परीने

अंतिम आहेत. म्हणजेच एकाचे विलिनीकरण दुसऱ्यात करता येत नाही. तथापि ही दोन्ही तत्त्वे हिशेबात घेतली तरच विश्वाचे वर्णन पूर्ण होत असते.

नील बोर यांना परस्परपूरकत्त्वाच्या प्रमेयामध्ये किती रस होता हे आपण पाहिले. आता महत्त्वाचा प्रश्न हा की या प्रमेयामध्ये किंवा थीम वा कल्पनासूत्रामध्ये त्यांना इतका रस का वाटत होता? आणि हे कल्पनासूत्र बोर हेच प्रथम वापरत होते की बोर यांच्याही पूर्वी हेच सूत्र वापरले गेले होते? या दोन प्रश्नांचे उत्तर मिळाले की आपला शोध पूर्ण होऊ शकेल.

परस्परपूरकत्वाच्या सूत्राची सर्वसाधारण कल्पना आपल्याला आता आलीच असेल. उदा. हे मुत्र सांगू पाहाते की वास्तवाचे पूर्ण वर्णन द्यावयाचे असेल तर ते विरोधाभासात्मक पद्धतीनेच द्यावे लागेल. ते नेहमीच्या एकेरीय पद्धतीने देता येणार नाही. उदा. द्रष्टा आणि दृश्य ही दोन वास्तवे घ्या. ही दोन वास्तवे मिळून द्रष्ट्याने पाहिलेले दृश्य असे एक अधिक व्यापक वास्तव तयार होत असते. नुसते दृश्य किंवा नुसता द्रष्टा एवढंच फक्त विचारात घेतल्यास काहीच निष्पन्न होत नाही. दृश्याशी जेव्हा द्रष्ट्याचा संबंध जोडला जातो तेव्हाच त्यातून नवे अधिक व्यापक वास्तव तयार होते. नव्या भौतिकीमध्ये तर हे अधिक प्रकर्षाने खरे असल्याचे आपण पाहिले आहे. नव्या भौतिकीप्रमाणे द्रष्ट्याचे स्थान वा पवित्रा न देता प्रयोगाच्या निष्कर्षसुद्धा देता येत नाही.

परस्परपूरकत्वाच्या सूत्राच्या बाबतीतला पहिला महत्त्वाचा प्रश्न हे सूत्र संपूर्णपणे नवीन होते की अंशत: नवीन होते? दुसऱ्या शब्दात परस्परपूरकत्वाच्या सूत्राची अन्य उगमस्थाने दाखविता येतात काय? या प्रश्नाचे उत्तर होकारार्थी देता येते. विज्ञानाचा इतिहास तपासला तर प्राचीन म्हटजे प्लेटोच्याही काळात एकतर्फी विचार करण्याऐवजी परस्परपूरक पद्धतीने विचार करण्याची पद्धती रूढ होती असे सांगता येते. इतक्या जुन्या काळात परस्परपूरकत्वासारखी अगदी नवी वाटणारी सूत्रे उलब्ध होती हे ऐकून कित्येकांना आश्चर्य वाटेल. परंतु त्यात आश्चर्य करण्यासारखे काही नाही. परस्परपूरकत्व हा एक थीमा आहे. थीमा म्हणजे व्यापक अर्थाची कल्पनासूत्रे. अशी कल्पनासूत्रे नेहमीच संख्येने कमी असतात आणि मानवी इतिहासामध्ये तीच तीच सूत्रे परत परत डोके वर काढतात. विज्ञानाने एव्हाना खूपच मोठी मजल गाठली आहे. विज्ञानाची एकूण प्रकृतीसुद्धा पूर्णपणे बदलून गेली आहे. मात्र तसे असले तरी विज्ञानामधील गर्भित कल्पनासुत्रे (अंडरलाइंग थिम्स) मोजकीच राहीली आहेत (Thematic Origins of Scientific Thought Gerald Holton हार्वर्ड युनि.१९८८).

मुद्दा असा की, बाह्य वेष बदलून जुनीच कल्पनासूत्रे पुन्हा पुन्हा येत रहातात. तर परस्परपूरकत्वाची कल्पना थेट सॉक्रेटिसच्याही आधी ग्रीक बौध्दिक विश्वामध्ये प्रचलित होती. उदा. बाह्य जगाचे जे ज्ञान द्रष्ट्याला होते ते द्रष्ट्यावर अवलंबून असते



अनुक्रमणिका

असे तेव्हाचे लोक समजतात. उदा. ग्रीक तत्त्ववेत्ता पायथागोरस आणि त्याचे अनुयायी असे समजत की आपण जेव्हा एखादी वस्तू पहातो तेव्हा आपल्या डोळ्यांतून बाहेर पडलेले किरण त्या वस्तुवर पडतात आणि त्यातून आपल्याला वस्तू-ज्ञान होते. एका शब्दात आपला डोळा आणि आपण पहातो ती वस्तू या दोहोत संपर्क–कॉन्टॅक्ट तयार होतो आणि असा संपर्क तयार झाल्यामुळे वस्तुज्ञान घडून येते. म्हणजेच डोळा आणि वस्तू दोन्ही परस्परसंबंधीत असतात; व ती परस्पर संबंधीत असल्यानेच वस्तुज्ञान होत असते. याचाच अर्थ असा, की वास्तव हे वस्तुनिष्ठ नसून ते व्यक्तिनिष्ठ आहे.

पायथागोरसवाद्यांप्रमाणेच आद्य भूमितीकार युक्लीड याने- सुद्धा हीच कल्पना मांडली आहे. डोळ्यांना युक्लीड आंधळ्याच्या काठीची उपमा देतो. तो म्हणतो, की हातातल्या काठीच्या मदतीने आंधळा मनुष्य सभोवतालच्या परिसराचा अंदाज घेत असतो. अगदी तीच गोष्ट मनुष्यप्राणीदेखील डोळ्यांच्या मदतीने करतात. डोळा ही जगाचा अंदाज घेण्याची आमची काठीच होय. काठी लांब करून आंधळा जगाचा अंदाज घेतो; तर डोळ्यांतील किरणे बाहेर फेकून आम्ही देखील जगाचा तसाच अंदाज घेतो. पायथागोरस किंवा युक्लिड हे अशा प्रकारे प्रकाशाच्या स्वरूपाबद्दल बोलतात. आणि त्यांनी मांडलेल्या उपपत्तींना 'एमिशन थिअरिज्' किंवा प्रकाशोत्सर्ग उपपत्ती म्हणतात. या सगळ्या उपपत्तींमध्ये जग पहाणारा (द्रष्टा) आणि [illegible] पहातो ते जग या दोघातला संपर्क (कॉन्टॅक्ट) अभिप्रेत आहे. डोळा किरण सोडतो, हे किरण वास्तवाला स्पर्श करतात, आणि त्यातून वास्तवाचे ज्ञान होते. प्लेटोच्या काळात या उपपत्तीला कलाटणी मिळाली. जुन्या उपपत्तीमध्ये अॅक्शन-अॅट-अ-डिस्टन्सची कल्पना गृहीत होती. किरण वस्तुवर पडतो आणि वस्तू काय आहे ते समजते, असे जेव्हा कोणी म्हणतो तेव्हा तो अॅक्शन-अॅट-अ-डिस्टन्स किंवा कसल्याही प्रत्यक्ष साधनाच्या मदतीविना आणि परस्परांच्या संपर्कात न येताच ज्ञान होते असे मानतो.

क्लासिकल भौतिकीमध्ये 'संपर्क न येताच ज्ञान होऊ शकते. या कल्पनेला स्थान नाही. म्हणजेच अॅक्शन अॅट अ डिस्टन्स' या कल्पनेला स्थान नाही. दोन वस्तू काही ना काही प्रकारे परस्परांना जोडल्या गेल्या तरच तेथे ज्ञान उत्पन्न होते असे विज्ञान मानते. प्लेटो म्हणतो की आपल्या आत जसा आत्म्याचा प्रकाश आहे तसाच प्रकाश, मग तो प्रकाश सूर्यापासून उत्पन्न होणारा असेल अथवा दिव्यापासून उत्पन्न होणार असेल, परंतु असा प्रकाश उत्पन्न होणारा असेल तरच वस्तुज्ञान होऊ शकते; अन्यथा नाही. प्रकाश हे प्लेटोने दोन वस्तु जोडणारे साधन मानले होते. किंवा प्लेटोच्या दृष्टीने प्रकाश हा कॉन्टॅक्ट फॉर्म होता आणि या फॉर्म मुळे द्रष्टा आणि द्रष्ट्याने पाहिलेली वस्तू एकत्र आली होती. आंतर प्रकाश आणि बाह्य प्रकाश दोन्ही प्रकाश एकमेकांच्या जवळ येतात ते एकमेकाला स्पर्श करतात व अशा प्रकारे आतले जग व बाहेरचे जग या दोन जगात सांगड घातली जाते. अशी सांगड घातली जाते तेव्हा ज्ञान उत्पन्न होते. असे प्लेटो सांगतो. जुन्या विचारसरणीला प्लेटोने येथे कलाटणी दिली होती असे आपणास दिसून येईल. अर्थात पूर्वीची विचारसरणी ज्ञान हे व्यक्तिनिष्ठ आहे असे मानत होती

तसेच ही विचारसरणी मुद्धा समजते. उदा. ज्ञानबोध घडून येण्यासाठी व्यक्ती आणि वस्तू किंवा द्रष्टा आणि दृश्य दोन्ही एकत्र यावयास हवेत असेच ही विचारसरणी म्हणते.

तथापि कालांतराने ह्या नव्या विचारसरणीतल्या काही तांत्रिक अडचणी उघड झाल्या. उदा. आतला प्रकाश आणि बाहेरचा प्रकाश एकत्र येतात किंवा बाह्य वस्तुचे चित्र बुबळावर उमटते आणि त्या चित्रामुळे बाहेरच्या वस्तुचे ज्ञान होत असते असे ही विचारसरणी सांगत होती. आता प्रश्न असा होता, की बुबुळ आकाराने अतिशय लहान असते, उलट बाह्य जगातल्या अनेक वस्तू उदा. डोंगर , वृक्ष इत्यादि आकाराने अतिशय प्रचंड असतात, अशा वेळी छोट्या बुबुळावर त्या अवाढव्य वस्तुंचे चित्र कसे उमटावे? त्यातून मग असा विचार बळावला की उजेडातल्या वस्तुंपासून अनेक प्रकाश किरण बाहेर पडतात आणि ते द्रष्ट्यापर्यंत जातात आणि त्यातून द्रष्ट्याला वस्तुज्ञान होत असते. याची दुसरी बाजू अशी, की जर का वस्तुकडून निघालेले प्रकाशकिरण द्रष्ट्यापर्यंत पोहचले नाहीत तर द्रष्ट्याला वस्तुज्ञान होत नाही. या सुधारीत विचारसरणीमध्ये द्रष्टा आणि दृश्य यापैकी वस्तुज्ञानातील द्रष्ट्याचे महत्त्व कमी करण्यात आले होते. सुधारीत विचारसरणीमध्ये प्रकाशाला स्वत:च्या हक्काने अस्तित्व आहे असे मानले गेले होते. द्रष्टा व दृश्य या दोघांमध्ये तोवर जो संबंध गृहित धरण्यात येत होता तो अशा प्रकारे नाकारण्यात आला. येथून पुढे थेट विसाव्या शतकापर्यंत प्रकाशाला वस्तुनिष्ठ अस्तित्व असे मानले जाऊ लागले. नील बोर यांनी या चित्राला धक्का दिला.

वीसाव्या शतकात प्रकाशाच्या रचनेबद्दल दोन उपपत्ती प्रचलीत होत्या. एका उपपत्तीप्रमाणे प्रकाश तरंगासारखा आहे असे मानले जात होते; तर दुसऱ्या उपपत्तीप्रमाणे तो कणांसारखा आहे असे मानले जात होते. (अनुक्रमे मॅक्स्वेल यांची विद्युतचुंबकीय उपपत्ती आणि आइन्स्टीन यांची पुंज-उपपत्ती) . पहिल्या उपपत्तीप्रमाणे प्रकाश हा एखाद्या सलग प्रवाहागत मानला जात होता. तर दुसऱ्या उपपत्तीप्रमाणे तो पुंज्या पुंज्यासारखा आहे असे मानले जात होते.

प्रकाशाचे वर्णन करणारी ही दोन्ही चित्रे परस्परविरुध्द आणि परस्परनिरपेक्ष होती. सलग, अखंड प्रवाह आणि तुकडे तुकडे ही दोन्ही वर्णने एकत्र करता येत नाही. एक तर एखादी वस्तू प्रवाहासारकी असू शकते किंवा ती तुकड्या तुकड्यासारखी असू शकते. परंतु ती प्रवाहासारखी आणि तुकड्यांसारखी दोन्ही असू शकत नाही. आइन्स्टीन यांच्याप्रमाणेच नील बोर यांनाही वाटत होते की हा विरोधाभास (पॅरडॉक्स) केवळ तात्पुरता असून अधिक संशोधनांनी यातील कोठले तरी एक वर्णन मागे शिल्लक राहील. परंतु पुढे त्यांच्या लक्षात आले की अंतिम वास्तवाचे वर्णन करणारी ही दोन्ही चित्रे सारखीच संयुक्तिक किंवा व्हॅलिड आहेत, तेव्हा त्यांनी दोन्ही चित्रे एकत्र करून वास्तवाचे वर्णन करण्याचा प्रयत्न केला. बोर यांनी प्रसृत केलेले परस्परपूरकत्वाचे



अनुक्रमणिका

प्रमेय म्हणजे हा प्रयत्न होय. बोर म्हणाले, की अतिसूक्ष्म वास्तवाचे वर्णन करताना प्रवाही आणि खंडित दोन्ही शब्दप्रयोग आवश्यक आहेत कारण या विशिष्ट पातळीवर वास्तव वस्तुनिष्ठ न राहाता ते परत एकदा व्यक्तिनिष्ठ बनते आणि प्रयोगकर्त्यांने वापरलेल्या संचाप्रमाणे प्रवाही वा खंडीत या दोनांपैकी एक निष्कर्ष देते. तर अतिसुक्ष्म वास्तवाचे वर्णन करताना बोर यांनी परस्परपूरकत्वाचे प्रमेय मांडले आणि पुढे ते त्या प्रमेयामुळे एवढे उत्तेजित झाले की अनेक बाबतीत त्यांना परस्परपूरकत्व दिसू लागले. १९२७ सालानंतर तर परस्परपूरकत्वाच्या कल्पनेचा प्रचार करण्याचेच काम त्यांनी जणू स्वत:च्या अंगावर घेतले होते. आणि हे करायचे तर रोजच्या वापरातील उदाहरणे शोधायची असे त्यांनी ठरविले होते. वास्तव एकच परंतु एकदा ते एका प्रकारे प्रतीत होत असेल व दुसऱ्या खेपेस दुसऱ्या प्रकारे प्रतीत होत असेल तर त्याचा अर्थ सब्जेक्ट आणि ऑब्जेक्ट किंवा द्रष्टा आणि दृश्य या दोघातली सीमारेषा वाटते तितकी स्पष्ट नाही. द्रष्टा आणि दृश्य या दोघातली सीमारेषा कशी पुसट आहे नि कधी ती इकडे तर कधी तिकडे सरकवावी लागते हे दाखविले की आपला मुद्दा स्पष्ट होईल असे वाटल्याने काठीच्या साहाय्याने अंधाऱ्या खोलीत वाट शोधणाऱ्या इसमाचे उदाहरण त्यांनी दिल्याचे आढळते. बोर म्हणतात, की अशा प्रसंगी वाट शोधणारा, जेथे तो वाट शोधत असतो, ती खोली आणि वाट शोधणाऱ्याच्या हातातील काठी तिन्ही जणू एकजीव बनतात. हात आणि काठी यांच्यातील नेहमीची सीमारेषा त्या क्षणी अगदी पुसट बनते. उदा. काठीची मूठ पकडून आपण जेव्हा खोलीचा अंदाज घेत असतो तेव्हा ती मूठ ही ती सीमारेषा असते. परंतु जेव्हा ती मूठ सैल सोडून आपण खोलीचा अंदाज घेतो तेव्हा आपण जणू काठीचाच अंदाज घेत आहोत असे भासते. सब्जेक्ट आणि ऑब्जेक्ट या कोटी (कॅटेगरी) वाटतात तितक्या भक्कम व कायम स्वरूपाच्या नाहीत; त्या सैल आहेत हे दाखवून देण्यासाठी बोर यांनी वरील रूपक वापरले आहे. परंतु गंमत अशी की हेच रूपक नेमक्या याच संदर्भात ग्रीकांच्या काळात येऊन गेले आहे. ग्रीकांनी प्रकाशोत्सर्गाची संकल्पना वापरली होती. तेथे काठी, काळोखी खोली वगैरेचे रूपक आलेले आहे. ग्रीकांच्या काळातील प्रकाशोत्सर्गाची कल्पना बोर यांनी कोठेतरी वाचली असावी. कारण तसे नसते तर सब्जेक्ट आणि ऑब्जेक्ट या दोघात अत्यंत निकट संबंध असतो आणि दोघांचा एकत्रित उल्लेख केल्यावाचून वस्तुस्थितीचे वर्णन पूर्णपणे होत नाही ही जी नव्या भौतिकीमधील परिस्थिती ती स्पष्ट करण्यासाठी त्यांनी नेमके हेच रूपक वापरले नसते.

जसजशी वर्षे उलटत गेली तसतसा परस्परपूरकत्वाच्या प्रमेयाच्या अचूकपणावरचा बोर यांचा विश्वासही वाढत गेला. १९५८ मध्ये लिहिलेल्या 'क्वाँटम फिजिक्स ॲन्ड फिलॉसॉफी' या नावाच्या निबंधात ते लिहितात की 'क्वाँटम फिजिक्समध्ये आज जी परिस्थिती उद्‌भवली आहे तशीच स्थिती इतर ज्ञानशाखांमध्येही उद्‌भवल्याचे आढळून येत आहे.' या शब्दातून बोर यांना काय सूचीत

करायचे होते हे समजून घेण्यासारखे आहे. कारण त्याच्यावरून परस्परपूरकत्वाच्या कल्पनेने ते कसे व किती भारले गेले होते हे ध्यानात येते.

बोर यांच्याबरोबर लिऑन रोझेनफेल्ड नावाचे एक गृहस्थ काम करीत असत. बोर आणि परस्परपूरकत्व याच्याबद्दल त्यांनी खूप लिहून ठेवले आहे. रोझेनफेल्ड म्हणतात की या कल्पनेचा बोर यांनी इतका ध्यास घेतला होता की भेटेल त्याला ते ती कल्पना समजावून सांगण्याच प्रयत्न करीत. फक्त ऐकणाऱ्याला डॅनिश भाषा बऱ्यापैकी अवगत असावी. ऐकणाऱ्याला डॅनिश भाषा अवगत असली की बोर त्याच्याशी 'छोट्या पुस्तकाबद्दल' ( द लिटिल बुक) बोलू लागत. या तथाकथित छोट्या पुस्तकाचे नाव 'द ॲडव्हेन्चर्स ऑफ अ डॅनिश स्टुडंट.' लेखक पॉल मार्टिन मोलर. मोलर हा एकोणिसाव्या शतकातील एक कवी आणि तत्ववेत्ता. मोलरच्या पुस्तकात बोरना सद्य:स्थितीचे म्हणजे ज्या विशिष्ट पेचप्रसंगात भौतिक शास्त्र तेव्हा सापडले होते त्या स्थितीचे प्रतिबिंब आढळले होते.

'ॲडव्हेन्चर्स' ही एका विद्यार्थ्याची कथा आहे. हा विद्यार्थी नोकरीच्या शोधात असतो. नोकरीच्या अनेक संधी त्याच्यापुढे चालून येतात. परंतु त्या संधीचा फायदा मात्र त्याला घेता येत नाही. कारण सांगताना तो विद्यार्थी म्हणतो की, "माझे प्रश्नच संपत नाहीत आणि प्रश्न संपत नसल्याने पुढे होऊन मी कोणतीही कृती करू शकत नाही. आणखी असे, की ज्या विशिष्ट परिस्थितीत मी सापडलो आहे त्या परिस्थितीचे विचार सारखे माझ्या मनात येत राहतात. एवढेच नव्हे तर त्या विचारांचाही विचार मी करीत रहातो. म्हणजे असे की मी विचार करतो आहे याच गोष्टीचा विचार माझ्या मनात सुरू होतो. असे करताना मनातल्या मनात मी मागे मागे जात रहातो. होता होता परिस्थिती हाताबाहेर जाते. पहिल्या 'मी' च्या मागे दुसरा 'मी' नि दुसऱ्याच्या मागे तिसरा मग चवथा मग पाचवा — या असंख्य 'मी' पैकी माझा खरा मी कोणता हेच मला आता उमजेनासे होते. तेव्हा हाच माझा खरा मी म्हणून एका मीपाशी मी थांबतो. परंतु मागे वळून पाहू लागताच त्या 'मी' च्या पाठी दुसरा 'मी' उभा असतो. आता माझे डोके गरगरू लागते. मला काही कळेनासे होते मला वाटू लागते की मी एका खोल खोल विवरात डोकावून पाहात आहे. विचारांचा अतिरेक होऊन डोके दुखू लागते.

एखादा विशिष्ट रस्ता निवडल्या वाचून मन त्या रस्त्याने प्रवास करू शकत नाही. परंतु रस्त्याची निवड करण्यापूर्वी त्या रस्त्याची कल्पना असावी लागेल. याचाच अर्थ एखादा विचार डोक्यात येण्याच्या आधी त्या विचाराचा विचार केला गेलेला असतो. परंतु जर का तसे असेल तर कोटलाही विचार विचारात घेतला जाण्यासाठी एका क्षणाचा अवधी आवश्यक धरला तरी त्या विचाराचा संबंध अनंताशी—इन्फिनिटीशी जोडावा लागेल. या विचारानेच मग अगदी डोके चक्रावून जाते. कोटलाही विचार उत्पन्न होण्याच्या आधीपासूनच तो विचार अस्तित्वात असतो हे जर खरे असेल तर 'विचार डोक्यात आला' या शब्दप्रयोगाला अर्थ तरी काय? मग आहेच गोंधळ (कॅन्ट्रॅडिक्शन)"

बोर यांच्या मताने क्वाँटम फिजिक्स ज्या बौद्धिक पेचप्रसंगात अडकले होते त्याचे हुबेहुब चित्र या कथेमध्ये सापडते. सबअॅटॉमिक पार्टिकल्स तरंगासारखी वागत होती, सबअॅटॉमिक पार्टिकल्स कणांसारखी वागत होती. सबअॅटॉमिक पार्टिकल्सच्या पातळीवरच्या वास्तवाचे वर्णन करताना आपण थांबायचे कोठे? तरंगसदृश्य वर्णनापाशी की कणसदृश्य वर्णनापाशी?

परस्परपूरकत्वाच्या तत्त्वाची उगमस्थाने शोधून काढताना वरील उदाहरण सोडता ज्या दुसऱ्या तीन बौद्धिक दिशा आपण पाहिल्या त्या तिन्ही शास्त्राशी संबंधित होत्या असे म्हणता आले असते. परंतु 'विद्यार्थ्यांचे पराक्रम' नावाखाली बोर जी कथा सांगत असत त्या कथेचा संबंध दूरान्वयानेही शास्त्र या विषयाशी जोडता आला नसता. उदा. ग्रीकांच्या काळातील प्रकाशाच्या रचनेबद्दलची कल्पना किंवा प्रकाश काम कसे करतो या बद्दलची नंतरच्या काळातील कल्पना किंवा खुद्द बोर यांनी प्रयोग शाळेत केलेले प्रयोग हे सर्व शास्त्र या नावाखाली बसविता येईल. परंतु या तीन गोष्टी सोडल्यास तुलनात्मक उदाहरणाच्या नावाखाली बोर यांनी जे काही मांडले होते ते शास्त्रीय चर्चेत बसले नसते. परंतु बोर यांना मात्र तीसुद्धा शास्त्रीय चर्चा वाटत होती. एवढेच नव्हे; तर परस्परपूरकत्वाच्या तत्त्वाचा सार्वत्रिक पुरावा म्हणून त्या तुलनात्मक उदाहरणाकडे ते पाहत असत. या ना त्या कारणाने त्यापैकी एखादे तरी उदाहरण प्रत्येक चर्चेमध्ये बोर आणीत असत. त्यांच्या बद्दलच्या आदरामुळे त्यांचे विद्यार्थी व सहकारी त्यांना विरोध करण्याऐवजी गप्प राहत. वरील विद्यार्थ्यांच्याच कथेचे उदाहरण घ्या. बोर यांना वाटत होते की विद्यार्थी आणि संशोधक दोघांच्याही मनाची स्थिती समान होती. दोघांनाही परस्परपूरक आणि परस्परव्यावृत्त अशा परिस्थितीचा अनुभव घ्यावा लागतो. मोलरच्या कथेतला विद्यार्थी म्हणतो की डोक्यात येणाऱ्या विचारांचे अंतिम उगमस्थान सापडत नाही. कारण एकाच्या पाठीमागे दुसरा, दुसऱ्याच्या तिसरा अशी न संपणारी मालिका विचारांमध्ये आढळते. यातील प्रत्येक विचार दुसऱ्याला पूरक असतो. आणि दुसऱ्याच्या कक्षेच्या बाहेरही असतो. त्यामुळे त्यांची गाठ बांधता येत नाही. बोर यांच्या मते क्वाँटम फिजिक्समधल्या संशोधकाची स्थिती बरोबर अशीच झाली आहे. संशोधकाला अतिसूक्ष्म वास्तवाच्या पलीकडे जाऊन त्या वास्तवाचे स्वरूप शोधून काढायचे आहे. म्हणजेच त्याला प्रकाशकिरणांचे तरंगासारखे स्वरूप आणि कणांसारखे स्वरूप या दोन्हीं स्वरूपांच्या पाठीमागे जायचे आहे. पण तो तरंग पाहू शकला तर त्याला कण पाहाता येत नाही. कारण तरंग आणि कण एकमेकांना पूरक आहेत. व पूरक असल्याने त्यांची गाठ बांधता येत नाही. विद्यार्थी आणि संशोधक या दोघांच्या मन:स्थितीची तुलना केल्यास त्यात साम्य नाही असेच कोणीही म्हणेल. परंतु बोर यांना मात्र त्यात साम्य दिसत होते, असो.

काही वर्षांमागे परस्परपूरकत्वाच्या तत्त्वाची उगमस्थाने धुंडाळण्याचा एक प्रयत्न झाला. त्यावेळी परस्परपूरकत्वाच्या तत्त्वाशी नाते सांगणारी पण शास्त्रीय क्षेत्राबाहेरची काही माहिती बाहेर आली. उदा. काही वर्षांमागे 'द अमेरिकन फिजिकल



अनुक्रमणिका

सोसायटी' आणि 'द अमेरिकन फिलॉसॉफिकल सोसायटी' या दोन संस्थांनी केवळ ऐतिहासिक कुतूहल म्हणून पुंजभौतिकीचा प्रारंभापासूनचा इतिहास शोधण्याचे ठरविले. या शोधाचा एक भाग म्हणून ज्या ज्या संशोधकांचा पुंजभौतिकीच्या विकासात हातभार लावला होता त्यांच्या मुलखती घेण्याचे ठरले. बोर हे तेव्हा हयात होते. त्यामुळे त्यांचीही मुलाखत घेतली गेली. त्यांची पाचवी मुलाखत १७ नोव्हेंबर १९६२ रोजी घेतली गेली. मुलाखत थॉमस एस् कहून (अमेरिकन इतिहासकार आणि वैज्ञानिक विषयांचा भाष्यकार. ' द स्ट्रक्चर ऑफ सायंटिफिक रेव्होल्यूशन्स' आणि 'एसेन्शिअल टेन्शन्स' या दोन नावाजलेल्या पुस्तकांचा कर्ता) आणि पिटर्सन या दोघांनी घेतली होती. पिटर्सन यांनी बोर यांचा मदतनीस म्हणून बरीच वर्षे काम केले होते. मुलाखतीमध्ये पुढील प्रश्नोत्तरे झाली.

**पि :** तत्त्वज्ञानाच्या इतिहासाबद्दल तुमचे मत काय आहे? स्पिनोझा, ह्यूम, कान्ट इत्यादींनी मानवी ज्ञानामध्ये भर घातली असे तुम्हाला वाटते काय? आणि भर घातली असे वाटत असल्यास कोणती भर घातली?

**नी.बो. :** चटकन उत्तर देता येण्यासारखे नाही, परंतु माझ्या लिखाणात ठिकठिकाणी या सगळ्या प्रश्नांची उत्तरे आली आहेत, असे मला वाटते.

**पि :** बर्कले या तत्त्ववेत्त्याबद्दल आपले मत काय आहे? बर्कलेबद्दलही तुम्ही लिहिले आहे काय?

**नी. बो. :** नाही. बर्कलेच्या विचारांशी माझा परिचय होता. प्रा. हॉफडिंग यांनी लिहिलेल्या तत्त्वज्ञाना विषयक ग्रंथामध्ये बर्कलेबद्दलचे काही उल्लेख मला मिळाले होते. परंतु तरीही तेथे फार मिळाले होते असे म्हणता येणार नाही.

**थॉमस कुहून :** या तत्ववेत्यांपैकी कोणाचे ग्रंथ आपण मुळातून वाचले होते काय?

**नी.बो. :** काहींचे वाचले होते. परंतु तत्त्वज्ञान हा विषय मी निवडलेला नव्हता ( येथे बोर काही क्षण स्तब्ध होतात आणि मग आश्चर्याने एकदम उद्गारतात की ). अरेच्चा! आता मला आठवू लागले. रूबिनशी माझी दाट मैत्री होती. (रूबिन हा बोर यांचा वर्गमित्र. पुढे त्याने मानसशास्त्रज्ञ म्हणून नाव कमावले) रुबिनने सांगितल्यावरून मी विल्यम जेम्स् या अमेरिकन मानसशास्त्रज्ञाचे ग्रंथवाचून काढले होते. मला वाटते की 'प्रिन्सीपल्स ऑफ सायकॉलॉजी' हे जेम्सचे पुस्तक मी वाचले होते. पण नुस्ते वाचले होते की एखाद्दुसरा परिच्छेद वाचला होता? काय वरं वाचले होते? जेम्सने ते अगदी सोपे करून सांगितले होते. एवढे मात्र खरे, हां आठवले 'द स्ट्रीम ऑफ थॉटस् - विचारांचा प्रवाह' या परिच्छेदामध्ये तो अगदी स्पष्ट म्हणतो की सगळ्या गोष्टी एकमेकांना लागून असतात. त्यामुळे त्या अलग करून त्यांचा अर्थ लावण्याचा प्रयत्न जर का आपण केला तर तो अर्थ बरोबर लागत नाही. अर्थाचा विपर्यास होतो. मला वाटते की आणखी खोलात जाऊन या आठवणीचा विचार करावयास हवा. विल्यम जेम्सच्या लिखाणाबद्दल मला निश्चित अधिक काहीतरी माहीत आहे. पण आता आठवत नाही. आता जे आठवले ते अगदी पहिल्याने आठवले. तेव्हा अनेकांशी अनेक विषयांबद्दल

मी बोलत असे. त्याच दिवसात 'तू विल्यम जेम्स वाच' असे रुबिन मला म्हणाला. विल्यम जेम्स मला खूपच आवडला.

**थॉ.कु. :** विल्यम जेम्सचे तुम्ही काय काय वाचले?

**नी.बो. :** बहुधा ते पुढे केव्हातरी असेल, मला आठवत नाही. तेव्हा मी खूपच कामात असे. कदाचित पुढे 'सरफेस टेन्शन' या विषयाचा अभ्यास जेव्हा मी करीत होतो (१९०५) तेव्हा वाचले असेल. किंवा कदाचित त्याच्याही नंतर वाचले असेल. बरोबर आठवत नाही.

**थॉ.कु. :** पण मॅन्चेस्टरच्या आधी नक्कीच असणार (१९१२)

**नी. बो. :** होय त्याच्या कितीतरी आधी.

हाच विषय आणखी खोलात जाऊन तपासावा अशी बोर यांची इच्छा होती. कारण मुलाखतकारांचा निरोप घेता घेता ते म्हणाले की आपण आणखी खोलात जाऊन पाहू. दुर्दैवाने पाचव्या मुलाखतीच्या दुसऱ्याच दिवशी आकस्मिकरित्या त्यांचे निधन झाले.

आता गंमत अशी की, परस्परपूरकत्वाची कल्पना बोर यांना विल्यम जेम्सची पुस्तके वाचून सुचली होती किंवा कसे या बाबतीत विद्वानांमध्ये दोन तट होते. एकाचे पुढारी होते के.टी. मेयर-आबिश आणि दुसऱ्याचे होते लिऑरांझेनफेल्ड-मेयर. आबिश यांचे म्हणणे असे की 'परपस्परपूरकत्वाच्या कल्पनेची चालना बोर याना विल्यम जेम्सच्या पुस्तकावरून मिळाली असणे शक्य आहे. १९२९ मधील एका लेखात बोर यांनी विल्यम जेम्स यांच्या 'द प्रिन्सिपल्स ऑफ सायकॉलॉजी (१८९०) या पुस्तकाचा उल्लेख केला होता. मुख्य म्हणजे या पुस्तकातील 'विचारांचा प्रवाह' हे प्रकरण त्यांनी वाचले होते. याच्या उलट रोझेनफेल्ड यांचे मत आहे. त्यांचे म्हणणे 'विल्यम जेम्सचे पुस्तक मेयर अबिश म्हणतात त्या कालखंडात बोर यांनी वाचले नव्हते, तर पुढे बऱ्याच वर्षांनंतर वाचले होते.'

साधारण १९३२ च्या दरम्यान मेयर अबिश आरि माझे रोझेनफेल्ड या दोघांचीही मते अप्रत्यक्ष पुराव्यावर आधारीत असल्याने खरे काय त्याचा निर्विवाद निर्णय करता येणे कठीण आहे. मात्र एक गोष्ट अगदी खरी आहे की बोर आणि विल्यम जेम्स या दोघांच्या कल्पनासूत्रांमध्ये कमालीचे साम्य आहे. मग बोर यांना ही कल्पना जेम्सकडून मिळाली असो अथवा त्यांना ती स्वतंत्रपणे स्फुरलेली असो. बोर यांच्या परपस्परपूरकत्वाच्या बाबतीत दुसऱ्या पर्यायाला थोडे जास्त महत्त्व आहे; तसेच दुसरा पर्याय जास्त गंमतीदारही आहे. कारण बोर यांना ही कल्पना स्वतंत्रपणे स्फुरली असेल असे मानले तर जेम्स यांना सुद्धा ती स्वतंत्रपणे स्फुरली होती. हे उघडच दिसून येते. आणि मग एक नवा प्रश्न आपल्यापुढे येतो. प्रश्न असा की एखादे महत्त्वाचे कल्पनासूत्र साधारणपणे एकाच वेळी ज्ञानाच्या विविध क्षेत्रामध्ये का व कशा प्रकारे महत्त्व पावते?



अनुक्रमणिका

बोर आणि विल्यम जेम्स यांच्या विचारातील साम्य पहाणे येथे रोचक ठरेल. विल्मय जेम्स म्हणतात की 'कोठलाही विचार आणि त्या विचाराचा मालक (थॉट अँड थिंकर) यांना एकमेकांपासून अलग करता येत नाही. विचार आणि विचारक, कर्ता आणि क्रिया, सब्जेक्ट अँड ऑब्जेक्ट ही दोन्ही जोडीने वावरतात. फक्त विचार वेगळा काढून तो वस्तुनिष्ठ बनवू म्हटले तर ते शक्य नसते. म्हणून कोठल्या परिस्थीतमध्ये एखाद्या विचाराचा विचार आपण करू पहात अहोत याच्याकडे दुर्लक्ष करून चालत नाही.'' कोठल्याही गोष्टीला आपण जी मानसिक प्रतिक्रया दाखवितो त्या प्रतिक्रीयेचा संबंध तोवर जगात आपण जेजे अनुभविलेले असते त्या सर्वांशी असतो. प्रत्येक वर्षी आपले जग बदलत असते. एके काळी ज्या चित्रांनी आपणाला मोहिनी घातली होती तीच पुढे कधी तरी पांकळ, व्यर्थ वाटू लागतात... हे झाले विल्यम जेम्स यांचे उद्गार. बोर सुध्दा साधारण याच प्रकारचे मत व्यक्त करताना आढळतात. ते म्हणतात की, ''आपण देत असलेले वर्णन वस्तुनिष्ठ असावे आणि आकलन सुसंगत असावे, असे जर वाटत असेल तर आपण जो पुरावा गोळा करीत असतो तो कोठल्या परिस्थितीत गोळा करीत आहोत याच्याकडे बारीक लक्ष ठेवावे लागते. हा नियम ज्ञानाच्या सर्व क्षेत्रांना सारखाच लागू आहे.''

जाणीवशक्ती (कॉन्शसनेस) घट्ट वस्तुसारखी घट्ट बनविता येत नाही. कॅक्रिटाइज्ड अँड अॅटोमाइज्ड या शब्दांना आणखीसुद्धा अर्थ आहे. जेम्स लिहितात की, जाणीवशक्ती प्रवाही असते. तुकडे तुकडे करून ती स्वत:च स्वत:ला पाहू शकत नाही. जाणीवशक्ती हा विचाराचा प्रवाह आहे. संज्ञेचा प्रवाह आहे किंवा व्यक्तिनिष्ट जीवनाचा प्रवाह आहे असे तिच्याविषयी म्हणता येईल. तथापि जाणीव शक्ती सलग असते तशीच ती खंडितही असते. वेळोवेळी तिचे सूर (टोन, क्वालिटी) बदलते. हे एकप्रकारे क्वॉंटम फिजिक्समधल्या क्वॉंटमच्या वागण्याप्रमाणेच आहे. लघुकण एकाच वेळी कणांच्या आणि सलग प्रवाहाच्या दोन्ही रूपात असतात. विचाराचे हे स्वरूप विशद करण्यासाठी जेम्स उडणाऱ्या पक्षाचे रूपक वापरतात. पक्षी काही वेळ उड्डाण करतो आणि मग काही वेळा झाडाच्या फांदीवर बैठक मारतो. विचारांचे स्वरूप तसेच आहे असे जेम्स सांगतात. तेथे सलग प्रवाह दिसतो. आणि टप्पेही दिसतात. जेम्स आणि बोर यांच्या कल्पनासूत्राची एवढी तुलना खूप झाली.

या ठिकाणी आपण 'कॉम्प्लिमेंटॅरिटी' ही संज्ञा कशी उत्पन्न झाली हाही प्रश्न विचारात घेऊ शकतो. ही संज्ञा पहिल्या प्रथम कोठे वापरली गेली होती? बोर यांनी ती १९२७ साली भौतिकशास्त्रात वापरली. भूमिती किंवा गणितातील Topology च्या शाखेतून किंवा आणखीसुद्धा काही ज्ञानशाखांकडून बोर यांना ही संज्ञा मिळाली असावी. कदाचित विल्यम जेम्स यांच्याकडूनही ती त्यांनी घेतली असणे शक्य आहे. निदान मेयर अविश यांच्या मते तरी ती त्यांनी जेम्स कडूनच घेतली होती. जेम्स यांचे 'द प्रिन्सिपल्स ऑफ सायकॅलॅजी ' हे पुस्तक बोर यांनी वाचल्याची लेखी नोंद आहेच. याच पुस्तकातील 'स्ट्रीम ऑफ थॉट' या प्रकरणाच्या आधीच्या ' द रिलेशन्स ऑफ

माइन्डस् टु अदर थिंग्ज' या प्रकरणात ही संज्ञा येऊन गेली आहे. बोर यांनी 'स्ट्रीम ऑफ थॉट हे प्रकरण वाचले होते. साहजिकच 'द रिलेशन्स हेही प्रकरण त्यांनी वाचले असणे शक्य आहे. या प्रकरणात जेम्स यांनी हिस्टेरिकल अनास्थेशियाच्या काही केसिसची चर्चा केली आहे. हिस्टेरिकल अनास्थेशिया हा मनाच्या आजाराचा एक प्रकार असून या आजारामध्ये आजाऱ्याची कान नाक डोळा त्वचा आदी इंद्रिये सुस्थितीत असूनही काम करेनाशी झालेली असतात. उदा. रुग्णाच्या नेत्रांना काहीही दुखापत झालेली नसते, तरी त्याला दिसत नाही. किंवा त्याचे कान धडधाकट असतात पण त्याला ऐकू येत नाही वगैरे. उन्मादावस्थेमुळे इंद्रिये बधीर झाल्याने आजारी झालेल्या रुग्णांची चर्चा करताना विल्यम जेम्स पिएर जाने व आल्फ्रेड बिने ( दोघेही फ्रेंच मानसचिकित्सक) या दोघांच्या संशोधनाची साक्ष काढतात. 'अन्कॉन्शस इन हिस्टेरिक्स' हे त्यांच्या या विषयावरील प्रकरणाचे उपशीर्षक. जेम्स म्हणतात की, 'जाने व बिने या दोघांनी उन्मादावस्थेमुळे विस्मरण घडून आलेल्या (हिस्टेरिकल ॲम्नेशिया) रुग्णाच्या बाबतीत एक गोष्ट निर्विवादपणे सिद्ध करून दिली आहे. आणि ती ही की या आजारामध्ये रुग्णाची संवेदनशक्ती काम करीत नाही आणि काम करतेसुद्धा. कारण एका पातळीवर संवेदन शक्ती लुप्त बनलेली असते, परंतु दुसऱ्या पातळीवर तीच संवेदनशक्ती कार्यक्षम असते. सारांश एकाच वेळी दोन संवेदन शक्ती उपस्थित असतात. एक सुप्तावस्थेत गेल्याने निद्रिस्त बनते तर दुसरी जागृत असल्याने काम करीत असते. मात्र संवेदन शक्तीच्या त्या दोन स्तरामध्ये माहितीची देवाणघेवाण होत नाही. अर्थात गरज पडल्यास दुसरी संवेदनशक्ती उपस्थित आहे हे प्रयोगाने सिद्ध करता येते. पिएर जाने यांनी असे काही प्रयोग केले होते. या प्रयोगात ते डिस्ट्रॅक्शन अथवा संबंधित रुग्णाचे लक्ष चालू विषयावरून दुसरीकडे वळवून घेण्याचे तंत्र वापरीत. उदा. उन्मादग्रस्त रुग्ण कुणा तिसऱ्या व्यक्तीशी बोलण्यात व्यग्र आहे आणि डॉक्टरकडे रुग्णाचे लक्ष नाही अशा वेळी डॉक्टर म्हणजे जाने हळूच त्या रुग्णाच्या पाठीमागे जात आणि रुग्णाचा हात लुळा झाला असेल तर हात वर कर अथवा कागदावर अमुक प्रश्नाचे उत्तर लिहून दे असे हळू आवाजात रुग्णाला बजावीत आणि रुग्ण त्याप्रमाणे वागे. याचा अर्थ रुग्णाच्या संवेदनशक्तीपैकी एक संवेदनशक्ती निद्रिस्त झालेली असली तरी दुसरी संवेदनशक्ती त्याच वेळी कार्यक्षमही असू शकते असा होतो. अशा प्रसंगी रुग्णाच्या शरीराचा जो भाग बधीर झालेला होता तो भाग डॉक्टरानी तपासला तर तो चालू स्थितीत असल्याचे आढळते. कित्येक वेळा रुग्ण दोन संवेदन शक्तीं पैकी एका संवेदनशक्तीमध्ये वावरतानाही आढळतो. जेम्स यांनी जाने यांनी उपचार केलेल्या ल्यूसी नावाच्या रुग्णाची हकीकत दिली आहे.

'ल्यूसी संमोहन निद्रेमध्ये (ट्रान्स) असताना तिच्या ओटीत जाने काही कागदाचे कपटे टाकीत. कपट्यांवर आकडे लिहिलेले असत. जाने नंतर ल्यूसीला सूचना देत की तीनच्या पटीतील आकडे ज्या कपट्यांवर असतील ते कपटे तुला दिसणार नाहीत. संमोहित अवस्थेतून बाहेर आलेल्या ल्यूसीला जेव्हा विचारण्यात येई की तुझ्या ओटीत

काय आहे तेव्हा १८,१२,९ इत्यादी तीनाच्या पटीतील आकडे दाखविणारे कपटे वगळून बाकीच्या कपट्यांची जंत्री ती देत असे. मात्र त्याच वेळी तिला बोलण्यात गुंतविले आणि अशा प्रकारे तिच्या संवेदनशक्तीचा वरचा स्तर काही ना काही कामात अडकवून ठेवला आणि तिला पूर्वीचाच प्रश्न विचारला तर ती तीनाच्या पटीतील आकडे असणारे कपटे उचलीत असे. अन्य कपटे गाळीत असे. याचा अर्थ, पहिल्या खेपेस तिच्या संवेदनशक्तीला एका अनुक्रमाच्या आकड्यांची जाणीव नव्हती; तर दुसऱ्या खेपेस दुसऱ्या अनुक्रमांच्या आकड्यांची जाणीव नव्हती. उदा. दोन, चार, आठ इत्यादी आकड्यांचे कपटे तिला दिसत नसत. सारांश एका वेळी ल्यूसीचे फक्त एक मन जागृत असे, असे यावरून म्हणता येते. एक मन जागृत असे एवढेच नव्हे तर दुसऱ्या मनाला पहिले मन काय करीत आहे हेही कळत नसे असेही आपण म्हणू शकतो....'

उदाहरणे देऊन विल्यम, जेम्स पुढे म्हणतात की ज्यांची संवेदनशक्ती कप्प्याकप्प्यात काम करते अशाही काही व्यक्ती जगामध्ये दिसून येतात. व्यक्ती एकच परंतु तिची संवेदनशक्ती मात्र निरनिराळ्या भागामध्ये विभागलेली आहे असा काहीसा हा प्रकार असतो. संवेदनशक्तीचे हे तुकडे एकाच वेळी परस्परांना चिकटून असतात आणि परस्परांपासून दूरही असतात. एवढेच नव्हे तर ज्ञानदेखील ते वाटून घेतात. म्हणजे असे की एक संवेदनशक्ती फक्त एकाच प्रकारचे ज्ञान साठविण्याचा प्रयत्न करते. तर दुसरी दुसऱ्या प्रकारचे; मात्र हे तुकडे परस्परांशी झगडत नाहीत. परस्परांना पूरक ठरेल अशाच प्रकारे त्यांचे वागणे असते. यातील एका संवेदन शक्तीकडे तुम्ही एखादा विशिष्ट विषय सोपवा. केवळ तेवढ्याच कारणाने इतर संवेदनशक्तीच्या कक्षेतून तो विषय बाजूला केला जाईल. भापेसारखा एखादा सामाईक उपयोगाचा विषय सोडल्यास प्रत्येक कप्पा आपापल्या परीने स्वतंत्र असतो. वरच्या स्तरावरील 'मी' ला जे माहीत असते ते खालच्या स्तरावरील 'मी' ला माहीत नसते, किंवा याच्या उलटही असू शकते.

विल्यम जेम्स यांच्या लिखाणातील हा परिच्छेद खूप मोठा असूनसुद्धा मी तो येथे घेतला कारण बोर यांच्या परस्परपूरकत्वाच्या तत्त्वाचे एक उगमस्थान हा परिच्छेद असू शकेल असे मला सुचवायचे आहे. जेम्स अर्थात मानवी मनोव्यापारांबद्दल बोलतात. आणि बोर सबॲटॉमिक पार्टिकल्सबद्दल. परंतु दोघांचे सूत्र समान म्हणजे परस्परपूरकत्वाचे आहे.

## ख्रिश्चन बोर आणि हॅरॉल्ड हॉफडिंग

जेम्स आणि बोर दोघेही ज्या परस्परपूरकत्वाच्या कल्पनेबद्दल बोलतात ती कल्पना म्हटले तर भौतिक असण्यापेक्षा अतिभौतिकच (मेटॅफिजिकल) अधिक आहे. बोर यांना या जातीच्या म्हणजे अतिभौतिक जातीच्या कल्पनांचे जणू नैसर्गिक आकर्षण



अनुक्रमणिका

होते. कारण त्यांच्या वडिलांना–ख्रिश्चन बोर यांना अशा प्रकारच्या तात्त्विक कल्पनांची प्रचंड आवड होती. तीच आवड नील बोर यांच्यामध्ये उतरली होती. नील बोर यांना तात्त्विक कल्पनांचे बालपणापासून कमालीचे वेड होते. एखादी तात्त्विक कल्पना त्यांना आवडली की त्या कल्पनेव्यतिरिक्त दुसरे काहीच त्यांना सुचत नसे. ऑस्कर क्लेन नावाच्या गृहस्थाने नील बोर यांच्या काही आठवणी लिहून प्रसिद्ध केल्या आहेत. क्लेन हे बोर यांचे शास्त्रीय संशोधनातील अनेक वर्षांचे सहकारी. त्यांच्या पुस्तकाचे नाव, 'ग्लिम्सिस ऑफ नील बोर अॅज अ सायंटिस्ट अँड थिंकर पुस्तकात क्लेन म्हणतात की, ''नील बोर आणि त्यांचा गणिती भाऊ हॅराल्ड या दोघांच्याही म्हणण्याप्रमाणे बालपणी नील बोर स्वभावाने अतिशय भावडे होते. परंतु त्याचबरोबर त्यांचा स्वभाव तेवढाच उत्कटही होता. एखाद्या गोष्टीवर त्यांचा विश्वास बसला आणि तो अगदी सहजगत्या बसत असे– की तो ठाम असे. त्याना ज्या ज्या व्यक्तीबद्दल आदर असे त्यांच्या तोंडून त्यानी काही ऐकले तर ते त्यांना परमेश्वरी सत्य वाटे. स्वत:च्या डोळ्यांनी ते जे पाहात तेही त्यांना तितकेच खरे वाटे. शाळेत धर्म हा त्यांना सक्तीचा विषय होता. देव आणि धर्म यांच्या संदर्भात त्यांचे शिक्षक त्यांना जे सांगत ते त्यानां शब्दश: खरे वाटे. त्यांचे आई वडील फारसे भाविक नव्हते. त्यामुळे शिक्षकांनी सांगितलेल्या गोष्टी आपल्या आईवडिलांना पटत नाहीत याचे त्यांना वैषम्य वाटे. पुढे मोठेपणी त्यातील अनेक गोष्टींबद्दल त्यांना स्वत:लाच शंका वाटू लागल्या, परंतु तेथेही त्यांच्या स्वभावातील उत्कटपणा लपत नसे. शंका घेताना ते मग दुसऱ्या टोकाला जाऊ पहात. त्यांच्या मनाचा तात्त्विक पिंड असा तयार झाला होता.

नील बोर यांचे वडील व्यवसायाने शरीरशास्त्राचे प्राध्यापक होते. परंतु त्यांनाही तात्त्विक विषयांमध्ये कमालीचे स्वारस्य वाटत असे. आणि हाच गुण नील बोर यांनी उचलला होता.

नील बोर यांच्या वडिलांचे नाव ख्रिश्चन बोर. ते कोपेन हेगन विद्यापीठात प्राध्यापक होते. ख्रिश्चन बोर यांना तात्त्विक चर्चा आणि वादविवाद मनापासून आवडत असत. नोकरीत असताना एकोणीसाव्या शतकातील एका गाजलेल्या वादामध्ये त्यांना भाग घ्यावा लागला होता. व्हायटॅलिझमचे पुरस्कर्ते विरुद्ध मेकॅनिस्टिक तत्त्वप्रणालीचे पुरस्कर्ते या दोघांतला तो वाद होता. व्हायटॅलिझम किंवा चैतन्यवाद्यांचे म्हणणे असे होते की मनुष्यप्राण्यांचे शरीर हे जरी यंत्रासारखे काम करते तरी अंतीम अर्थाने मनुष्यप्राणी हा चैतन्याचा अंश आहे. उलट मेकॅनिस्टीक तत्त्वप्रणालींच्या पुरस्कर्त्यांचे म्हणणे असे होते की यंत्र हे नेहमी यंत्राच्या कायद्यानुसारच काम करत असते. तेथे चैतन्याचा संबंध येत नाही. मानवी शरीर भौतिक आणि रासायनिक पदार्थांपासून बनलेले आहे. भौतिक आणि रासायनिक पदार्थ त्यांच्या त्यांच्या कायद्यांनुसार काम करतात. अशा परिस्थितीत जे मानवी व्यवहार भौतिक व रासायनिक कायद्यांनुसार चालतात त्यांचे स्पष्टीकरण देण्यासाठी या कायद्यांपलिकडच्या



अनुक्रमणिका

चैतन्यात्मक गूढ तत्त्वाची मदत घेण्याची गरज नाही. विद्यापीठातील कामाचा भाग म्हणून खिश्र्चन बोर त्या वादात पडले होते तरी असे वाद त्यांना मनापासून आवडत असत, हीही गोष्ट खोटी नाही. नील बोर हे त्यांच्या वडिलांचीच नवी आवृत्ती असल्याने त्यांनाही असे वाद आवडत असत. वडिलांचे ग्रह आणि आग्रह तेच त्यांचेही ग्रह आणि आग्रह असत. कुमार-व यापासूनच वडिलांच्या प्रयोगशाळेत ते काम करीत असत. तेथे अनेक नव्या नव्या गोष्टी त्यांना पहावयास व अनेकदा हाताळावयास सापडत. शिवाय त्यांच्याकडे त्यांच्या वडिलांशी तात्त्विक गप्पा मारण्यासाठी प्रा. हॉफडिंग यांच्यासारखे तेव्हांचे नामांकित प्राध्यापक येत असत. मोठ्यांच्या बैठकीत बसतो म्हणून नील बोरना कुणी बोलला नसल्याने नेहमीच ते अशा चर्चा ऐकावयास बसत. आताच ज्यांचे नाव घेतले ते प्रा. हॅरॉल्ड हॉफडिंग हे तर त्यांच्या घरातल्या कुटुंबीयांसारखेच असल्याने नीलला ते अशा बाबतीत प्रोत्साहनसुद्धा देत असत. या चर्चांचा आपल्यावर फार मोठा परिणाम झाला होता, असे नील बोर यांनी लिहूनही ठेवले आहे. नील बोर यांच्या शास्त्रीय लिखाणामध्ये जो मेटॅफिजिकल अथवा केवळ तात्त्विक स्वरूपाचा अंश आढळतो त्याचा उगम या चर्चांमध्ये असावा. प्रत्येक घटनेत तात्त्विक अर्थ शोधण्याची जणू सवयच त्यांच्या मनाला लागली होती. नील बोर यांच्या व्यक्तित्वावर त्यांचे वडील ख्रिश्चन बोर आणि तत्त्वज्ञानाचे प्राध्यापक हॅराल्ड हॉफडिंग या दोघांचाही प्रभाव होता याचा उल्लेख वर आलाच आहे. ख्रिश्चन बोर हे जरी शास्त्रीय विषयातले प्राध्यापक होते तरी प्रयोगशाळेबाहेर ते तत्त्वचिंतकच राहिले होते. त्यांच्याबद्दल बोलताना प्रा. हॉफडिंग म्हणतात की प्रयोगशाळेत काम करताना भौतिक व रासायनिक म्हणजेच शास्त्राच्या पद्धतींना धरून ते वागत असत; मात्र एकदा का ते प्रयोगशाळेच्या बाहेर पडले की ती शास्त्रीयवृत्ती ते खुंटीला टांगून ठेवीत आणि मग मानवी जीवनावरचे भाष्य असो वा जीवनविषयक दृष्टीकोन असो ते तात्त्विक शैलीचा आश्रय घेत असत. किंबहूना त्यांना विरोधाभासात्मक शैलीतच स्वत:चे विचार मांडता येत असत. साधे सरळ प्रतिपादन त्यांना कधीही जमले नाही. नील बोर हे सुद्धा विरोधाभासात्मक प्रतिपादनशैलीसाठी प्रसिद्ध आहेत. प्रा. हॉफडिंग यांचे शब्द विचारात घेतल्यास ही शैली त्यांनी त्यांच्या वडिलांकडून घेतली होती असे आपण म्हणू शकतो. ऑस्कर क्लेन यांच्या पुस्तकात या संबंधी काही किस्से आले आहेत. क्लेन म्हणतात की, सजीव प्राण्यांच्या जीवनपद्धतींचे स्पष्टीकरण देताना एकाच वेळी ते म्हणजे कार्यकारणभावावर आधारीत आणि टिलिऑलॉजिकल म्हणजे उद्दीष्ट विचारात घेऊन दिलेले अशी दोन्ही प्रकारची स्पष्टीकरणे देऊ पाहू. टिलिऑलॉजिकल स्पष्टीकरण– हेतूवादी स्पष्टीकरण– अंतिम उदिष्ट किंवा अखेरचा परिणाम जमेस धरून संपूर्ण प्रक्रियेचे स्पष्टीकरण देऊ पाहणे. हेतूवादी स्पष्टीकरण दोन प्रकारची असतात. एका प्रकारामध्ये फंक्शन अथवा कार्य हिशेबात घेऊन स्पष्टीकरण देण्यात येते. उदा. हात, पाय, किंवा डोळा हे अवयव घ्या. फंक्शनल स्पष्टीकरण देणारा 'हाताचे कार्य कोणते' इत्यादी प्रश्न विचारील. या प्रश्नांचे उत्तर म्हणजे फंक्शनल



अनुक्रमणिका

स्पष्टीकरण. हेतूवादी स्पष्टीकरणाच्या दुसऱ्या प्रकारात पर्पज –उद्दिष्टाचा शोध लावला जातो. एखाद्याने चोरी केली तर त्या प्रकारच्या स्पष्टीकरणात चोराने चोरी का केली असा प्रश्न विचारण्यात येतो. समजा या प्रश्नाचे उत्तर आले की त्याला भूक लागली होती आणि म्हणून त्याला हॉटेलात जावयाचे होते. तर त्याला भूक लागली होती नि त्याला हॉटेलात जायचे होते. हे उत्तर हा पर्पजिव्ह टिलिऑलॉजिकल स्पष्टीकरणाचा नमुना होता.

टेलॉस म्हणजे एंड– उद्दिष्ट. लॉगॉस म्हणजे वाद. टिलिऑलॉजी म्हणजे हेतूवाद. उद्दीष्ट, हेतू, प्रयोजन इत्यादी हिशेबात घेऊन दिले जाणारे स्पष्टीकरण. हेतूवादी स्पष्टीकरणे सामान्यतः वर्णनात्मक स्पष्टकीरणांमध्ये मोडतात. या स्पष्टीकरणांमध्ये व्हाय अथवा कशासाठी या प्रश्नाला जागा असत नाही. उदा. ही स्पष्टीकरणे डोळा, नाक, कान, हातपाय ह्या अवयवांचा प्राण्याना उपयोग काय या प्रश्नांचे उत्तर देतात. परंतु मुळात हे अवयव प्राण्यांना का असावेत या प्रश्नांचे उत्तर ही स्पष्टीकरणे देत नाहीत. 'कॉजल' अथवा कार्यकारणभावात्मक स्पष्टीकरणे 'का' या प्रश्नाचा विचार करतात. लोणी का वितळले तर खोलीचे तपमान वाढले, असे उत्तर ही स्पष्टीकरणे देतात. तार्किक आधारासाठी ही स्पष्टीकरणे भौतिक, रासायनिक वा अन्य प्रकारचा शास्त्रीय कायदा गृहित धरतात. तर या प्रश्नांचे उत्तर देताना नेहमी विरोधाभासात्मक पद्धतीनेच द्यायचे ही जी वडिलांची सवय तीच मुलाने म्हणजे नील बोर यांनीही घेतली होती. क्लेन लिहितात की, "प्राण्यांचे वर्णन उलगडून दाखविताना ख्रिश्चन बोर एकाच वेळी हेतूवादी आणि कार्यकारणभावात्मक, दोन्ही प्रकारची आणि विरोधाभासात्मक स्पष्टीकरणे वापरत असत. तर सृष्टीव्यापाराचे स्पष्टीकरण देताना मुलगा नील जीवशास्त्र आणि भौतिकशास्त्र एकमेकांना पूरक आहेत या प्रकारचे विरोधाभासात्मक विधान करतो."

१९०३ मध्ये नील बोर विद्यापीठात शिकावयास गेला प्रा. हॉफडिंग हे याच विद्यापीठात तत्त्वज्ञानाचे शिक्षक म्हणून काम करीत होते. विद्यापीठात गेल्यावर नील बोर यांनी तत्त्वज्ञानाचा इतिहास आणि तर्कशास्त्राच्या वर्गात आपले नाव घातले. हे दोन्ही विषय हॉफडिंग शिकवत असत. नील बोर यांचा तत्त्वज्ञानाचा अभ्यास तेवढ्यावर थांबला नाही. ते एका विद्यार्थीमंडळाचेही सभासद होते. (त्यांचा मित्र रुबिन हाही तेथे सभासद होता.) हे मंडळ हॉफडिंग यांनी उपस्थित केलेल्या तात्त्विक प्रश्नांवर चर्चा करी. एवंच हॉफडिंग यांच्या विचारांचा बराच प्रभाव नील बोर यांच्या मनावर पडत होता. वर दिलेल्या मुलाखतीत आपल्याला स्पिनोझा, ह्यूम, कांट आदींच्या तत्त्वज्ञहाचे फारसे आकर्षण नव्हते, असे विचार नील बोर यांनी व्यक्त केलेले असले तरी तत्त्वज्ञानाचा परिणाम त्यांच्यावर झाला नव्हता असे नाही. कारण हॉफडिंग यांचे शिकवणेच तसे होते. तसे आपले विचार मांडताना कोपर्निकस ते न्यूटन आणि मॅक्सवेल ते माख या नव्याजुन्या सगळ्या शास्त्रज्ञांची ते दखल घेत आणि त्यांनी शोधलेली उत्तरे तात्त्विक प्रश्नांना लावून दाखवीत. उदा. 'मॉडेर्न फिलॉसॉफेन' हा त्यांचा ग्रंथ १९०४ मध्ये

प्रसिद्ध झाला होता. या ग्रंथामध्ये मॅक्सवेल आणि माख या दोघांच्या कार्याची सविस्तर चर्चा आली आहे. 'हिस्टरी ऑफ मॉर्डन फिलॉसॉफी' या ग्रंथाचा उत्तरार्ध म्हणून त्यांनी हे पुस्तक लिहिले होते.

नील बोर आणि हॉफडिंग या दोघांतील वैयक्तिक संबंधांबद्दलही येथे सांगण्यासारखे आहे. या दोघांमध्ये वयाचे अंतर खूपच होते. पण त्यांना एकमेकांबद्दल समवयस्क मित्रांसारखा जिव्हाळा होता. हॉफडिंग यांचा विद्यार्थी असतानाच्या काळातसुद्धा नील बोर यांनी हॉफडिंग यांच्या प्रतिपादनातल्या चुका दाखविल्या होत्या. किंबहुना जेथे जेथे आपले लिखाण क्लिष्ट आणि समजावयास कठीण झाले आहे असे प्रा. हॉफडिंग यांना वाटे तेथे तेथे ते वाचून त्यातील युक्तिवाद व तात्त्विक मांडणी तपासण्याचे काम ते नील बोर यांना मुद्दाम सांगत असत. हॉफडिंग यांचा पंच्याऐंशीवा वाढदिवस जेव्हा साजरा झाला तेव्हा नील बोर यांनी त्यांना पत्र लिहिले होते. पत्रात त्यांनी म्हटले होते की, "तुमच्यामुळे माझा खूप फायदा झाला आहे." या पत्राचा उल्लेख करून हॉफडिंग यांनी मेयरसेन यांना मजकूर लिहिला होता, त्यात त्यांनी म्हटले आहे, की बोर म्हणतात की माझ्या पुस्तकात त्यांना अशा कित्येक कल्पना सापडल्या की त्या कल्पनांमुळे शास्त्रीय क्षेत्रातील शास्त्रज्ञांना त्यांचे संशोधन समजण्यास सुलभ झाले. हे पत्र वाचून मला खूप आनंद झाला. कारण भौतिकशास्त्र समजून घेण्यासाठी आवश्यक ते प्रशिक्षण आपण घेऊ शकलो नाही याची मला कायम खंत वाटत होती. (१३ मार्च १९२८) हॉफडिंग आणि विल्यम जेम्स दोघे एकमेकांना ओळखत असत. बोर जेव्हा हॉफडिंग यांच्या हाताखाली तत्त्वज्ञान शिकत होते, त्याच दरम्यान युनायटेड स्टेटसमध्ये जेम्सना भेटावयास हॉफडिंग गेले होते. 'प्रॉब्लेम्स ऑफ फिलॉसॉफी' या त्यांच्या पुस्तकाच्या इंग्रजी आवृत्तीला जेम्स यांनी प्रस्तावना लिहिली आहे. १९०२ मध्ये त्यांनी विद्यापीठात जी व्याख्याने दिली त्यातून हे पुस्तक निर्माण झाले होते असे ते सांगतात. या सगळ्या चर्चेचा मतलब हा की परस्परपूरकत्त्वाची कल्पना हॉफडिंग यांनी जेम्सकडून ऐकली असावी आणि बोर यांनी ती हॉफडिंगकडून ऐकली असेल.

## किर्केगार्ड

खुद्द हॉफडिंग यांच्यावर किर्केगार्ड या डॅनिश तत्त्ववेत्त्याचाही फार मोठा प्रभाव होता. इतका की त्यांनी त्याच्यावर एक संपूर्ण ग्रंथच लिहिला आहे. किर्केगार्डबद्दल बोलताना हॉफडिंग म्हणतात की, आयुष्याच्या एका विशिष्ट टप्प्यावर टोकाच्या नैराश्याने ग्रासलेल्या अवस्थेत असताना किर्केगार्डने त्यानां वाचविले होते. अगदी बरोबर म्हणजे किर्केगार्डच्या 'स्टेजिस ऑन लाईफ्स वे' या ग्रंथाने हवा होता तो मानसिक आधार आणि समाधान त्यांना या ग्रंथात सापडले होते.

नील बोरसुद्धा किर्केगार्डचे चहाते होते. किर्केगार्डच्या ग्रंथाशी त्याची ओळख

हॉफर्डिंग यांच्यामुळे झाली की त्यांनी स्वत:च त्याला शोधून काढले हे ज्ञात नाही. परंतु पूर्ववयातच त्यांना किर्केगार्डमध्ये स्वारस्यं उत्पन्न झाले होते, याचा लेखी पुरावा आहे. १९०९ मध्ये नील बोर यांनी आपल्या भावाला वाढदिवसाची भेट म्हणून 'स्टेजिस' हे किर्केगार्डचे पुस्तक धाडले होते. याची नोंद मिळते. पुस्तकासोबत त्यांनी जे पत्र भावाला लिहिले होते, त्यात त्यांनी म्हटले होते, की 'भेट म्हणून पाठविण्यासाठी दुसरी चांगली वस्तू मला आढळली नाही. त्याच्यापेक्षा चांगली भेटवस्तू सापडली असती असेही मला वाटत नाही. ते काही असो पण या पुस्तकाने मला खूपच आनंद दिला आहे. मी जी काही अतिशय छान पुस्तके वाचली त्यात या पुस्तकाची गणना करावी लागेल.' पत्रात पुढे ते लिहितात की 'किर्केगार्डच्या सगळ्याच मताशी मी सहमत आहे असे नाही. किर्केगार्डची एकूण भूमिका शास्त्राच्या विरोधी आहे. हे ज्यांना माहीत आहे. त्याना नील बोर यांच्या उद्‌गाराचे नवल वाटणार नाही. परंतु पुस्तक वाचताना त्यांना एस्थेटिक अनुभव– एक सुंदर अनुभव घेतला हे सुख मिळाले होते, हे निश्चत. तसेच किर्केगार्डची नैतिक उत्कटताही त्यांना भावली असावी.

ज्या निरनिराळ्या ठिकाणांहून परस्परपूरकत्वाची कल्पना बोर यांना मिळाली असावी असा अंदाज आहे त्यात किर्केगार्डच्या पुस्तकाची गणना करावयास हरकत नाही. येथे किर्केगार्डच्या संपूर्ण वाङ:मयाचा शोध घेण्याची गरज नाही. तेवढा अवसरही नाही. परंतु किर्केगार्ड आणि डॅनिश भाषेतील त्यांचा प्रमूख भाष्यकार हॅरॉल्ड या दोघांच्याही लिखाणातून एकदोन मुद्दे असे काढून दाखविता येतील की जे बोर यांच्याही लिखाणात पाहावयास सापडतात.

किर्केगार्ड हा अस्तित्ववादी तत्त्वज्ञानाच्या मूळ पुरुषांपैकी एक अस्तित्ववादी तत्त्वज्ञान ही एक प्रकारे जर्मन रोमँटीकवादाची नवी अवस्थाच होय. रोमँटिसिझम अतिरेकी बुद्धीवादाला विरोध करू पाहतो आणि समूहाच्या तुलनेत व्यक्तिच्या व्यक्तिपणाला जपू पाहतो. किर्केगार्डचा अस्तित्ववाद ही अठराव्या शतकातील प्रबोधनवादी तर्काधिष्ठित बुद्धीवादाची तीव्र प्रतिक्रीया होती असेही म्हणता येईल. प्रबोधनवादातील टोकाचा बुद्धीवाद (रॅशनॅलिटी) आणि अमूर्त विचारांना भावनेच्या तुलनेतील सर्वाधिक महत्त्व ह्या दोन्ही गोष्टी किर्केगार्डला पटल्या नव्हत्या. त्यांच्या मते व्यक्ती हेच अंतीम स्तत्य असून समुदाय ही एक अमूर्त तात्त्विक कल्पना आहे. समुदाय व्यक्तिचा बनलेला असतो. सुखदु:ख व्यक्तिला होत असते. समुदायाला नव्हे. प्रत्येक व्यक्ती आपापल्या जीवनप्रसंगातून (लाईफसिच्युएशन्स) जगते. एक आयुष्य दुसऱ्या आयुष्याशी बदलता येत नाही. इतकी आयुष्य ही गोष्ट वैयक्तिक आहे. मनुष्यप्राण्याबद्दल बोलताना व्यक्तीनिष्ठ भूमिकेतूनच बोलले गेले पाहिजे. मनुष्यप्राण्याबद्दल वस्तुनिष्ठ भूमिकेतून बोलणे हे चूक आहे. मनुष्यप्राणी ही टेबल वा खुर्चीसारखी अचेतन वस्तू नाही. मनुष्यप्राणी हा सचेतन प्राणी आहे. त्याला स्वत:ची इच्छाशक्ती आहे. स्वतंत्र कल्पनाशक्ती आहे. कोठल्याही क्षणी स्वत: ठरवून स्वत:चे आयुष्य तो बदलू शकतो. प्रत्येक बौद्धिक प्रतिपादन हे शेवटी

एकेकट्या व्यक्तीने केलेले प्रतिपादन असते. कांट आणि हेगेल या दोन जर्मन तत्त्ववेत्यांना उद्देशून रोजनिशीत एके ठिकाणी किर्केगार्ड म्हणतो की, ''झाडेझुडुपे जीवजंतू वा आकाशातील ग्रह आणि नक्षत्रे यांच्या संबंधात शास्त्राला काय म्हणायचे असेल ते म्हणू द्या. परंतु त्याच पद्धतीने मनुष्यप्राण्याबद्दल शास्त्राने बोलू पहाणे हे केवळ पाखंड आहे. तसे बोलणे म्हणजे नैतिक, धार्मिक अथवा अध्यात्मिक वारशाचा अपमानच होय.'' पुढे किर्केगार्ड आणखी असे म्हणतो की, ''सत्य नेहमी टप्प्याटप्प्याने हाती येते. ती एका फटक्यात पदरात पडणारी गोष्ट नाही. सत्याचा शोध घेताना प्रत्येक टप्प्यावर स्वत:हून स्वत:चा निर्णय घ्यावा लागतो. हातून प्रमाद घडला असल्यास त्या प्रमादाची कबुली द्यावी लागते. जीवनाचा प्रवास टक्केटोणपे सोशीत आडवळणांना तोंड देत करावा लागतो. हा प्रवास कधीही आखीव, रेखीव, तर्कसंगत म्हणजेच रॅशनल असत नाही. बहुधा तो तर्काला खो देतच करावा लागतो. जीवनाचा प्रवास कधीही सलग, अकुंठित असत नाही. तो थांबत, थांबतच करावा लागतो. सारांश, वैयक्तिक वगळून सत्य कधीही हाती लागत नाही. 'हंड्रेड इयर्स ऑफ फिलॉसॉफी' या ग्रंथामध्ये किर्केगार्डची भूमिका जॉन पासमोर यांनी पुढील शब्दात मांडली आहे:

पासमोर म्हणतात की, किर्केगार्डच्या मते, सत्याकडे घेऊन जाणारे प्रत्येक मानवी पाऊल ही ज्याची त्याची स्वत:ची वैयक्तिक निवड असते. सौंदर्यवादी भूमिकेतून आम्ही शास्त्रीय भूमिकेमध्ये पदार्पण करतो. पुढे ती भूमिका टाकून आम्ही नैतिक भूमिकेत शिरतो. कालांतराने नैतिक भूमिकेत शिरतो. कालांतराने नैतिक भूमिकेच्या पलीकडे जाऊन आम्ही धार्मिक भूमिका आपलीशी करतो. यापैकी कसलाच प्रवास तर्कशुद्ध पद्धतीने घडणारा नाही. एवढेच नव्हे; तार्किकदृष्ट्या यापैकी कशाचेही समर्थन करता येणार नाही. तर्कशास्त्रातील एकापुढे एक अशी मांडली जाणारी विधाने आणि त्या विधानांच्या आधारे काढले जाणारे निष्कर्ष हा प्रकारच येथे अपरिचित आहे. कारण यातील प्रत्येक निष्कर्ष, प्रत्येक तात्पर्य ही एक एक स्वतंत्र उडी असते. आणि प्रत्येक उडीबरोबर आमचे संपूर्ण जग बदललेले असते.''

किर्केगार्डचा एवढा लांबलचक परिच्छेद देण्याचे कारण असे की बोर यांनी वापरलेली डिसकंत्रटन्युइटीची मध्येच खंड पडण्याची कल्पना येथे आपणास पाहावयास सापडते. किर्केगार्ड म्हणतो की व्यक्ती आधी सौंदर्यवादी आणि केवळ स्वत:च्या आनंदासाठी जगू पाहणारी असते. काही काळाने तिला याचा कंटाळा येतो. आणि ती शास्त्रीय विचारसरणीने वागू पाहाते. कालांतराने तिला नीतिवादी व्हावेसे वाटते. याही दृष्टिकोनाला ती कंटाळते आणि शेवटी ती आध्यात्मवादी बनते. कधी कधी कोणी प्रारंभी स्वत:च्या आनंदासाठी जगणारा असतो. आणि पुढे अकस्मात आध्यात्मवादी बनतो. याचा अर्थ या चार अवस्थांमध्ये कोठल्याही प्रकारचे आंतरिक तर्कशास्त्र नाही. म्हणजेच कोठल्याही प्रकारचे अखंड सूत्र नाही. प्रत्येक वेळी जगणाराने घेतलेली ती एक एक नवी उडी होती. क्वाँटम जंपसारखी जंप.



अनुक्रमणिका

किर्केगार्डच्या लिखाणातील खंडिततेच्या मुद्याचा उत्तम परामर्श बोर यांचे तत्त्वज्ञानाचे शिक्षक प्रा. हॉफर्डिंग यांनी त्यांच्या 'अ हिस्टरी ऑफ मॉर्डन फिलॉसाफी या ग्रंथात घेतला आहे. तेथे ते लिहीतात की, ''किर्केगार्डच्या मताने माणसाच्या आयुष्याचे अनेक संभाव्य प्रकार असू शकतात. हे प्रकार एकामेकांपासून इतके भिन्न असू शकतात की प्रयत्नपूर्वक निवड करूनच ते जाणता येतात. म्हणून आपल्या लिखाणात किर्केगार्ड 'इदर ऑर' अथवा 'हे किंवा ते' दोन्ही एकाच वेळी नाहीत हे शब्द मध्यवर्ती सूत्र म्हणून वापरतो. किर्केगार्डच्या विवेचनातील दुसरा महत्त्वाचा शब्द 'इंडिव्हिज्युअल' अथवा 'एकटी व्यक्ती' हा होय. हे दोन शब्द वापरून किर्केगार्ड असे सांगू इच्छितो की, जीवनात स्वत:चे आयुष्य ज्याने त्याने स्वत: निवडायचे असते आणि ही निवड स्वत:च्या नैतिक व सर्व प्रकारच्या जबाबदारीवर करावी लागते. कारण त्या निवडीचे बरेवाईट परिणाम ज्याचे त्याला स्वत:ला भोगावे लागतात. या आपल्या भूमिकेला किर्केगार्ड 'क्वालिटेटिव्ह'–, 'गुणात्मक वाद-प्रतिवाद' असे नाव देतो. गुणात्मक वादप्रतिवाद या शब्दांचा अर्थ असा: कोणाही व्यक्तिचा आत्मिक विकास विनासायास आणि यांत्रिक पणे होऊ शकत नाही. ठाम पवित्रा घेतल्यानेच तो होऊ शकतो. म्हणजेच तेथे चढउतार असतात. कारण पवित्रा घेणे याचा अर्थ भूतकाळाच्या बाबतीत ठाम भूमिका घेऊन नवा भविष्यकाळ करणे. किर्केगार्डची ही भूमिका बऱ्याच प्रमाणात रोमँटिकवादी भूमिकेपेक्षा भिन्न आहे. रोमँटिकवाद्यांच्या मताने आत्मिक विकास ही एक तर्कबद्ध आणि अपरिहार्य क्रिया होती. प्रत्येकाचा आत्मिक विकास घडून येणे हा जणू निसर्गाचा कायदा होता. किर्केगार्ड तसे मानीत नाही. आत्मिक विकासाला तो स्वप्रयत्नाचे फळ मानतो. आयुष्याच्या प्रत्येक नव्या टप्प्यावर नवा पवित्रा आणि नवा निश्चय असेल तरच हा विकास घडू शकतो असे त्याचे मत होते. आपल्या शिकवणुकीला खुद्द किर्केगार्ड 'प्युअर फॅन्टास्टिकलनेस' केवळ कल्पनारंजन असे नाव देतो. कदाचित ते केवळ कल्पनारंजनसुद्धा असेल परंतु किर्केगार्ड मात्र त्या कल्पनारंजनाने भारला गेला होता एवढे खरे! (खंड दुसरा पृ.२८६)

किर्केगार्ड आणि बोर यां दोघांच्या मुद्यातील साम्य पुढील प्रमाणे दाखविता येईल. किर्केगार्डने खालील मुद्यांना महत्त्व दिले आहे. सलग स्थित्यंतराऐवजी आकस्मिक बदलांना– त्याला तो उड्डाण असा शब्द वापरतो,. (लीप किर्केगार्ड) समुदाय नव्हे तर एकटी व्यक्ती तो महत्त्वाची मानतो. जीवन त्याला द्वंद्वात्मक वाटते. किर्केगार्डचे हे सगळे मुद्दे तत्त्वज्ञानाच्या प्रांतामध्ये पूर्णपणे नवे होते. म्हणजे क्लासिकल तत्त्वज्ञानापेक्षा भिन्न होते. अगदी हाच प्रकार बोर यांनी मांडलेल्या व ज्याला कोपेनहेगन सिद्धांतसूत्रे म्हणतात त्या सूत्रांमध्येही पहावयास सापडतो. उदा. नव्या भौतिकीतील 'क्वाँटम जंपचे' सूत्र जुन्या भौतिकीमधील 'कॉजॅलिटी कार्यकारणभाव' हा नेसिसरी अथवा अपरिहार्य कार्यकारण भाव होता. नव्या भौतिकीमध्ये तो प्रॉबिलिस्टिक स्वरूपाचा असतो. किंवा वास्तव पूर्णांशाने वस्तुनिष्ठ नाही. वास्तवाच्या वर्णनामध्ये त्या वास्तवाचे निरिक्षण करणाऱ्या निरिक्षकाचाही उल्लेख अटळ असतो; म्हणजेच



अनुक्रमणिका

ततक्या प्रमाणात वास्तव व्यक्तिनिष्ठ ठरले आहे हे सूत्र घ्या. किर्केगार्ड इंडिव्हिज्युअलला, एकट्या व्यक्तीला महत्त्व देतो. तो म्हणतो की जग कसे आहे हे जो कुणी त्या जगाशी भिडलेला असतो त्या इसमाच्या दृष्टीला दिसते तसे आहे. नव्या भौतिकीमधील 'ऑब्झव्हर डिपेंडट डिस्क्रिपशन'चाच हाही एक प्रकार म्हणता येईल. बोर यांच्या वास्तवासंबंधिच्या नव्या चित्राप्रमाणे वास्तव द्वंद्वात्मक आहे. हाच प्रकार किर्केगार्ड मध्येही दाखविता येतो.

मात्र बोर आणि किर्केगार्ड या दोघांच्या भूमिकेत काही साम्ये आहेत याचा अर्थ बोर यांनी किर्केगार्डची नक्कल केली होती असे नव्हे. आपणाला तसे अजिवात सूचित करायचे नाही. आपणाला फक्त एवढेच दाखवायचे आहे की जगाच्या वैचारिक साठ्यात असणारे मोटिफ्स किंवा कल्पनासूत्रे फक्त मोजकीच असतात. आणि तीच तीच कल्पना सूत्रे वारंवार डोके वर काढतात. १९१२-१३ च्या दरम्यान बोर यांनी किर्केगार्ड आणि हॉफडिंग यांचे लिखाण नजरेखालून घातले होते. आणि त्याच काळात रचनेबद्दल, चित्राबद्दल त्यांचे प्रयोग सुरू होते. या प्रयोगातून त्यांच्या डोळ्यांसमोर लघुकणांच्या रचनेबद्दल एक अंधुक चित्र उभे राहू पहात होते. किर्केगार्ड आणि हॉफिडिंग यांच्या शब्दचित्राने या चित्रासाठी त्यांना आराखडा पुरविला. लघुकणांच्या वागण्याचा जो अनुभव त्यांना त्या काळी येत होता त्या काळात तोवर शब्द सापडले नव्हते. म्हणजेच तो शब्दात गोवला गेला नव्हता. कारण तो अगदी नव्या प्रकारचा अनुभव होता. अनुभव पूर्णपणे नवा असल्याने त्या अनुभवाच्या चित्रणासाठी नवी रूपके आवश्यक होती. किर्केगार्ड आणि हॉफडिंग यांनी बोर यांना ही नवी रूपके पुरविली. असे पुस्तक आजवर आपण वाचले नाही, वगैरे वगैरे जे ते किर्केगार्डच्या पुस्तकाबद्दल लिहितात त्याचे कारण या पुस्तकाने त्यांना एकाएकी नवी रूपके पुरविली होती हे आहे. क्वाँटम जंप आणि किर्केगार्डच्या ग्रंथातील 'लीप' ची कल्पना या दोहोत निश्चितच काहीतरी संबंध असावा. किर्केगार्डचे प्रतिपादन बोर यांना इतके नवलाचे का वाटले होते याचे उत्तर प्रा. हॉफडिंग यांनी किर्केगार्डबद्दल लिहिलेल्या पुढील परिच्छेदात सापडेल:

किर्केगार्डप्रणीत नैतिक भूमिकेमध्ये स्वाभाविकपणेचं गुणात्मक वाद-पतिवाद अनुस्यूत आहे. या गुणात्मक वाद-प्रतिवादामध्ये दोन ठळक भाग येतात. एक चालू प्रक्रियेला दिला जाणारा छेद आणि दोन, अज्ञातामध्ये घेतली जाणारी उडी. किर्केगार्ड म्हणतो की स्वत:चे आयुष्य स्वत: निवडायचे असते. एकाचे आयुष्य दुसरा निवडू शकत नाही. कारण मानवी आयुष्य म्हणजे नैतिक निवडीच्या जबाबदाऱ्यांनी परिपूर्ण वस्तू होय. प्रत्येक क्षणी तेथे ही किंवा ती किंवा ती कोठली ना कोठली निवड करावी लागते व ही निवड जगणाऱ्याला स्वत:ला करावी लागते. स्वत:च्या जबाबदारीवर व स्त:च्या इच्छेने करावी लागते. जगण्याच्या प्रत्येक क्षणी निवड करीत आयुष्य जगावे लागते याचा अर्थ आयुष्य कधीही एकाच सरळ रेषेमध्ये मार्ग आक्रमीत नाही. फक्त देह तेवढा एका रेषेत वाढत असतो. परंतु आत्मा एका रेषेत वाढत नाही. किंवा आत्मिक विकास एका रेषेत होत नाही. आत्मिक विकासामध्ये चढउतार असतात.

कारण आत्मिक विकासाचा संबंध आकस्मिक नैतिक निर्णयांशी असतो. म्हणून तेथे 'लीप' वा आध्यात्मिक उडी यांना महत्त्व असते. 'उडी' या अर्थाने, की अशा वेळी तोवरचे सगळे आयुष्य मागे सोडून दिलेले असते. व आयुष्याला नव्याने प्रारंभ करण्यात येतो. अशी प्रत्येक आध्यात्मिक उडी त्या आयुष्यासाठी काही ना काही गुणात्मक बदल घेऊन येते. शाळाकॉलेजातून शिकविले जाणारे मानसशास्त्र अशा अवस्थांबद्दल काहीच सांगू शकत नाही. फार झाले तर हे मानसशास्त्र अशा आध्यात्मिक उडीमागील उदिष्ट काय असू शकते, याचा उहापोह करू शकते. परंतु त्या पलीकडे शालेय मानशास्त्र जाणार नाही, कारण हे सर्व वैयक्तिक आयुष्याशी संबंधीत असते आणि शालेय मानसशास्त्र सर्वसाधारण गोष्टींबद्दलच फक्त बोलते. मानवी आयुष्याच्या बाबतीत खंडित टप्पे हेच एकमेव सत्य आहे; सलग, अखंड ही गोष्ट फक्त संभाव्यतेच्या, गृहीत धरण्याच्या क्षेत्रातच शक्य आहे. प्रत्यक्षतेच्या क्षेत्रामध्ये नाही. निवड करणे म्हणजेच अखंडतेला छेद देणे. ठाम पवित्रा घेतल्यावाचून आयुष्यामध्ये बदल संभवत नाही. चालू रस्ता सोडल्यावाचून नवा रस्ता घेता येत नाही, हा तर मानवी आयुष्यातील एक अगंदी प्राथमिक नियम आहे. येथवर किर्केगार्डची वैयक्तिक आयुष्याबद्दलची सर्वसाधारण भूमिका पाहिली. किर्केगार्डच्या प्रतिपादनामध्ये 'लीप' या उडीच्या कल्पनेला सर्वाधिक महत्त्व आहे. आयुष्यात केला जाणारा प्रत्येक नवा निश्चय ही अंधारात घेतली गेलेली उडी वा झेपच आहे असे तो सांगतो. कोठलाही नवा निश्चय करताना वा निर्णय घेताना व्यक्ती दोन परस्परविरुद्ध अवस्थांच्या मध्यावर उभी असते असे तो म्हणतो. पैकी एक अवस्था ही संभाव्यतेच्या प्रांतातील शेवटची अवस्था असते. आणि दुसरी वास्तवतेच्या प्रांतांतील पहिली अवस्था असते. एक अवस्था टाकून देण्यात आलेली असते तर दुसरी स्वीकारण्यात आलेली असते. म्हणूनच कदाचित मानसशास्त्रीय दृष्टीकोनातून या अंधारातील उडीचे विश्लेषण करता येत नाही असे किर्केगार्ड म्हणत असावा. संभाव्यतेच्या क्षेत्रातील शेवटची अवस्था आणि वास्तववतेच्या क्षेत्रातील पहिली अवस्था या दोन्ही अवस्था पाठीला पाठ टेकून असतात असेही त्याचे मत आहे. याचा अर्थ जी व्यक्ती ही उडी घेते ती एक प्रकारे नेणीवेच्या पातळीवर घेते असे म्हणावे लागते. आणि जर तसे असेल तर नेणीवेच्या आत खालच्या स्तरावर मनाची अखंडता कायम टिकून असते. फक्त विरोध काय तो वरच्या भागात असतो. असेही म्हणावे लागते. ( हिस्टरी ऑफ मॉडर्न फिलॉसॉफी पृ. २८७, २८८)

किर्केगार्ड, हॉफडिंग आणि जेम्स यांच्या विचारांचा आढावा आपण घेतला. अनेक ठिकाणी त्यांचे विचार एकमेकांशी मिळते जुळते होते हेही त्यावरून आपण पाहिले. बोर यांच्या वाचनात या तिघांचीही लिखाणे आली होती, यात काहीही संशय नाही. याचाही पुरावा आपण पाहिला. या सर्व गोष्टींवरून निष्कर्ष काढायचा तर असे म्हणता येईल की परस्परपूरकत्वाच्या संकल्पनेसंबंधी बोर यांच्या मनात जे विचार अस्पष्टपणे घोळत होते, त्यांना चालना देण्याचे काम या तिघांच्या लिखाणाने केले असावे आणि पुढे योग्य

वेळ येताच परस्परपूरकत्वाची संकल्पना त्यांच्या मनात ठळकपणे सिद्ध झाली असावी.

बोर यांच्या स्वभावातील एका विशिष्ट लक्षणाची आठवण येथे करावयास हवी. कारण त्या विशिष्ट स्वभावगुणामुळेच बोर यांना शेवटी परस्परपूरकत्वाच्या तत्त्वाचे अस्तित्व इतक्या प्रकर्षाने पटले असावे. हा स्वभावगुण म्हणजे वाद प्रतिवादाच्याच शैलीत विचार करण्याची व काम करण्याची बोर यांची जन्मजात सवय. लिऑन रोझेनफेल्ड हे त्यांचे दीर्घकाळचे सहकारी बोर यांच्याबद्दल बोलताना लिहितात की, "बोर यांचा स्वाभाविक कल मूलत: वादप्रतिवाद धर्तीने विचार करू पाहाण्याचा होता. त्यांना रिफ्लेक्टिव्ह म्हणजे एकच विचार घेऊन त्याचाच किस काढीत विचार करता येत नसे. विचाराला प्रवृत्त होण्यासाठी कसल्या ना कसल्या प्रकारच्या वादविवादाची गरज त्यांना भासत असे. दुसऱ्याने विषय सुरू करून दिला की त्याला उत्तर म्हणून ते स्वत: विचार करू लागत. रोझेनफेल्ड म्हणतात की, 'विचाराच्या बाबतीत बोर यांचा जाहीर नियमच होता की माझे कोठलेही वाक्य हे प्रश्नाच्या स्वरूपाचे असते. ते कधीही अंतिम सत्य सांगत आहे किंवा सत्य शाबित झाले आहे अशा धर्तीचे नसते."

हे त्यांचे वागणे त्यांच्या दैनंदिन वागण्यातही दिसत असे. एखादा शास्त्रीय लेख लिहायचा असे तेव्हा एका जागी बसून लेखनिकाला मजकूर सांगितला आहे असे त्यांच्याकडून घडत नसे; तर खोलीतल्या खोलीत येरझाऱ्या घालीत त्यांनी मजकूर सांगायचा व लेखनिकाने तो लिहून काढायचा अशी त्यांची रीत होती. लेख लिहित असताना ज्या विषयावर लेख लिहायचा त्या विषयातला एखादा तज्ज्ञ ते जोडीदार म्हणून बरोबर ठेवीत. येरझाऱ्या घालता घालता स्वत:शी आणि बरोबर आणलेल्या त्याच विषयातील तज्ज्ञ जोडीदाराशी जणू वाद करीत लेख सांगण्याचे त्यांचे काम चाले. बरोबर आणलेल्या जोडीदाराला ते त्यांचा विरोधक टीकाकार साउंडिंग बोर्ड समजत असत. आइन्स्टीन, हायझेन्बर्ग, श्रॅडिंजर यातील प्रत्येकाचा बोर यांच्या बाबतीतील अनुभव अगदी समान होता. हे सर्वजण सांगतात की, कॉन्ट्राडिक्शनचे बोर यांना मनापासून आकर्षण होते. चर्चेत विरोधी जोडी मिळाली की बोर यांनी त्या जोडीवर झडप घातली म्हणून समजा. परस्परांना छेद देऊ पाहणाऱ्या मतांपासून वादविवादाला प्रारंभ करण्यात त्यांना कमालीचा हर्ष होत असे. वादाचा शेवट मात्र नेहमी एकमेकांना वरवर विरोध करणाऱ्या बाजू खरोखर एकमेकांना कशा पूरक असतात या त्यांच्या अत्यंत प्रिय मुद्यावर होत असे, हे मुद्दाम सांगावयास नको.

● ● ●



अनुक्रमणिका

'जे जे शक्यतेच्या कोटीतील वाटते ते ते प्रत्यक्षात आणण्यासाठी झटावे' –फ्रान्सिस बेकन.

# बेकनच्या वरील मतासंबंधी चर्चा

## सर पीटर मेडावर

### मुक्त अनुवाद

## डॉ. आनंद जोशी

*बेकनचे वरिल बोधवाक्य त्याच्या 'न्यू ॲटलांटिस' नामक फॅन्टसीत आले आहे. बेकन हा ब्रिटिश तत्त्ववेत्ता.(१५६१-१६२६). 'न्यू ॲटलांटिस' हे कल्पकाचे (युटोपियाचे) चित्र रंगवणारे पुस्तक. एक युटोपियन फॅन्टसी. मृत्यू गाटण्याच्या फक्त थोडेच वर्षे आधी हे पुस्तक बेकनने पूर्ण केले होते. पुस्तक अगदी छोटेखानी आहे आणि बेकनच्या मृत्यूनंतर बरोबर वर्षाने ते प्रसिद्ध झाले. १६२७ साली विल्यम रॅले याने ते प्रसिद्ध केले होते. रॅलेने बेकनचे चरित्रही लिहिले आहे.*

*'न्यू ॲटलांटिसची' कथा काहीशी पुढीलप्रमाणे आहे : एका खलाशाच्या तोंडून ही कथा वदवली आहे. त्या खलाशाचे जहाज दक्षिण समुद्रात (पॅसिफिक महासागराचे प्राचीन नाव) भरकटते; आणि उपासमार व आजार यानी मरणोन्मुख बनलेला हा खलाशी एका अज्ञात बेटावर येऊन थडकतो. बेटाचे नाव असते 'बेनसालेम.' केवळ दया म्हणून बेटावरचे रहिवासी खलाशाला बेटावर उतरू देतात. वस्तुत: परक्या लोकांना त्यांचे बेट निषिद्ध असते. बेटावर उतरताक्षणी सर्व प्रवाशांना कित्येक दिवस क्वांरंटाइनमध्ये राहावे लागते. निवेदक सांगतो की क्वांरंटाइनचे नियम फार कडक असतात. मात्र बेटावरचे रहिवासी इतक्या सात्त्विक वृत्तीचे असतात की खलाशांकडून ते कोणत्याही प्रकारचे बक्षिस घेत नाहीत. बक्षिस देण्याची खलाशांची इच्छा होती तरी.*

*बेटावर खलाशांना एक औद्योगिक संस्था आढळते. संस्थेचे नाव असते 'सॉलोमन्स हाऊस' किंवा 'कॉलेज ऑफ द सिक्स डेज वर्क'. बेनसालेम बेटाचे रहिवासी व्यापारउदिमावर निर्वाह करतात. मात्र हा व्यापार ज्ञान अथवा ज्ञानप्रकाश या एकाच वस्तूचा असतो. किंवा अधिक बरोबर म्हणजे बेनसालेमवासी निरनिराळ्या देशात जाऊन आणि तेथे हेरगिरी करून त्या देशातील नवेनवे ज्ञान चोरून आपल्या देशात आणण्याचा व्यवसाय करतात.*

*या बरोबर खलाशांना सर्वात महत्त्वाची गोष्ट आढळते ती म्हणजे सालोमनगृहातर्फे तयार होणारे घरगुती उत्पादन. या उत्पादनाचे प्रमुख उद्दिष्ट पुढीलप्रमाणे*

होते :'प्रत्येक घटनेचा कार्यकारणभाव हुडकणे. निसर्गाच्या व्यापाराचे रहस्य शोधण्याचा प्रयत्न करणे. मनुष्यजातीच्या साम्राज्याच्या कक्षांचा विस्तार करू पाहाणे. आणि जे जे म्हणून शक्य कोटीतील असेल ते ते व्यवहारात आणण्यासाठी प्रयत्नशील राहाणे.'

बेटावर अनेक इमारती होत्या. परंतु त्या सर्व इमारतींची रचना वरील उद्दिष्ट नजरेसमोर ठेऊन करण्यात आलेली होती. त्यामुळे काही इमारती म्हणजे गुहा असतात, तर काही छोटे किल्ले असतात. त्याचप्रमाणे बेटावर मिनार, तलाव, सरोवरे, प्रयोगशाळा, आमराया, बागबगिचे, प्राणिसंग्रहालये, मत्स्यालये, स्वयंपाकघरे, भट्ट्या, इंजिनगृहे इ. इ. अनेक गोष्टी होत्या.

बेटावर एवढा मोठा पसारा होता तरी सॉलोमनगृहाचे वैशिष्ट्य हे होते की तेथील प्रजाजन अत्यंत एकोप्याने राहात होते. 'एकमेका सहाय्य करू अवघे धरू सुपंथ' हे त्यांच्या जीवनाचे ब्रीदवाक्य होते. बेटावर श्रमविभागाच्या तत्त्वाचा अंमल होता. काही कारागीर फक्त प्रवास करण्याचे काम करीत. काहीजण नाना प्रकारची पुस्तके वाचून त्यातील महत्त्वाची माहिती गोळा करण्याचे काम करीत. काहीजण प्रयोगशाळेत प्रयोग करण्याचे काम करीत. तर काही जण तांत्रिक उपकरणांवर संशोधन करण्यात दंग असत. दुसरे काहीजण नव्या प्रयोगाचे आराखडे तयार करण्यात व्यग्र होते. आणि शेवटी काही मोजके रहिवासी निसर्गाच्या रहस्याचा भेद घेण्यात गुंग होते. दुसऱ्या शब्दात सांगायचे तर हे निसर्गाच्या रहस्याचा भेद करण्याचा प्रयत्न करणारे. इतर कामगारांनी शोधून काढलेली माहिती सुसंगठित करून त्यांची समीकरणे बनविण्यात, त्या ज्ञानाच्या तात्त्विक चौकटी तयार करण्यात, ते ज्ञान प्रमेयात रूपांतरीत करण्यात व्यग्र होते. असो.

बेकनप्रणीत सॉलोमनगृहाच्या कथेतील सर्वात महत्त्वाची कल्पना म्हणजे वैज्ञानिक क्षेत्रात श्रमविभागणीच्या तत्त्वावर काम चालविले जात होते ही होय.

न्यू ॲटलांटिसच्या निमित्ताने बेकनने काही महत्तत्त्वाच्या कल्पना मांडल्या आहेत. त्यातील सर्वात महत्त्वाची कल्पना शास्त्रीय क्षेत्रातील श्रमविभागणीच्या तत्त्वावर केले जाणारे संशोधनकार्य ही होय. बेकन सांगतो की सॉलोमनगृहातील शास्त्रज्ञ संशोधन करताना एकमेकांच्या सल्लामसलतीने आणि सहकार्याने ते करीत असत. प्रत्येकाला त्याच्या कुवतीप्रमाणे तेथे काम वाटून देण्यात येत होते. बेकनच्या मताने शास्त्रीय संशोधन ही गोष्ट एकेकट्याने करायची नसून अनेकांनी एकत्र येऊन करायचे ते काम आहे. अनेकदा असे म्हटले जाते की सर्वात आधी बेकनने श्रमविभागणीचे तत्त्व मांडले. मात्र बेकनच्याही आधी प्लेटोने साधारण अशीच समाजशास्त्रीय कल्पना (थिअरी) त्याच्या 'डायलॉग्जमध्ये' मांडलेली आढळते. तसेच ॲडम स्मिथ (१७२३-९० 'वेल्थ ऑफ नेशन'चा कर्ता) यानेसुद्धा श्रमविभाजनाची कल्पना मांडली आहे. तथापी बेकनची श्रमविभाजनाची कल्पना आणि प्लेटो वँ ॲडम स्मिथची कल्पना यात महत्त्वाचा फरक आहे. प्लेटो आपल्याकडील मनुस्मृतीकार मनूप्रमाणे 'ॲप्टिट्यूड'

*किंवा 'नैसर्गिक प्रवृत्तीला' महत्त्व देतो. प्लेटोच्या मताने नैसर्गिक प्रवृत्ती वेगवेगळ्या असतात व त्या प्रवृत्तीप्रमाणे काम वाटून देणे आवश्यक ठरते. काहीजण बुद्धीचे काम करू शकतात; तर दुसरे काही जण शारीरिक श्रमाचे काम करू शकतात. तर आणखी काहीजण इतरांवर हुकूमत गाजवून त्यांच्याकडून सांगितलेले काम करून घेऊ शकतात. या प्रवृत्ती प्रत्येक व्यक्तीमध्ये जन्मत: आलेल्या असल्याने या प्रवृत्तींना अनुसरून सामाजिक विभागणी करावी लागते. बेकनची श्रमविभागणीची कल्पना अगदी वेगळी आहे. बेकनच्या आणि ॲडम स्मिथच्या कल्पनेत बऱ्यापैकी साम्य आहे. अर्थात स्मिथची कल्पना बेकनच्या कल्पनेपेक्षा खूपच गुंतागुंतीची आहे. मात्र बेकन आणि स्मिथ दोघेही श्रमविभाजनासाठी नैसर्गिक प्रवृत्तीऐवजी अन्य गोष्टींना महत्त्व देतात. बेकनच्या मताने सर्वांनी आपापसात सल्लामसलत करून कामे वाटून घेऊन ती करायची आहेत. प्रत्येकजण समान बुद्धीने काम करतो असे बेकनचे गृहीतकृत्य आहे. परंतु तो म्हणतो की उत्पादनप्रक्रिया सुरळीत आणि व्यवस्थित चालावी असे वाटत असेल तर श्रमविभागणीच्या तत्त्वाचा आश्रय केल्यावाचून समाजाला सुटका नसते. स्वत:चा मुद्दा सिद्ध करण्यासाठी स्मिथ टाचणीउत्पादनाचे उदाहरण देतो. तो म्हणतो की टाचणी बनविण्याचे काम सुटा कामगार करू शकतो किंवा कामगारांचा एक पूर्ण जथाही ते काम करू शकतो. सुटा कामगार टाचणी बनवायचे काम करीत असेल तर. टाचणी बनविण्याचे जे निरनिराळे टप्पे आहेत, ते सर्व त्याला एकट्याला सांभाळावे लागतील आणि त्यात त्याचा खूप वेळ वाया जाईल. याच्या उलट बरेच कामगार एकत्र येऊन जर ते काम करतील तर काम सफाईदार होईलच, पण लवकर लवकर आणि जास्तसुद्धा होईल. एकजण तार कापून तिचे नेमके तुकडे पाडील. दुसरा टाचण्यांचे डोके करील. तिसरा टोक करील वगैरे. एक कामगार एका दिवसात समजा २०० टाचण्या करील, तर कामगारांचा जथा ४८००० टाचण्या करील.*

*येथे एक गोष्ट सांगावयास हवी. शास्त्रीय संशोधन सर्वांनी एकत्र येऊन करावयास हवे ही कल्पना जरी कितीही बरोबर असली तरी ते पूर्ण सत्य नव्हे. कारण वैयक्तिक बुद्धीमत्तेला संशोधनामध्ये नक्कीच खूप महत्त्व आहे. कार्ल पॉपर या विज्ञानाच्या तत्त्ववेत्त्याने बेकनच्या भूमिकेवर आक्षेप घेतला आहे. सर कार्ल पॉपर म्हणतात की शास्त्रीय संशोधनाचे यांत्रिकीकरण करता येत नाही. ( जसे ते टाचण्या पाडण्याच्या कामाचे करता येते. यांत्रिकीकरणात एका कामगाराची जागा दुसरा कोणताही कामगार घेऊ शकतो.) शास्त्रीय संशोधनात प्रशिक्षित तंत्रज्ञानाचा पुरवठा असला की झाले असे करता येत नाही. नवे शोध असाधारण गुणवत्तेच्या व्यक्तीच लावू शकतात. तेथे एका शास्त्रज्ञाची जागा दुसरा घेऊ शकत नाही. तात्पर्य वैयक्तिक बुद्धी हा घटक शेवटी महत्त्वाचा ठरतो. नव्यानव्या उपपत्ती रचल्या गेल्या नाहीत तर शास्त्रीय संशोधनाची प्रगती जेथल्या तेथे कुंठित होईल. आणि नव्या उपपत्ती रचल्या जाण्यासाठी समोरच्या वास्तवाला नवे प्रश्न विचारले जाणे आवश्यक असते. हे प्रश्न 'अ' ऐवजी 'ब'*



अनुक्रमणिका

*विचारू शकणार नाही. तेव्हा शास्त्रीय संशोधन म्हणजे अनेकांनी जमा केलेली माहिती एकत्रित करून त्या माहितीचा सारांश काढणे नव्हे.*

**संपादक**

माझ्या व्याख्यानाच्या विषयाचे शीर्षक किंवा वाटल्यास बोधवाक्य म्हणा मी फ्रान्सिस बेकनकडून घेतले आहे. त्याच्या न्यू ॲटलांटिकस या पुस्तकात हा विचार त्याने मांडला आहे. न्यू ॲटलांटिस हे पुस्तक १६२७ मध्ये प्रसिद्ध झाले होते. न्यू ॲटलांटिस हे बेकनचे स्वप्नच होते म्हणाना. मनुष्यप्राण्याने जमा केलेले ज्ञान स्वत:ची उन्नति साधण्यासाठी जर का वापरले गेले असते, तर जग कसे झाले असते. अथवा अद्यापी ते कसे होऊ शकेल याचे चित्र म्हणजे बेकनचे हे स्वप्न. अलिकडे हे पुस्तक फारसे कुणाच्या वाचनात नाही. विशेषत: ज्यांना बेकन या व्यक्तीमध्ये स्वारस्य नाही किंवा सतराव्या शतकातील वैचारिक मतांच्या गलबल्यातही रस नाही आणि काल्पनिक रामराज्याची चित्रे रंगवणाऱ्या मतप्रणालीबद्दल कुतूहलही नाही अशांना तर 'न्यू ॲटलांटिस ' हे नाव कानावर येताच विचित्र वाटण्याची शक्यता आहे. मी हे नाही म्हणत नाही. मला येवढेच सांगायचे आहे की या घटकेला क्वचित कुणी बेकनच्या प्रस्तुत पुस्तकात रस घेणे शक्य आहे. समाजशास्त्रावरील एखादे मार्मिक भाष्य या पुस्तकात सापडेल म्हणून कुणी या पुस्तकाकडे वळेल असे म्हणावे तर तेही शक्य नाही. कारण तसला मालमसाला या पुस्तकात नाही. किंवा उत्तम विज्ञान-कथेच्या नादाने या पुस्तकाला कोणी हात लावील तर तसेही होईलसे वाटत नाही. उत्तम विज्ञानकथेमध्ये निदान काही अंश तरी संभाव्यतेशी नाते सांगणारा असावा लागतो. तसे काही येथे नाही. तथापी या सगळ्या गोष्टी खऱ्या असल्या आणि हे पुस्तक कल्पनेच्या भराऱ्या आणि कधीही प्रत्यक्षात येऊ न शकणाऱ्या काल्पनिक योजना यांनी अथपासून इतिपर्यंत भरलेले असले, तरी त्यात कल्पनेची एक अशी काव्यमय लकेर आहे की जी पुस्तक वाचून झाले तरी अनेक दिवस मनात घोळत राहाते. बेकनेच न्यू ॲटलांटिस' हे समुद्राच्या पार पलिकडे वसलेले एका बेटावरचे राज्य आहे. आणि या राज्यात फक्त एका वस्तुचा व्यापार होतो. नि ती वस्तू काय म्हणाल तर 'प्रकाश'— लाइट होय. बेटावरचे लोक एवढी ही वस्तू विकतात. बेकनच्या अर्थाने हा 'प्रकाश' म्हणजे अर्थात बौद्धिक आकलनाचा किंवा 'विज्ञान प्रकाश' होय. हा संपूर्ण व्यापार बेटावरील व्यापारी मंडळाच्या ताब्यात असतो आणि या मंडळाला 'प्रकाश व्यापारमंडळ' असे नाव असते. हे सगळे व्यापारी मिळून तेथला समाज बनलेला होता. आणि ते स्वत:ला तत्त्ववेत्त्याचा पंथ म्हणवून घेतात. त्यांचा प्रवक्ता म्हणतो त्या प्रमाणे संपूर्ण भूतलावर त्यांच्याइतके दुसरे उदात्त मंडळ अस्तित्वात असणे शक्य नाही. कारण प्रत्येक घटनेमागील कारणपरंपरा शोधून काढणे, गतीच्या गतीचा शोध घेणे व मानवी ज्ञानाच्या कक्षा रुंद करून त्या ज्ञानाच्या मदतीने जे जे म्हणून शक्यतेच्या कोटीतील

भासेल, ते ते व्यवहारात आणायचा प्रयत्न करणे हा आमच्या तत्त्वज्ञानाचा मूलभूत हेतू आहे.' माझ्या व्याख्यानाचे शीर्षक म्हणून मी हेच सूत्र का निवडले त्याचा उलगडा ओघाने होणार आहे.

याच विषयावर व्याख्यान देण्यात माझा काही एक विशिष्ट हेतू आहे. सतराव्या शतकातील विचारी लोकांची आध्यात्मिक आणि वैचारिक अवस्था आणि आजच्या काळातील त्याच वर्गातील लोकांची अवस्था यात माझ्या दृष्टीने साम्य आहे. परंतु सतराव्या शतकामध्ये नवे वैचारिक वारे वाहू लागताच त्या काळातील बुद्धिमान वर्गाला नवे बौध्दिक आकलन प्राप्त झाले होते. जगण्यासाठी नवा धीरही त्यांना आला होता. परंतु आमच्या पूर्वजांच्या बाबतीत त्या काळात जे घडू शकले ते आपल्या बाबतीत मात्र घडलेले नाही; आता असे का, आमच्या बाबतीत ते का घडू शकले नाही. या गोष्टींचा विचार मला करायचा आहे. एका शब्दात, मनाला धीर देण्याची, हुरूप देण्याची विचारांची शक्ती कशामुळे खच्ची झाली हा प्रश्न मला पडला आहे.

१६०३ मध्ये पहिला जेम्स इंगलंडच्या गादीवर आला. पुढे काही वर्षांनी यादवी युद्ध घडून आले. या दोन घटनांच्या मधला कालखंड मला येथे अभिप्रेत आहे. कारण आजची सर्वसाधारण परिस्थिती त्या कालखंडासारखी आहे. विचारांचा इतिहास लिहिणारे इतिहासकार सांगतात की त्या काळात समाजाला पडलेल्या प्रश्नांची उत्तरे दिली जाण्याऐवजी आणखी नवे नवे प्रश्न उपस्थित केले जात होते. लोक संभ्रमित बनले होते. मानसिक अस्वास्थ्याने पछाडले गेले होते. बौद्धिक अनिश्चततेने हतबल झाले होते. बौद्धिक साशंकता आणि त्या साशंकतेपाठोपाठ येणारी मानसिक विपण्णता, नैराश्य यांचे ते बळी ठरले होते. एका बाजूला लंबीचवडी नैतिक प्रवचने समाजाला दिली जात होती, पण त्याच वेळी व्याजोक्ती आणि वक्रोक्तीपूर्ण लिखाणही मोठ्या प्रमाणात निर्माण होत होते. औपरोधिक लिखाणाचे पेवच जणू तेव्हा फुटले होते. अनेक प्रकारचे धार्मिक पंथोपपंथ उदयास येऊन लोकांना आपल्या बाजूला वळविण्यासाठी झटत होते. फार कशाला पण 'एकांतिक वामाचाराचा प्रचार करणाऱ्या आणि वामाचारातून मुक्ती मिळवून देण्याच्या गोष्टी करणाऱ्या' पंथांचाही समावेश तत्कालिन धार्मिक पंथोपपंथांमध्ये होता. थोडक्यात सर्व प्रकारची धरसोड आणि ऱ्हासाच्या जाणिवेमुळे मनुष्यातील नैसर्गिक आशावादी प्रवृत्तींवर जेव्हा निराशेचे काळे ढग येऊ लागतात तसला तो काळ होता. वाङ्मयीन इतिहासकारांनी या कालखंडाला 'अंगावर आध्यात्मिक शहारे आणणारा काळ' असे नाव दिले आहे. तर अन्य काहीजण 'आणीबाणीचा किंवा हातपाय गाळण्याचा काळ' असेही याच काळाबद्दल म्हणतात. मात्र या सर्व वर्णनावरून अशी जर कल्पना कोणी करून घेऊ लागला की त्या काळातील सर्वसामान्य प्रत्येक नागरीक आध्यात्मिक ऱ्हासाच्या आजारपणाची लागण झालेली मंडळी जसा लांब चेहरा करून हिंडतात तसे हिंडत होता तर ते चूक ठरेल. चिंतनशील तात्त्विक प्रकृतीच्या माणसानांच फक्त पुढे काय होणार याची भीती ग्रासून राहिली होती. म्हटले तर तुमच्यामाझ्यासारखा प्रत्येक जण म्हटले तर कोणीही नाही. कारण

कधी ना कधी तुम्ही आम्ही प्रत्येक जणच त्या प्रकारच्या चिंतेने व्याकुळ होत असतो. आणि त्या अर्थाने सदासर्वकाळ नसला तरी प्रत्येकजणच आयुष्यात कधीतरी या मनस्थितीतून गेलेला असतो. त्यामुळे शेवटी आपण असे म्हणू शकतो की, त्या काळात काय नि आताच्या काळात काय मन अस्वस्थ करून सोडणाऱ्या विचारांवर इलाज स्वास्थ्याचा पाठलाग हा नसून, विचार करण्याचे पूर्णपणे बंद करून टाकणे हाच अनेकदा असतो. लोकांनी विचारांची कवाडे बंद करून घेतली होती असा याचा अर्थ.

वरील वर्णनावरून त्या काळात सर्वच संपले होते असे कोणी समजू नये. तात्त्विक दृष्ट्या नैराश्य आणणाऱ्या ज्या काळाबद्दल मी बोलत आहे, त्याच काळात नवी आशा आणि नव्या भविष्याच्या शक्यतेची रुणझुणही कानावर पडू लागली होती. मानवी विचारशक्तीच्या कर्तृत्वावर या नव्या आवाजाचा विश्वास होता. निसर्गाच्या आकलनातून भौतिक जगावर वर्चस्व प्रस्थापित करता आल्यास मनुष्यप्राणी काय साध्य करू शकेल याच्याबद्दल तो आवाज बोलत होता. ही एक नवी पहाटच उजाडत होती आणि इंगलंडमध्ये तरी नवे उषासूक्त गाणारांमध्ये फ्रान्सिस बेकन अग्रक्रमावर होता यात मला स्वत:ला अजिबात शंका नाही. ज्ञानसंपादनामागील नवी उद्दिष्टे कोणती याची वाच्यता सर्वात आधी त्याने केली. आणि कोणत्या साधनांमुळे ही उद्दिष्टे यशस्वी होतील हेही त्यानेच सांगितले. अर्थात साधनांबद्दलचे त्याचे वक्तव्य तितकेसे अचूक नव्हते हे कबूलच करावयास हवे. त्यानंतर माणसांचा उत्साह हळूहळू वाढू लागला . अगदी सतराव्या शतकातीलच एका छानदार रूपकात बोलायचे तर, तत्कालीन बौद्धिक वातावरणात बदल जरी धीम्या गतीने होत होता तरी तो चारी अंगांनी होत होता हे निश्चित. रडगाणे गात बसावे अशी ती गोष्ट उरली नव्हती. येथे एक गंमत सांगण्यासारखी आहे. बेकनचाच 'ग्रेट इन्स्टॉरेशन' नावाचा ग्रंथ आहे. त्या ग्रंथावर 'जिब्राल्टरच्या आखाताचे रक्षण करणारे' आणि ज्याना 'हर्क्युलिझचे स्तंभ' म्हणतात त्या धोक्याच्या दोन स्तंभाचे चित्र रेखाटलेले आहे. 'नव्या तत्त्वज्ञाना'च्या 'एक व्हा' या घोषणेसाठी हेच दोन स्तंभाचे चित्र वापरले गेले होते. डॉ. मार्जोरी होप निकोलसन या प्रख्यात अमेरिकी विदुषीच्या शब्दात हे कसं घडेल ते सांगायचे तर म्हणता येईल की :

''कोलंबसाने अॅटलांटिक महासागरावर सफर करावयास निघेस्तवर स्पॅनिश राजघराण्याच्या ध्वजचिन्हावर जिब्राल्टरची सामुद्रधुनी, हर्क्युलिझचे स्तंभ आणि त्याच्यापुढे 'न प्लू अल्ट्रा-पुढे काहीही नाही' ही घोषणा असे कुलचिन्ह कोरलेले असे. कारण तत्कालीन कल्पनेप्रमाणे हर्क्युलिझचे स्तंभ ही जगाची अंतिम हद्द होती. संपूर्ण जगाचे अखेरचे टोक हाच तेव्हा स्पेनचा गौरव होता. कोलंबसाने जेव्हा आपला शोध लावला तेव्हा स्पेनच्या राजघराण्याने कुलचिन्हामध्ये कमीत कमी आणि काटकसरीची काटछाट करायची म्हणून कुलचिन्हातला 'नाही' शब्द गाळून टाकला. आणि हर्क्युलिझचे स्तंभ आणि त्या स्तंभाच्या पुढे 'प्लू' अल्ट्रा 'पुढे खुप काही' हे शब्द शिल्लक ठेवले ... पुढे बराच प्रदेश शिल्लक आहे हा भावार्थ ...''



अनुक्रमणिका

तात्पर्य 'प्लू अल्ट्रा', 'पुढे आणखी बरेच' हेच नववेकनवाद्यांचेही बोधचिन्ह बनले. द ग्रेट इन्टॉरेशनच्या मुखपृष्ठावरचे हर्क्युलिझचा स्तंभ आणि जिब्राल्टरच्या आखातातून इकडून तिकडे नि तिकडून इकडे वाहतूक करणारी जहाजे दाखविली आहेत. हे प्रतीक चिन्ह.

या सर्व चिन्हांवरून असे म्हणता येइल की हे एक नवे जिज्ञासायुग अवतरले होते. आणि हे जिज्ञासायुग होते याचे एक लक्षण हे की ब्रिटनमध्ये रॉयल सोसायटीची व इटाली-फ्रान्समध्ये विद्वानपरिषदासारख्या संस्थांची केली गेलेली स्थापना. या तिन्ही संस्थांची स्थापना हेच दर्शविते की संशोधक वृत्तीला महत्त्व येऊ लागले होते. रॉयल सोसायटीची स्थापना कशी झाली याच्या एकापेक्षा अधिक कथा सांगितल्या गेल्या आहेत. कारण रॉयल सोसायटीचे पितृत्त्व कोणाकडे जाते हा मुद्दा आजही वादग्रस्त आहे. आपण असे म्हणू शकतो की शास्त्राच्या संबंधातील बेकनची महत्त्वाकांक्षा अशा प्रकारे फलद्रूप झाली होती. पण याचा अर्थ बेकनची महत्त्वाकांक्षा फलद्रूप होताच सतराव्या शतकातील संपूर्ण तात्त्विक आणि बौद्धिक अनिश्चितता व संभ्रम संपुष्टात आला होता असा नव्हे. किंवा या अनिश्चिततेवर व संभ्रमावर पडदा पडला होता असेही नव्हे. असे मानणे म्हणजे वस्तुस्थितीकडे अत्यंत कोत्या दृष्टीने पाहाणे ठरेल. आधुनिक धर्तीच्या शास्त्रीय संशोधनाला खरे तर त्याच्याही आधी पासून प्रारंभ झाला होता. सतराव्या शतकाचे या बाबतीतले कर्तृत्त्व वेगळेच आहे; आणि ते सतराव्या शतकाच्या उत्तरार्धातले आहे. या कालखंडात शास्त्रीय संशोधनाकडे व एकुणच शास्त्राकडे पाहाण्याचा एक नवीन दृष्टीकोन तयार झाला व ह्या दृष्टीकोनामुळे शास्त्र व शास्त्राचे संवर्धन हे उपयुक्त ठरले, योग्य मानले जाऊ लागले होते. धर्माच्या विरोधी तर ते बिलकूल राहिले नाही आणि हेच सतराव्या शतकाचे कर्तृत्त्व होय. ही एक काहीशी व्यापक आणि उदारमतवादी अशी जी भूमिका होती आणि शास्त्र किंवा विज्ञान हे ज्या भूमिकेचे प्रधान कारकतत्त्व होते, त्या भूमिकेबद्दल जर आमच्या मनात सहानुभूती असली तर त्या भूमिकेला आम्ही 'रॅशनल ह्युमॅनिझम' किंवा 'विचाराधिष्ठित मानवतावाद' हे नाव देऊ शकू.

आणि तसे झाले तर मग जॉन लॉक (१६३२-१७०४) या इंग्लिश तत्त्ववेत्याकडून आपणाला स्फूर्ती घेता येईल. परंतु या भूमिकेच्या आम्ही विरोधी असल्यास त्या भूमिकेला 'भौतिक बुद्धिवाद' या शब्दांनी संबोधता येईल आणि तसे करताना थॉमस हॉब्जबद्दल (१५८८-१६७९) कपाळावर आठयाही तुम्ही पाडू शकता. वस्तुत: या दोहोंपैकी एकही वर्णन तत्कालीन वस्तुस्थितीला लागू पडण्यासारखे नाही. कारण की त्या काळात ही जी नवी वैचारिक चळवळ उदयाला आली होती तिचे नेमके स्वरूप तोवर स्पष्ट दिसू लागले नव्हते. हे अथवा ते इतका स्पष्टपणा तिला आला नसल्याने, ना ती धर्माला पर्याय झाली होती, ना धर्मावरचा तो उतारा वाटत होता. 'विचाराधिष्ठित मानवतावाद' या शब्दाचा अर्थ धर्मसंस्थेला पर्याय असा आहे. त्या काळात हा अर्थ या शब्दाला आला नव्हता.



अनुक्रमणिका

'विचाराधिष्ठित मानवतावादांच्या विचारसरणीचे वर्णन कोणत्याही शब्दात कराना, एक गोष्ट खरी आहे की पुढील जवळ जवळ दीडशे वर्षे त्या विचारसरणीचा तात्त्विक प्रभाव दृष्यमान होता. एवढेच नव्हे तर आठव्या शतकात ज्या कल्पना फार क्रांतिकारक, रोमांचकारक वगैरे वाटत होत्या, त्याच कल्पना अठराव्या शतकाच्या अखेरीला ॲडम फर्ग्युसन, विल्यम गॉडविन आणि कॉन्दोर्सेतसारखे, 'रीझन ॲंड एनलायटनमेंट' किंवा विचारशक्ती आणि ज्ञानोदय चळवळीचे प्रवक्ते गृहीत धरून वागू लागले होते. तथापी याच कालखंडात एक महत्त्वाचा बदलही घडून येत होता हे नाकारून चालणार नाही. सतराव्या शतकापर्यंत चिकित्सक बुद्धीकडे एक उपयुक्त आणि आवश्यक हत्यार म्हणून पाहिले जात होते. परंतु अठराव्या शतकामध्ये या दृष्टीकोनात बदल घडून आला होता. आता चिकित्सकबुद्धी किंवा विचारशक्ती असली की जगात आणखी कशाची गरज नाही हा विचार बळावत जात होता. आणि अशा प्रकारे सतराव्या शतकातील विचारशक्ती ही एक गरजेची गोष्ट आहे हा विचार बाजूला सारला जाऊन त्याची जागा विचारशक्तीशिवाय आणखी कशाची गरज नाही या नव्या विचाराने घेतली होती. दुसऱ्या शब्दात सांगायचे तर असे म्हणता येईल की विचारशक्तीवरचा वि:श्वास ही एक नवी अंधश्रद्धा वनली होती. अनेक मानवी समजुतीच्या बाबतीत नेहमी हाच अनुभव येतो. किंबहुना मानवी समजुतीची ती एक नैसर्गिक प्रवृत्तीच आहे म्हणाना. बुद्धीला आव्हान करून मनुष्याचे मन वळविण्याची या समजुतींची शक्ती हळूहळू खच्ची होत जाते. आणि मग बुद्धीला आवाहन करण्याऐवजी या समजुती टोकाची व एकांतिक जहाल भूमिका घेऊ लागतात; आणि एकदा का कोठल्याही समजुती जहाल बनल्या की त्यांच्यापासून नवा उपद्रव सुरू होतो. मुळात एके काळी काही एका बौद्धिक उपद्रवावरचा इलाज किंवा उतारा म्हणून अशा समजुतींचा पुरस्कार केला गेलेला असतो. परंतु आता मूळचे सौम्य व बुद्धीला आवाहन करून मानवी मन वळविण्याचे काम सोडून एकदम जहाल अभिनिवेशाचे स्वरूप जेव्हा त्या धारण करतात, तेव्हा ज्या उपद्रवाचा इलाज म्हणून त्यानी जन्म घेतलेला असतो त्यातलेच कित्येक उपद्रव त्या नव्याने निर्माण करतात. (असे कित्येकदा म्हटले जाते की जहाल बुद्धीवाद जर का धर्मसंप्रदायांची काही लक्षणे आत्मसात करू शकला तरच त्याला धर्माची जागा घेता येईल. दुसऱ्या शब्दात खुद्द बुद्धिवाद स्वत:च जर का धर्मसंप्रदायासारखा धर्मसंप्रदाय बनला तरच तो प्रस्थापित धर्म हटवून त्या धर्माची जागा घेऊ शकेल.) बुद्धिवादाबद्दल मी हे भाष्य करीत आहे ही गोष्ट जरी खरी असली तरी मला विचारशक्तीचे सामर्थ्य कमी लेखायचे आहे असा गैरसमज मात्र कृपाकरून कोणी करून घेऊ नये. मला तसले काहीही अभिप्रेत नाही. 'नेसिसिटी ऑफ रिझन' किंवा 'विचारशक्तीची अपरिहार्य आवश्यकता' आणि 'सफिसिअन्सी ऑफ रिझन' किंवा विचारशक्ती असली की जगात आणखी कशाची गरज नाही, 'विचारशक्ती एवढे एक हत्यार पुरे' या दोन भूमिकांमध्ये खूप फरक आहे. हा फरक सर्वांच्या निदर्शनास आणण्यासाठी मी प्रयत्न करीत आहे. आणि त्याचे

कारण हेही आहे की अलिकडे नेमक्या याच प्रकारचा मुद्दा पुढे करून बुद्धिवादाचे उच्चाटन करण्याचे किंवा बुद्धिवादाला बाद ठरविण्याचे जे प्रयत्न सुरू आहेत, त्या प्रयत्नांवर मला आघात करायचा आहे. मानवी विचारशक्तीवर शंभर टक्के विसंबून रहाता येत नसल्याने, विचारशक्ती स्वयंपूर्ण नसल्याने विचारशक्तीची गरजच नाही अशी जी माझ्या दृष्टीने एखाद्या वेड्यासारखी व स्वत:चाच नाश करणारी भूमिका आज घेतली जात आहे, त्या भूमिकेचा प्रतिवाद करण्यासाठी वरील मुद्दा मी मांडला आहे. जगातील यच्चयावत प्रत्येक प्रश्न विचारशक्तीच्या साहाय्याने सोडविला जाऊ शकत नाही, म्हणून विचारशक्तीला अजिबात किंमतच देता कामा नये असे म्हणणे म्हणजे स्वत:च्या हाताने स्वत:चा नाश करून घेण्यासारखे आहे.

अनेक चिंतनशील व्यक्तींना आज असे वाटू लागले आहे की सतराव्या शतकाच्या पूर्वार्धामध्ये ज्या प्रकारचे बौद्धिक आणि आध्यात्मिक घालमेलीचे वातावरण विद्यमान होते तसल्याच वातावरणात आम्ही फिरून एकदा वावरू लागलो आहोत. दोन्ही कालखंडांची काही समान वैशिष्ट्ये दाखविता येतील. सतराव्या शतकाच्या पूर्वार्धाप्रमाणेच आज देखील समाजामध्ये मतामतांचा गलबला सुरू आहे. तसेच तेव्हा जशी कोठलीही एक विशिष्ट मतप्रणाली प्रभावी नव्हती ( म्हणजेच 'अमक्या विचारांचे युग' हा शब्दप्रयोग तेव्हा करता येत नव्हता.), तसेच आता सुद्धा कोठलीही एक विशिष्ट मतप्रणाली प्रभावी नाही. तो काळ आणि आताचा काळ यातील दुसरे समान वैशिष्ट्य असे की त्या काळात ज्याप्रमाणे जुन्या विचारप्रणालीतील त्रुटी उघड्यावर येत होत्या परंतु त्या विचारप्रणालींची जागा घेण्यासाठी दुसऱ्या तितक्याच समर्थ प्रणाली पुढे येत नव्हत्या, तसेच आजही घडत आहे. त्यामुळे सामाजिक वातावरणामध्ये एक प्रकारची बौद्धीक पोकळी तेव्हा जाणवत होती नि तशीच आजही जाणवत आहे. तेव्हाप्रमाणे आजही बौद्धिक वातावरण संभ्रमित आणि अनिश्चित आहे. दोन्हीही कालखंडांमध्ये तात्विक युगान्ताची लक्षणे नजरेस पडतात. सतराव्या शतकाच्या पूर्वाधाला एलिझावेथकालीन तात्त्विक चित्र समाधान देण्यास आणि स्वास्थ्य आणण्यास निरपयोगी ठरले होते, तर आजकाल तीच अवस्था परंपरेने व्हिक्टोरिया राणीच्या कालखंडाशी ज्यांची नावे जोडली जातात त्या विचारवंतानी प्रस्तुत केलेल्या जहाल भौतिकवादाची झाली आहे. आमच्या तक्रारींचे निवारण करण्याच्या दृष्टीने जहालभौतिवाद कुचकामी ठरला आहे. उफराटा युक्तीवाद करून असे म्हटले जाते की सेंट थॉमस ॲक्विनास (१२२६-७४) आणि त्याने चालना दिलेले शब्दाचा केवळ कीस काढणारे (स्कोलास्टिक रिझनिंग) आणि ॲरिस्टॉटलच्या स्पष्टीकरणचौकटीला आधारभूत मानून काम करणारे तर्कशास्त्र वापरले गेल्याने, नव्या संशोधनाला आणि विचाराला खीळ पडली. नवे विचार थांबले. ख्रिस्ती मठवासी धर्तीच्या विचारपद्धतीमुळे नव्या विचारांपासून मनुष्य परावृत्त झाला. वस्तुत: हे बोलणे अजिबात चूक आहे. कारण सृष्टीच्या व्यवहाराबद्दलची ॲरिस्टॉटल आणि ॲरिस्टॉटलचा अनुयायी म्हणून सेंट थॉमस दोघांचीही स्पष्टीकरणे अंतिम स्वरूपाची

होती व ती अंतीम स्वरूपाची असल्याने मनाला समाधान देणारी होती. म्हणजे ही स्पष्टीकरणे समाधानकारक असल्याने साहाजिकच सृष्टीव्यवहारसंदर्भात नवे प्रश्न बिचारणे बंद झाले होते. कारण यशस्वी, मानसिक समाधान देणाऱ्या स्पष्टीकरणांचे हेच तर महत्त्वाचे कार्य असते. ही स्पष्टीकरणे असे भासवतात की सगळ्या प्रश्नांची उत्तरे हाती आलेली आहेत. आता शोधायचे बाकी काहीही उरलेले नाही. ते राहो. मुद्दा असा की सतराव्या शतकातील विचारवंतांच्या लिखाणात ॲरिस्टॉटलच्या विचारांचा, प्राचीन ग्रंथाध्ययनाच्या वर्चस्वाचा, मध्ययुगीन मठवासी पद्धतीच्या, तर्कशास्त्राचा सुवर्णयुगाच्या अभ्यासाचा, इ. इ. अनेक बाबींचा प्रतिवाद व निषेध आढळतो. आणि त्याचे कारण म्हणजे आताच म्हटल्याप्रमाणे नव्या विचारांच्या उदयाच्या मार्गातील त्यांचा अडथळा. अगदी तशीच परिस्थिती आजही दिसून येत आहे. गेल्या चाळीसपन्नास वर्षातील लिखाण तपासले तर त्या लिखाणात बुद्धिवाद आणि भौतिकवाद दोन्हींबद्दल तुच्छतेचे उद्‌गार नजरेस पडतील.

आपण जर का मनावरच घेतले तर आजचे जग आणि सतराव्या शतकाची पहिली चाळीस किंवा पन्नास वर्षे या दोन कालखंडात असलेली अनेक साम्यस्थळे तपशीलवार मांडून दाखवू शकू. त्या सर्वांचा संबंध त्या त्या कालखंडातील बौद्धिक असमाधान आणि अश्रद्धेशी आहे हेही आपण दाखवून देऊ शकू. यातील प्रत्येक आक्षेप सुटा सुटा घेऊन त्यातील खोडही आपण काढून दाखवू शकू. मात्र शेवटी ही गोष्ट उरतेच की हे सगळे आक्षेप एकत्रित केले तर त्या काळाच्याविरुद्ध एक भक्कम केस नजरेला पडतेच आणि ते नाकारता येत नाही. अलिकडच्या कादंबऱ्या आणि ललित लेखन दोन्हींची प्रवृत्ती बाहेरच्या जगाकडे पाहाण्याऐवजी मनाच्या आतल्या जगाकडे पाहण्याची आहे. या लेखकांना मुख्य चिंता वैयक्तिक मुक्तीची आणि वैयक्तिक अस्तित्व खऱ्या अर्थाने सार्थ कसे बनविता येईल याची दिसून येते. रंगभूमीकडे वळलो तरीही कथा तीच म्हणता येईल. कारण रंगभूमीवर तुम्हाला उपहासात्मक आणि ज्या नाटकांमध्ये याकोबिन धर्तीचा वास्तववाद चित्रित केला गेला आहे अशीच नाटके आढळतात. (याकोबिनिझम : फ्रेंच राज्यक्रांतीच्या काळातील एक जहाल राजकीय चळवळ. रॉबेस्पियर आणि याकोबिन क्लबच्या समभासदांशी संबंधित. हर प्रयत्नाने क्रांती तडीस न्यावयाचीच या विचारसरणीचा मोठा प्रभाव. हाच शब्दप्रयोग नंतरच्या काळातील क्रांतीकारक चळवळीतील समान प्रवृत्तींना उद्देशून वापरला जात आहे. या विचारसरणीची काही लक्षणे अशी : ही लक्षणे रूसोच्या शिकवणीतून आली आहेत. बहुसंख्यांकांच्या मताबद्दल दारूण तिटकारा. रूसोच्या मताप्रमाणे गर्दीला विशेष बुद्धी नसते. त्यामुळे गर्दीला क्रांती यशस्वी करता येत नाही. 'गर्दी' अंध असते. आपणाला खरोखरच काय हवे आहे हे देखिल गर्दीला व्यवस्थितरीत्या समजत नाही. कारण आपल्या खऱ्या हिताचे काय आहे हे तिला क्वचितच कळू शकते. स्वत:साठी कायदे करणे हे एक अतिशय कठिण पण तितकेच महत्त्वाचे काम आहे. हे काम गर्दीला पार पाडता येईल काय? 'त्यामुळे' देशातील सगळ्या जनतेची मते गोळा करीत

बसण्यापेक्षा राष्ट्राची सार्वभौम सत्ता कमीत कमी जुलूम वापरून, शहाण्या व समर्थ क्रांतीकारकांच्या हाती येईल याची काळजी घेणे हे अधिक महत्त्वाचे आहे. क्रांती यशस्वी करताना जुलूमजबरदस्ती आणि दहशत वर्ज्य नाही ही कल्पना १९ व्या आणि २० व्या शतकातील अनेक क्रांतिकारकांनी पुन्हापुन्हा बोलून दाखविली आहे. सतरावे शतक आणि हे शतक यातील साम्य अशा प्रकारे कोणाच्याही ध्यानात यावे.)

या दोन कालखंडातील राजकीय आणि आर्थिक घडामोडीतील साम्यसुद्धा मी दाखवू शकतो. परंतु मी ते बाजूला ठेवतो. खरे तर राजकीय आणि आर्थिक बाबींच्या संदर्भातील साम्यदेखील महत्त्वाचे आहे. पण त्याचा विचार करूया नको. त्या ऐवजी रोजच्या वापरात 'तत्त्वचिंतन' किंवा 'तात्त्विक चर्चा' हा शब्द ज्या अर्थाने आपण वापरतो त्या अर्थाच्या तात्त्विक चर्चा या दोन कालखंडात ज्या होत असत त्याचा विचार करू या. रोजच्या व्यवहारात तत्त्वचिंतन हा शब्द आपण मानवी जीवनाचे प्रयोजन काय किंवा मनुष्याने जगावे कसे अशा सारख्या चर्चांना लावतो; एका शब्दात लहान मुले जे प्रश्न विचारतील तशा प्रश्नांना आणि त्यांच्या उत्तरांना लावतो. तर सांगायची गोष्ट ही की त्याकाळातील सामान्य लोक आजच्या काळातल्याप्रमाणेच अशाच घरगुती स्वरूपाच्या तात्त्विक प्रश्नांनी पछाडले गेले होते. सांस्कृतिक ऱ्हास होत आहे. समाजाची नितिमत्ता खालावत आहे ही जशी आजची आपली तक्रार आहे, तशीच तक्रार सतराव्या शतकाच्या पहिल्या चाळीसपन्नास वर्षांच्या काळात लोक करू लागले होते. मात्र त्या काळच्या आणि आजच्या काळाच्या तक्रारीत एक महत्त्वाचा फरक आहे. आज ऱ्हासाचे कारण तंत्रवैज्ञानीक संशोधनावर आधारीत जे नवे नवे बदल सर्व बाबतीत घडवून आणीत आहोत त्यात आपण शोधतो. हे कारण तेव्हा नव्हते. तंत्रविज्ञानाचा पाठपुरावा केल्याने जगाचा ऱ्हास होणार, जगाची तब्येत खालावणार या भीतीने आज आपण त्रस्त झालो आहोत. कृत्रिम खते व कीटकनाशके आमचे आरोग्य नष्ट करीत आहेत (असे आम्ही स्वत:शी बोलतो.) टाकून दिलेली रासायनीक द्रव्ये आणि वापरून कचरा म्हणून फेकून देण्यात आलेली किरणोत्सर्गी द्रव्ये याने जमीन आणि समुद्र प्रदूषित होत आहेत. औषधी द्रव्यामुळे एका आजारावर इलाज झाला तरी त्याच द्रव्यामुळे नवा आजार मुळ धरतो. आधुनिक मानव एकतर वेदनानाशकाच्या प्रभावाखाली तरी राहात आहे किंवा उत्तेजकांच्या प्रभावाखाली तरी राहात आहे. गुंगीच्या औषधाच्या प्रभावाखाली तो नसतो तेव्हा तो उत्तेजकाच्या प्रभावाखाली असतो. या आमच्या तक्रारी आहेत. पुन्हा एकदा नैराश्याच्या वातावरणाने जोर केला आहे. आजचा मानव पुन्हा एकदा स्वत:मधील अपूर्णत्त्वाच्या भावनेने ग्रासला आहे. प्राप्त परिस्थितीला पुरे पडण्याइतकी मानसिक शक्ती आपल्यापाशी नाही असे त्याला वाटू लागले आहे. माझी खात्री आहे की भावी इतिहासकार या कालखंडाबद्दल जेव्हा लिहितील तेव्हा ते नक्कीच या काळातील माणसांचा धीर खचला होता, त्यांची उमेद नष्ट झाली होती असे म्हणतील. विद्वान आणि बुद्धिमान मंडळी कदाचित पुन्हा एकदा थोड्या वरच्या दर्जाच्या वेड्या कैफात विरंगुळा शोधण्याचा प्रयत्न करतील.

(अर्थात हा वेडा कैफ त्या मानाने सहृदय आणि सौम्य जातीचा असेल हेही मी सांगतो.) सतराव्या शतकाच्या मध्यावर केंब्रिज नव-प्लेटोनिझमसारखे शास्त्र आणि धर्म या दोन गोष्टींची सांगड घालणारे गूढवादी पंथ फोफावले होते.

आजही तसल्या गुढवादी पंथांचे भाउबंद आपल्या अवतीभोवती वावरताना आपण पाहातच आहोत. तायहार्द-द-शार्दे (फ्रेंच भूस्तर शास्त्रज्ञ, तत्त्ववेत्ता थिऑलॉजीयन. जेजुइट महंत. याने उत्क्रांतीवादावद्दल खैस्त्य दृष्टीकोनातून उत्क्रांतीवादाचा अर्थ विशद करणारी अनेक पुस्तके लिहिली होती. १८८१-१९५५) यांचे लिखाण व पंथ किंवा 'विझडम ऑफ द इस्ट' – पौर्वात्य गूढ ज्ञान आणि त्या ज्ञानावरचा नवा विश्वास. ही त्या प्रकारची काही उदाहरणे आहेत. मुद्दा असा की सतराव्या शतकाच्या मध्यावर विद्वान आणि बुद्धिमान लोक मानवी विचारशक्तीकडून जगातील सगळ्या प्रश्नांची उत्तरे येऊ शकत नाहीत, विचारशक्ती कमकुवत ठरली असा विचार करून ज्याप्रमाणे दुसऱ्या टोकाला जाऊन गुढवादी पंथ आणि अशाच भ्रामक गोष्टींच्या मागे गेले होते, तशाच प्रकारे आजचेही विद्वान आणि बुद्धिमान लोक गूढवादाच्या वगैरे नादी लागत आहेत. पुन्हा एकदा तात्त्विक चिंतनाला मरगळ आली आहे. तात्त्विक चिंतनावद्दल मनस्थिती द्विधा वनली आहे. काहीच खरे वाटेनासे झाले आहे. विचारशक्तीच्या कुवतीवरचा विश्वास नष्ट झाला आहे. निदान कमी तरी निश्चित झाला आहे. परिणामत: वुद्धिमंताचाही नाना प्रकारच्या मूर्ख समजुतींवर विश्वास वसताना नजरेस पडत आहे. तर्कशास्त्राचे जणू दुसरे टोकच त्यानी गाठले असावे अशी स्थिती आहे. विचारशक्तीकडे पाठ फिरवून त्यानी मूर्खपणाला पाठिंबा दिला आहे. कारण विचारशक्ती शंभर टक्के समर्थ नाही. मग विचारशक्तीच्या मागे जावेच का? अशी काहीशी ही भूमिका आहे. अगदी अशीच परिस्थिती सतराव्या शतकामध्येही होती. त्यामुळे सतराव्या शतकावद्दल आपल्याला एक खास सहानुभूती वाटू लागते. बुद्धीवादाच्या तत्त्वज्ञानाचा एकोणिसाव्या शतकातील थोर इतिहासकार विल्यम लेकी याला, सतराव्या शतकाच्या अखेरीपर्यंत चेटक्यांना पकडून त्यांना जिवंत जाळणे हे प्रकार सुरूच होते याचे आश्चर्य वाटते. तसेच जोझेफ ग्लानव्हिलसारखा विद्वान गृहस्थ एकीकडे रॉयल सोसायटीचा पुरस्कार करतो आणि दुसरीकडे जादूटोण्यावरही विश्वास ठेवतो याचेही आश्चर्य वाटते. हे दोन उल्लेख येथे अशासाठी केले की आज सर्वत्र जे वातावरण नजरेस पडते तसेच वातावरण सतराव्या शतकातही अस्तित्वात होते हे ध्यानात यावे.

आज या गोष्टींचे आम्हाला आश्चर्य वाटत नाही. भूमितीकार पास्काल जो अनंत आणि सूक्ष्मातील सूक्ष्म या दोन्ही गोष्टींबद्दल पूर्ण विश्वासाने बोलतो, तोच पास्काल अनंत विश्वावद्दल बोलताना सभोवार पसरलेल्या अवकाशाचा एकटेपणा आणि अंधार यांनी घायाळ आणि व्याकुळ होतो. एकीकडे आपण महान भूमितीकाराच्या रूपातील पास्काल पाहातो, तर दुसरीकडे महान कॉस्मोफोव – भयग्रस्थ गृहस्थाच्या रूपातही तोच पास्काल आपल्यासमोर उभा राहातो. खगोलशास्त्रज्ञ आणि विश्वोत्पत्तीशास्त्र या दोन

शास्त्रातील नवे शोध नेहमीच मन अस्वस्थ करणारे असतात. जॉन डॉन आणि पास्काल आणि त्यांच्यानंतर विल्यम ब्लेक या कवीला वाटलेला विस्मय त्याचीही आठवण आपण करू शकतो. विश्वोत्पत्तीसंबंधीच्या नव्या कल्पना नेहमीच विस्मयचकित करणाऱ्या असतात; आणि अनेकांसाठी मानवी क्षुद्रतेची आठवणही त्या करून देणाऱ्या असतात. नक्षत्रलोकाशी संबंधित आजचे आपले पराक्रम आणि साहसी कृत्ये एकाच वेळी मनाला हुरूप आणतात आणि मनाचा थरकापही उडवतात. अंतराळात अग्निबाण सोडणे ही गोष्ट (सतराव्या शतकाच्या भाषेत म्हणजे) एक कल्पनेच्या बाहेरचा प्रकार आहे. ज्यानी ज्यानी अग्निबाणाची चित्रे पाहिली असतील त्याना त्याना कॅथिड्रलची किंवा अनेक ठिकाणच्या प्रमुख चर्च इमारतींची आठवण झाली असणार. ज्या पोलादी बांधकामावरून (किंवा चर्च इमारतीच्या संबंधात मधले लांब बांधकाम) अपोलो अग्निबाण उडविण्यात आले त्या बांधकामाचा एकूण आकार आणि त्याचे स्वरूप हे हुबेहूब कॅथिड्रलची आठवण करून देणारे होते. तसेच भव्य. आणि अपोलो हा अग्निबाण तर जणू दुसरा मनोराच दिसत होता. कॅथिड्रील किंवा चर्च अवाढव्य आणि देखणी वास्तू ही जशी पैशाचा हिशेब करता पैशाची केवळ उधळपट्टी, सार्वजनिक पैशाची नासाडी आणि पैशाचा अपव्यय होय तोच प्रकार अग्निबाणांचाही आहे. मात्र दुसऱ्या बाजूने कॅथिड्रीलच्या बाबतीत आपण म्हणू शकतो की कॅथिड्रिल हे मानवी उदात्त आशा-आकांक्षांचे प्रतीक आहे; नि तीच गोष्ट अपोलोसारख्या अग्निबाणांच्याही बाबतीत खरी आहे. अवकाशात आपण सोडले ते अग्निबाण म्हणजेही मानवी महत्त्वाकांक्षेचेच चित्र होते.

सतराव्या शतकातील आणि आजच्या दोन्ही बौद्धिक वातावरणाची तुलना जेव्हा आज आपण करतो तेव्हा एक गोष्ट आपण पक्की ध्यानात ठेवावयास हवी. आणि ती ही की तेव्हाच्या आणि आत्ताच्याही काळात नैराश्याचे जे सुस्कारे कानावर पडतात, त्या सुस्काऱ्यात वरवर वाटते तितके तथ्य नसते. एका शब्दात, सुस्कारे सोडणारांनी धारण केलेला तो एक एक मुखवटा असतो किंवा त्यांचा तो खोटा आविर्भाव असतो. सतराव्या शतकातील तथाकथित याकोबिन विमनस्कतेमध्ये खूप मोठ्या प्रमाणात नाटकी रंग होता आणि तेच आजही खरे आहे. तेव्हा काय आणि आता काय तो केवळ उसना आव म्हणावा लागतो. लेखकाचा मुळी दावाच आहे की, संतुप्टता म्हणजे पोकळपणा. आयुष्यात जे कोणी संतुष्ट असतात ते केवळ तेवढ्याच कारणामुळे पोकळ, वरवरचे आयुष्य जगत असतात. तेव्हा संतुष्टपणाला झोडून काढणे म्हणजे आयुष्य गंभीरपणे घेणे होय. आता अशा परिस्थितीत जे आयुष्यावर खूप आहेत त्यांना दोष दिल्यावाचून विद्वानांचे भागूच शकत नाही. आता गंमत अशी की सामान्य मनुष्य स्वत:वर खूप राहून दिवस कंठीत असतो. बॉस्वेलने लिहिलेले जॉन्सनचे चरित्र बहुतेक लोकांनी वाचले आहे. त्यातील सर्वांना आवडलेले पात्र म्हणजे मि. ऑलिव्हर एडवर्डस्. हा जॉन्सनबरोबर कॉलेजात शिकत होता नि म्हणून त्याचा जुना मित्र. हा ऑलिव्हर एडवर्डस् म्हणजे सामान्य मनुष्याचा प्रतिनिधी. तर ऑलिव्हर एडवडस् आपणाला

सांगतो की आयुष्यात तत्त्वचिंतक होण्याचा खूप प्रयत्न आपण केला परंतु यश कसे ते आले नाही. कारण प्रत्येक खेपेस माझा आनंदी स्वभाव उफाळून येत असे नि त्यामुळे लांब तोंड करून विचारात गढून गेल्याचे नाटक मला करता येत नसे; आणि तत्त्वचिंतक बनण्याचे काम फसत होते.

सतराव्या शतकामध्ये विचारांची एक नवी धाटणी जन्माला आली.; आणि या नव्या धाटणीमुळे समाजामध्ये नवचैतन्य संचारले. या नवचैतन्याचा संबंध अर्थात विज्ञानाच्या उदयाशी (बर्थ ऑफ सायन्स–सायन्स मधला एस कॅपिटल अथवा मोठा) आहे. येथे ज्या विचारसरणीचा उल्लेख 'नवे तत्त्वज्ञान' (न्यू फिलॉसॉफी) या शब्दाने केला आहे आणि सतराव्या शतकाच्या प्रारंभापासून ज्या नव्या तत्त्वज्ञानाचा गवगवा होत होता, ते नवे तत्त्वज्ञान म्हणजे भौतिकशास्त्राचा उदय होय. परंतु हे 'नवे तत्त्वज्ञान' किंवा नवी विचारसरणी म्हणजे फक्त भौतिक विज्ञानच तेवढे नाही. नवे तत्त्वज्ञान म्हणजे भौतिक विज्ञान एवढा मर्यादित अर्थ जर आपण घेतला तर बिलकूल चूक ठरेल. विज्ञानाची प्रतिष्ठापना किंवा विज्ञानाचे पुनरुज्जीवन म्हणा म्हणजेच नवे तत्त्वज्ञान असे नव्हे. हे पुन्हा पुन्हा सांगावे लागत आहे कारण खरा मुद्दा तोच आहे. नवा विचार म्हणजे केवळ शास्त्रीय विचार, नवा विचार म्हणजे शास्त्राला चालना देणारे असे काही, एक अशी चळवळ की ज्या चळवळीच्या अनुषंगाने किंवा अगदी बरोबर म्हणजे ज्या चळवळीसाठी शास्त्रीय दृष्टीकोनातून केली जाणारी चौकशी ही आवश्यकच नव्हे तर स्वाभाविक भाग ठरत होती.

आता प्रश्न असा की या वैचारिक पुनरुज्जीवनातील तात्त्विक घटक कोणते होते? (तात्त्विक हा शब्द येथे तांत्रिक अर्थाने नव्हे तर घरगुती अर्थाने मी वापरीत आहे. हे कशा मुळे घडते, ते कशामुळे घडते, याचे मूळ कशात या प्रकारची चौकशी यात मोडेल.)

सतरावे शतक हे काल्पनिक रामराज्यांच्या चित्रणाचे, युटोपियांचे युग होते. तसे पाहिल्यास थॉमस मोर (१४७८-१५३५ युटोपिया रंगविणारा पहिला तत्त्ववेत्ता. युटोपिया म्हणजे निर्दोष आणि सर्वांगपरिपूर्ण अशा राज्याचे काल्पनिक चित्र.) याने युटोपियाचे चित्र रेखाटल्यास १०० वर वर्षे होऊन गेली होती. अलिकडच्या काळातील काल्पनिक रामराज्ये आणि काल्पनिक राक्षसराज्येसुद्धा (युटोपिया अँड अँटियुटोपिया) आणि पूर्वीच्या काळातील काल्पनिक रामराज्ये (युटोपिया) यात फरक आहे. अलिकडच्या काळातील रामराज्ये ही भावी रामराज्ये, भविष्यकाळात पैदा होणारी रामराज्ये असत. ती समकालीन रामराज्ये नसतात. अलिकडची रामराज्यचित्रे भावी काळात घडल्याचे दाखवण्यात येते याचे एक कारण असे की, पूर्वीच्या तुलनेत आज पृथ्वीच्या भूपृष्ठाचे आपले ज्ञान अधिक आहे. त्यामुळे लोकवस्ती कुठे आहे किंवा भूपृष्ठ ओसाड कुठला आहे हे आपल्याला चांगले माहीत असल्याने विशिष्ट प्रदेश डोळ्यासमोर ठेवून रामराज्यचित्र रंगविता येत नाही. दुसरे कारण हे की कालांतराने आपल्या योजना

पूर्णत्त्वास जाऊ शकतील असे आपण गृहीत धरलेले असल्याने आपणाला मध्ये अवधी हवा असतो. या दोन कारणांनी रामराज्यचित्र ही आपण भावी काळासंबंधी रंगवितो. जुनी रामराज्यचित्रे, उदा., मोरचा युटोपिया किंवा बेकनचे 'न्यू अॅटलांटिस', किंवा जे.व्ही. आन्द्रीएचे 'द रिपब्लिक ऑफ ख्रिस्तीआनोपोलीस' किंवा टोमासो काम्पानेलाचा 'द सिटी ऑफ द सन (१६२३) हा युटोपिया' हे सगळे युटोपिया समकालीन समाजाबद्दल बोलतात. त्यांच्या वर्णनात ही रामराज्ये कोणा साहसी समुद्र प्रवाशांना अपघाताने सापडलेली दाखवली जातात. किंवा एखाद्या संशोधकाला सापडलेली दाखविली जातात. आता तेव्हाच्या आणि आताच्या काल्पनिक रामराज्यचित्रामध्ये हा जो फरक आहे त्याचा अर्थ काय? एक कारण अर्थात तोवर न आढळलेले राज्य सापडण्याची त्या काळातील शक्यता हे होय. आज जे प्रतीकात्मक महत्त्व शास्त्रीय क्षेत्रातील शोधांना आपण देतो तेच महत्त्व त्याकाळी भौगोलिक शोधाला देत होतो. न शोधलेला भूप्रदेश तेव्हा बराच शिल्लक होता. त्यामुळे एखादे रामराज्य अवचित सापडण्याची शक्यता मानवी मनाला तेव्हा वाटत होती. खरे तर बाह्य अवकाश हे आज आपल्या क्रीडांगणाच्यासारखे वनत चालल्याने कदाचित एखादे तयार किंवा आधीपासून अस्तित्त्वात असलेले रामराज्य अवकाश उड्डाणात हाती येईल अशी कल्पना आपण रंगवू शकतो. अर्थात हे काही खऱ्या अर्थाने महत्त्वाचे कारण नाही. जुनी रामराज्ये भावी काळाशी संबंधित नव्हती याचे मुख्य कारण म्हणजे असा भावी काळ, या आपल्या पृथ्वीशी संबंधित भावी काळ शक्य आहे असेच कोणालाही तेव्हा वाटत नव्हते. शिवाय पृथ्वीवर आपण खूप काळ घालविला तरी आपल्यामध्ये मोठी सुधारणा घडून येईल किंवा आपल्या क्षमतांमध्ये मोठी वाढ होईल हेही कोणी गृहीत धरू शकत नव्हता. त्याच्या उलट ज्यू किंवा जुन्या करारावर विश्वास असल्याने आणि जुन्या करारात भाकित वर्तविल्यामुळे. काळ आणि काळाबरोबर इतिहास संपुष्टात येऊन परमेश्वराचे राज्य येणार असल्याने काळ संपुष्टात येत होता व आम्ही स्वत: खाली खाली घसरत चाललो होतो. अर्थात ही भूमिका घेतल्यावर भविष्यावर नजर ठेवण्याचा प्रश्नच उदभवू शकत नाही.

साधारणपणे सतरावे शतक संपुष्टात येईपर्यंत या विचारसरणीचा जोर होता. जॉन डॉन (१५७२-१६३१; अतिभौतिकवादी विषयांवर कविता करणारा कवी) म्हणतो की "जगाचा अंत होता होतानाच्या युगात मी जन्माला आलो होतो." तर सर थॉमस ब्राऊन (१६०५-८२) इंग्लिश फिजिशियन आणि 'रिलिजिओ मेडिसी' या ग्रंथाचा लेखक स्वत:बद्दल बोलताना म्हणतो की " काळाचा अस्त होण्याच्या सुमारास जन्माला आलेल्या पिढीपैकी मी एक आहे." जगाचा शेवट जवळ आला आहे या समजुतीबद्दल सर्वसामान्य आणि असामान्यही जनतेला किती ठाम विश्वास त्या काळात वाटत होता याचा पुरावा त्या काळातील सर्वपरिचित वाङ्मयीन म्हणी वगैरेंमध्ये सापडणशर नाही; परंतु त्याच कालखंडातील कंटाळवाण्या लठ्ठ लठ्ठ गंभीर स्वरूपाच्या ग्रंथामध्ये तो नक्कीच सापडेल. असे ग्रंथांवर ग्रंथ तेव्हा लिहिले जात होते. उदा. जॉर्ज हेकविल या

गृहस्थाचा 'ॲन ॲपोलॉजी ऑफ द पॉवर अँड प्रॉव्हिडन्स ऑफ गॉड' (ऑक्सफर्ड १६२७) याच ग्रंथाकडे पाहा. या ग्रंथात ग्रंथ कर्ता सुवर्णयुगाची दंतकथा खोडून काढतो. मानवाचा उत्तरोउत्तर ऱ्हास होत आला आहे ही काहीजणांनी मांडलेली कल्पनाही तो बाद ठरवितो. मात्र इतके करूनसुद्धा जगबुडी लवकरच येणार याबद्दल त्याच्या मनात शंका न्हवती. आशा बाळगण्यासारखे काहीही ज्यांच्या जीवनात नव्हते त्यांना जगबुडी लवकर येणार ही कथा उत्साहवर्धक आणि मनाचे सांत्वन करणारी वाटत होती यात काहीच शंका नाही. इतिहासाचा अंत झाल्यावर पुढे नेमके काय होणार याबद्दल लोकांमध्ये मतभेद होते – काहींच्या मताने नवे जेरुसलेम याच भूतलावर स्थापन होणार होते. तर काहींच्या मताने सगळे पुण्यवान आत्मे स्वर्गात पदार्पण करणार आणि त्यांच्या अंतकरणात नवे जेरुसलेम (पुण्यस्थळ) उदय पावणार होते. काही का असेना इतिहासाचा अंत लवकरच घडून येणार याबद्दल मात्र सर्वांचे एकमत होते. सोळाव्या शतकाच्या शेवटी भौतिक जग कदाचित शाश्वत स्वरूपाचेही असू शकेल या प्रकारचा विचार डोके वर काढीत होता आणि ही कल्पना अनेकांच्या चर्चेत येत होती. चर्चा करणाऱ्यांना ती अस्वस्थ करीत होती. मुख्य म्हणजे ही कल्पना कोणालाही मान्य नव्हती. हळूहळू मात्र सर्वांचे समाधान करणारे स्पष्टीकरण सापडून ही कल्पना मोडीत निघाली. लवकरच जग बुडणार याबद्दल सर्वांना खात्री वाटली.

सतराव्या शतकात या विचारसरणीत बदल झाल्याचे आढळते. मनुष्यप्राणी स्वत:च्या अंगभूत हुपारीवर आणि परिश्रमावर महान गोष्टी साध्य करू शकेल, ही जी नवी भावना लोकांमध्ये एकूण प्रसृत झाली होती, तिच्याशी इतिहासाचा म्हणजे अर्थात जगाचा अंत होणार नाही ही कल्पना अजिबात न जमणारी होती. त्यामुळे ही कल्पना हळूहळू अस्तमान झाली. लोकांच्या जाणीवेतून ती अदृश्य झाली. अर्थात कोणी वाद घालून तिचा पाडाव केला नव्हता. ती फक्त चलनातून नाहीशी झाली एवढेच ! मानवाचा हळूहळू आणि पायरीपायरीने ऱ्हास होत आहे ही कल्पना बुद्धिपुरस्सर व तिच्याविरूद्ध वाद करून खोडण्यात आली होती ही गोष्ट खरी. उदा. इंग्लंडमध्ये जॉर्ज हेकविल याने आणि त्याच्याही आधी जँ बोडीन आणि लरॉय याने लरॉयच्या ग्रंथाचे नाव 'ऑफ द इंटरचेंजेबल कोर्स ऑर व्हरायटी ऑफ थिंग्ज'. १५९४ मध्ये रॉबर्ट ॲश्ले या गृहस्थाने त्याचे इंग्रजीत भाषांतर केले होते. लुई लरॉयने आपला ग्रंथ 'ज्या कोणाला वाटते की भावी काळावर आपला हक्क आहे' त्यांना उद्देशून लिहिला होता. ग्रंथ दखल घेण्याजोगा होता. हेकविलच्या विचारसरणीवर जँ बॉडीनचा प्रभाव होता. येथे मानवाच्या ऱ्हासाच्या कल्पनेबद्दल एक गोष्ट सांगावयास हवी. उत्तरोत्तर मानवाचा ऱ्हास होत चालला आहे ही कल्पना पुढे खोडून काढली गेली. मात्र याच कल्पनेची उलट बाजू की उत्तरोत्तर मानवाची प्रगती घडून येत आहे ही कल्पना मान्य केली गेली होती असे नव्हे. प्रगतीची कल्पना किंवा प्रगती एका सरळ रेषेत होते वा होणार आहे ही कल्पना स्वीकारली गेली नव्हती. मानवी संस्कृती (कल्चर्स अँड सिव्हिलायझेशन्स) कधी वर जातात तर कधी खाली घसरतात; त्यांचा कधी ऱ्हास होतो

तर कधी त्यांचे पुनरुज्जीवनही घडते आणि हे एक चक्र आहे ही गोष्ट ओळखण्यावर हे सर्व अवलंबून होते. हेकविलच्या शब्दात 'चक्रकार जातीची प्रगती' होय.

मात्र सतराव्या शतकाच्या एकूण बौद्धिक धाटणीत असे दोन घटक आढळतात की त्यांच्या अस्तित्त्वामुळे असे म्हणावे लागते की, प्रगतीची कल्पना या शतकाला जरी अगदी सुस्पष्टपणे समजली नव्हती तरी ती अजिबातच भावली नाही असे नाही. अस्पष्ट स्वरूपात ही कल्पना या शतकाला प्रतीत झाली होती यात काहीच शंका नाही. नव्या नव्या शोधांची गती वाढली होती; तसेच इतिहाससुद्धा फार झपाट्याने बदलत होता हा पहिला घटक. कांपानेल्ला त्यांच्या 'द सिटी ऑफ द सन' या ग्रंथात तुम्हाआम्हाला सांगतो की, "गेल्या चार हजार वर्षात जेवढा इतिहास घडला नसेल तेवढा चालू शंभर वर्षात घडला आहे". अर्थात कांपानेल्ला येथे पीटर रॅमस यांच्या उद्गाराची उजळणी करतो. कारण रॅमस एके ठिकाणी म्हणतो की, "गेल्या शंभर वर्षाच्या काळात विद्वानांचे आणि भव्य कामांचे जेवढे पीक आपण पाहिले तेवढे गेल्या चौदाशे वर्षात काही कोणी पाहिले नसेल." सतराव्या शतकाच्या उत्तरार्धापर्यंत ही नवी संकल्पना लोकांच्या मनात बऱ्यापैकी रुजली होती असे म्हणता येते.

'कन्सेप्ट ऑफ फ्युच्युरिटी' किंवा भावी काळाबद्दल आपलेपणा जो या कालखंडात वाटत होता त्याचा एक घटक आताच आपण पाहिला. या आधी माणसे पुढे येणाऱ्या दिवसांचे चित्रच रंगवत नव्हती . एक तर ती मागे होऊन गेलेल्या तथाकथित सुवर्णयुगात मनाने गुंतलेली असत किंवा स्वर्गाच्या कल्पनेत राहून वर आकाशाकडे तरी पाहात बसत. एका शब्दात, त्यांना फक्त मागे पाहायचे किंवा वर आकाशाकडे पाहायचे एवढयाच दोन गोष्टी ज्ञात होत्या. परंतु आता त्यांना भावी उन्नतीच्या कल्पनेची ओळख झाली होती. काल आणि आजबरोबरच आपण उदात्त उद्याचा विचार करू शकतो, योजना आखू शकतो, कारण मानवीबुद्धीला आणि संशोधनक्षमतेला मर्यादा नाहीत याचा साक्षात्कार झाला होता. 'प्लू अल्ट्रा'-पुढे आणखी' ही संकल्पना त्यांनी आत्मसात केली होती. आजवर जे शोधून काढले गेले आहे, ते पुढे जे शोधून काढावयाचे आहे त्याचा निव्वळ एक छोटा अंश आहे, म्हणजेच पलिकडे आणखी बरेच काही असणार आहे हे त्यांना आता पटले होते. 'नोव्हॅम ऑरगॅनम'–न्यू ऑरगन ऑफ़ नॉलेज–ज्ञानसंपादनाचे नवे इंद्रिय हे आपले महान पुस्तक बेकनने १६२० ते १६३० या दशकाच्या अगदी प्रारंभी प्रसिद्ध केले होते. बेकन म्हणत होता की "माणसे सहजासहजी निराश बनतात आणि हे अशक्य, ते अशक्य असे बोलतात. ही वृत्ती ज्ञानसंपादनाच्या आड येते. बेकन पुढे म्हणतो की, मानवी बौद्धिक प्रवृत्ती ही कायम अस्वस्थचित्त आहे. ती कधीही एके जागी स्वस्थ बसू शकत नाही, ती सतत पुढे पुढे जाण्याचा प्रयत्न करते. मात्र त्यातून काही निष्पन्न होत नाही. म्हणजेच ती व्यर्थ ठरते ... ती व्यर्थ ठरते याचे कारण हे की, "सृष्टीचे स्वरूप दुर्बोध आहे, मानवी जीवन तुटपुंजे आहे, पंचज्ञानेंद्रिये बेभरवशाची आहेत. मनुष्याची मते कमकुवत असतात प्रयोग करताना अडचणी येतात इ. इ" पुढे तो म्हणतो की हे सर्व विचारात घेऊन मी आता एका नव्या आशेबद्दल



अनुक्रमणिका

बोलणार आहे. ज्या परिच्छेदामध्ये ही नवी आशा तो व्यक्त करतो तो परिच्छेद ही नव्या युगाची जणू नांदीच वाटते. बेकन ज्या आशेबद्दल बोलतो ती आशा ज्ञानसाधनेच्या पुनर्जन्माच्या संबंधातील आहे. तो म्हणतो की मनुष्ये जर का ज्ञानसाधनेच्या मागे जातील आणि मन एकाग्र करून आपल्या सर्व शक्ती एका विषयाकडे लावतील तर त्यांना "जी अडचण पार करता येणार नाही अशी अडचण वाटेत भेटणार नाही." हेन्री पॉवर लिहितो की, "तंत्रविद्या कुठे जाईल आणि कुठे जाणार नाही हे निश्चितपणे कधीच सांगता येत नाही". त्यामुळे तंत्रविद्येच्या कारभाराबद्दल 'पुढे आणखी' या प्रकारची पाटी कोण बरे लावू शकतो? मानवी क्षमता आणि मानवाचे भवितव्य याबद्दलचा जो नवा विश्वास उत्पन्न झाला होता त्या विश्वासाबद्दल सर्वत्र एक उत्साहाची लाट उमटली होती. आदर पसरला होता. जयजयकाराची भावना तयार झाली होती. थॉमस हॉब्स (१५८८-१६७९. इंग्रजी तत्त्ववेत्ता) तर गौरव हा शब्द जणू एखादी तांत्रिक संकल्पना असावी अशा प्रकारे वापरतो. 'लेवियाथन' या ग्रंथात तो लिहितो की, 'मनुष्यप्राण्याच्या ठायी आढळणाऱ्या वेगवेगळ्या क्षमता आणि त्याची कुवत या दोन गोष्टींची कल्पना करताना मनाला जो आनंद होतो तोच खरा गौरव होय. कारण तेव्हा मन उन्नत बनलेले असते'. तर दुसऱ्या एका परिच्छेदात तो 'अव्याहत आणि न थकता जी भर ज्ञानामध्ये घातली जात आहे' त्याच्या आनंदाबद्दल बोलतो.

या सगळ्या नव्या कल्पना तत्कालिन समाजाला किती उत्तेजक वाटत असल्या पाहिजेत ह्याचा अंदाज करण्यासाठी फार मोठ्या कल्पनाशक्तीची गरज नाही. या नव्या कल्पनामुळे तेव्हाचा समाज भारून गेला असला पाहिजे हे उघडच आहे. पुढे अठरावे शतक उजाडले आणि त्या शतकात नव्या कल्पनांची धुंदी उतरून प्रत्येकजण बऱ्यापैकी शुद्धीवर आला. प्रगतीची कल्पना एव्हाना गृहीत धरली गेली होती. मात्र एका विशिष्ट अर्थाने ही कल्पना काहीशी हाताबाहेर गेल्याचेही जाणवते. कारण प्रगतीच्या कल्पनेमध्ये एकाच वेळी दोन गोष्टी गृहीत धरल्या जात होत्या. एकीकडे असे मानले जात होते की मनुष्याने शोधून काढलेली यंत्रे वगैरे सतत सुधारत जाणार होती. आणि त्याच वेळी मनुष्यप्राणीसुद्धा सुधारत जाणार होता. (अर्थात हा युक्तीवाद जरी करण्यात येत होता तरी तो तेवढासा स्पष्ट वा भक्कम वाटत नव्हता.) त्यामुळे सतराव्या शतकातील याच संदर्भातील भाष्ये आणि विल्यम गॉडविनसारखी मंडळी या दोघांची तुलना करून पाहण्यासारखी आहे. अठरावे शतक संपता संपता गॉडविनने जे लिहून ठेवले आहे त्यात तो म्हणतो की, 'मानवी ज्ञानाच्या बाबतीत आम्ही वाटेल तितकी प्रगती करू शकतो. या प्रगतीला मुळी मर्यादाच नाहीत. त्यावरून असा निष्कर्ष आपल्याला काढता येईल की माणसाने शोधून काढलेली यंत्रे वगैरे सतत सुधारता येतील (१७९३)'.

मानवी चौकसबुद्धीचा प्रवास आपण मध्येच थांबवू शकतो काय? नाही. फक्त प्रचंड जुलूम करता आला तर असा प्रवास थांबविता येईल. मानवी बुद्धीचे वैशिष्ट्यच हे आहे की ती न थांबता पुढे पुढे जाऊ पाहाते. पुढे जात राहाणे हे बुद्धीचे महत्त्वाचे



अनुक्रमणिका

वैशिष्ट्य आहे. त्यामुळे प्रत्येक क्षणी एखाद्या सत्तेने तिला विरोध केला तरच ही प्रवृत्ती अडविता येईल, अन्यथा नाही. आणि हे साध्य करण्यासाठी जुलमी आणि रक्तरंजित उपाय योजावे लागतील; आणि या प्रकरणात जे काही घडेल ते निश्चतच मनाला उद्वेग आणणारे दुर्दैवी असेच फक्त असू शकते.

सतरावे शतक आणि अठरावे शतक या दोहोंच्या विचारात किती तफावत आहे ते पाहा. सतरावे शतक म्हणते की, मनुष्यप्राण्यातील शोधकबुद्धी कार्यान्वित करण्यासाठी काहीतरी प्रभावी प्रेरकशक्ती मदतीला धरावी लागेल. मनुष्यप्राण्यातील शोधक बुद्धीच्या संदर्भातील सतराव्या शतकाचे गृहीतकृत्य हे आहे. तर अठराव्या शतकाच्या शेवटी याच संदर्भातले गृहीतकृत्य बरोबर याच्या उलट आहे. अठरावे शतक म्हणते, की ज्या जोषाने मनुष्यप्राण्याची शोधकबुद्धी काम करते तितकाच जोष उलट बाजूने लावला तरच त्या शोधकबुद्धीला खीळ घालता येईल. किंवा त्या शोधकबुद्धीचा वेग कमी करता येईल.

असो पुढील चर्चा करण्यापूर्वी शोधकबुद्धीबद्दलचे हेच समीकरण आजही मान्य आहे काय याची चौकशी करावयास हवी. हेच समीकरण म्हणजे ज्ञानाची आणि तंत्रविद्येची वाढ होण्यावर कोणत्याही प्रकारच्या अंगभूत मर्यादा नसतात हे होय. प्राण्याची शारीरीक वाढ काही वर्षांनी थांबते. किंवा प्राणी समुदायाचीही वाढ काही ठराविक कालावधीनंतर थांबते. किंवा शहराची वाढ देखील काही कालावधीनंतर थांबते. तेव्हा नैसर्गिक वा सामान्य वाढीच्या प्रक्रियांवर मर्यादा असतात; एवढेच नव्हेतर त्या स्वयंमर्यादा असतात ही कल्पना आता अगदी सर्वसामान्य झाली आहे. काही कालावधीनंतर शारीरीक वाढीचा वेग मंदावतो व शेवटी तो पूर्णपणे थांबतो; आणि याचे कारण वाढीची ती खुद्द प्रक्रियाच असते. हा विचार आज सर्वांना माहीत आहे. या ना त्या कारणाने, परंतु काही ना काही कारणाने कोठलाही सजीव अखंड वाढत जाऊ शकत नाही. लोकसंख्येचे उदाहरण घ्या. प्रजेची संख्या आणि घनता एका विशिष्ट पातळीला पोहोचली की त्या संख्येचा आणि घनतेचा परिणाम होऊन अधिक वाढ होण्यावर बंधन येते. आता हाच नियम ज्ञानसंपादनाच्या क्रियेला लावता येईल काय? म्हणजे असे की खूप ज्ञान जमा झाले, अगदी हाताळता येणार नाही इतके ते प्रचंड झाले, किंवा गुंतागुंतीचे झाले तर मेंदूला पेलत नाही असे ते होईल काय? संपादित ज्ञानाचा साठा अवाढव्य बनला तर काय होईल? आणि ज्ञान खूपच गुंतागुंतीचे बनले तर काय होईल? म्हणजे मेंदूच्या आकलनाच्या ते पलिकडे जाईल काय या दोन्ही प्रश्नांचे उत्तर नकारार्थी आहे. नोंदवून ठेवल्या जाणाऱ्या ज्ञानात भरमसाठ वाढ होणे आणि त्यामुळे जमा झालेली माहिती एकत्र जोडून त्यातून अर्थनिष्पत्ती (कम्युनिकेशन्स) होण्यातच अडचण येणे या दोन समस्यांवर तंत्रवैज्ञानिक उपाय शोधून काढता येणे शक्य आहे. कारण ह्या दोन्ही अडचणी तांत्रिक स्वरूपाच्या आहेत. उपाय काढता येणे शक्य आहे एवढेच नाही तर तसे उपाय शोधले गेलेही आहेत. आता दुसऱ्या प्रश्नाबद्दल. हा प्रश्न असा की ज्ञान साठविण्याची मेंदूची जी काही क्षमता आहे त्याच्यापेक्षाही ज्ञानाचा साठा वाढला तर

काय? खरे म्हणाल तर ही गोष्ट आधीच घडून आली आहे. रेडिओचा संच किंवा मोटारगाडीच्या बनावटीत शेकडो प्रकारचे छोटेमोठे तंत्रज्ञान उपयोगात आणले जाते. आपणापैकी कोणाला हे तंत्रज्ञान खऱ्या अर्थाने समजले असे म्हणता येईल? वरवरच्या चारदोन गोष्टी तेवढ्या आपण जाणू शकतो. बाकी आपल्या आकलनाच्या पलिकडेच राहातात. तेव्हा एका सुट्या मेंदूला आज जमा झाले आहे ते सगळेच्या सगळे ज्ञान हाताळता येणार नाही यात काहीच शंका नाही. परंतु मानवी कर्तृत्वशक्ती एकत्रित करता येतात ही गोष्ट येथे आपण विसरता कामा नये. होऊन गेलेल्या आणि हयात असलेल्या बुद्धिमंतांच्या सहकार्याने आपण आपले काम चालवितो. एखादे सर्वसंहारक अस्त्र आम्ही शोधून काढणे आणि त्या अस्त्रामुळे स्वत:च्या हाताने स्वत:चा नाश करणे अगदी सहज शक्य आहे. किंवा नवा विषाणू तयार करून स्वत:चे मरण ओढवून घेणे हेही आपल्या बाबतीत शक्य आहे. परंतु असे घडलेच पाहिजे असे नाही. ज्ञानाच्या आणि आकलनाच्या कक्षा बाजवीपेक्षा जास्त वाढताच स्वाभाविकपणे आमचा विनाश घडलाच पाहिजे असे काहीही येथे अस्तित्वात नाही. अशा प्रकारचा कार्यकारणभावात्मक संबंध वरील दोन गोष्टीत नाही. भौतिक ज्ञानाच्या क्षेत्राशी संबंधीत म्हणजेच शास्त्रीय संशोधनाशी संबंधित प्रश्नांचे उत्तर देण्याच्या आमच्या क्षमतेवर कसल्याही प्रकारच्या अंगभूत मर्यादा अस्तित्वात आहेत असे मला वाटत नाही. भौतिक क्षेत्रातील कोठल्याही प्रश्नांचे उत्तर आपण शोधू शकतो. त्या शोधण्यावर नैसर्गिक बंधन नाही. अशा प्रश्नांची उत्तरे शोधण्याची क्षमता आमच्या ठिकाणी आहे.

प्रचलित एकूण घोर निराशेवर आणि नाउमेदीवर सतराव्या शतकाचा उतारा वर सांगितला तो होता. म्हणजे उत्तरोत्तर सगळ्या गोष्टींचा ऱ्हास होत आहे, जगाची अधोगती सुरू आहे ह्या कल्पनेचे निराकरण. भावी काळ या शब्दांना भरीव आणि होकारात्मक अर्थ आहे अशा विश्वासाचा प्रारंभ. धर्माशी संबंधित नसणाऱ्या क्षेत्रांचे ज्ञानसुद्धा गौरवास्पद असू शकते, त्याही ज्ञानाला सामाजिक प्रतिष्ठा आहे या विचाराचे ठाम प्रतिपादन, मानवी कर्तृत्वशक्तींना मर्यादा नसाव्यात, या कर्तृत्वशक्ती कितीही प्रगती करू शकतील या कल्पनेचा प्रसार. मानवी कर्तृत्वशक्तीच्या अस्तित्वाबद्दल गौरवभावना इ. इ. वरील विवेचन करताना त्या कालखंडातील प्रयोग करून ज्ञान संपादन करण्याच्या प्रायोगिक पद्धतीच्या बाजूने जी बौद्धिक चळवळ झाली तिचा उल्लेख मी केला नाही याचे अनेकांना आश्चर्य वाटेल परंतु ते मी केले नाही याच्याबद्दल माझा बचाव असा की, 'एक्सपिरीमेंट-प्रयोग' या शब्दाचा त्या काळातला अर्थ आणि आजचा अर्थ यात कमालीचा फरक आहे. त्यामुळे मी जर 'प्रयोग हा शब्द वापरला असता तर आपण सर्वांनी त्या शब्दामध्ये आज 'प्रयोग' शब्दाचा जो प्रचलित अर्थ आहे तो अर्थ गृहीत धरला असता. तेव्हा प्रायोगिक पद्धतीच्या उगमाबद्दल जो पारंपरिक गैरसमज आहे तो टाळण्यासाठी मी हा शब्दप्रयोग टाळला होता. तो गैरसमज काय आहे हे आता पाहू. बेकनचे वर्णन करताना शास्त्रीय क्षेत्रात बेकनने प्रायोगिक पद्धतीचा पुरस्कार केला असे म्हणण्याचा प्रघात आहे. बेकनचे हे

वर्णन अगदी योग्य आहे. कारण बेकनचे म्हणणे असे होते की भौतिक ज्ञान संपादन करताना शब्दप्रामाण्याला महत्त्व देण्यात येऊ नये. मग ते शब्द उच्चारणाऱ्या व्यक्तीची सत्ता कितीही मोठी असो. ती व्यक्ती कितीही महान, पुज्य, थोर, प्रतिष्ठीत वगैरे असो. परंतु एखादी गोष्ट अशी अशी आहे असे ती व्यक्ती सांगते एवढ्या आधारावर त्या गोष्टीवर विश्वास ठेवता कामा नये. किंवा अनुमान काढताना कोणी सूक्ष्मातील सूक्ष्म तार्किक युक्तिवाद केला तरी त्याचा भरवसा धरता कामा नये. म्हणजे भौतिक ज्ञानाचे खरेपण जोखताना तार्किक कसरतीना महत्त्व नाही. मग महत्त्व कशाला आहे? बेकन म्हणतो की 'पंचज्ञानेंद्रियांच्या साक्षीला महत्त्व आहे'. (बेकनचा असा विश्वास होता की) ज्ञानेंद्रियांच्या साक्षीमध्ये भ्रामकता शिरू शकते. आभासही शिरू शकतो. परंतु ही साक्ष जर काळजीपूर्वक हाताळली, ज्ञानेंद्रियांनी सादर केलेला पुरावा व्यवस्थित पडताळून पाहाण्याची तसदी घेतली तर त्याच्यातून भ्रामकता व आभास काढून टाकता येईल. बेकन 'एक्सपिरीमेंट' हा शब्द ज्ञानेंद्रियांमुळे मिळालेला अनुभव जास्तीत जास्त व्यापक बनविणे या अर्थाने वापरतो. येथे आपण जो अनुभव घेणार असू त्याला महत्त्व होते. आधुनिक काळात प्रयोगशाळेत केले जाणारे प्रयोग त्यात अभिप्रेत नव्हते. अनुभवप्रामाण्यवाद या शब्दात बेकनच्या विचारसरणीचे सार आहे.

तत्त्वज्ञानाच्या परंपरेत ज्या परंपरेला तात्त्विक एंपिरिसिझम अथवा अनुभव-प्रामाण्यवाद म्हटले जाते. त्याचा एक उगम म्हणजे बेकनचे साहित्य होय. ब्रिटिश तत्त्ववेत्ता जॉन लॉक (१६३२-१७०४) हा या परंपरेचा सर्वात मोठा प्रवक्ता. शास्त्र किंवा विज्ञान (सतराव्या अठराव्या शतकात हे दोन्ही शब्द समानार्थी होते) याने अनुभवप्रामाण्यवादी विचारसरणीला सर्वात मोठी देणगी दिली ती म्हणजे आपण घेतो तो अनुभव प्रयत्नपूर्वक ताणता येतो. (स्ट्रेच करता येतो, त्यात मुद्दाम भर घालता येते, तो परत परत घेता येतो.) आणि तसे करून निसर्गाबद्दलची जी माहिती सामान्यपणे आपणास मिळू शकली नसती ती निसर्गाला देण्यास भाग पाडू शकतो ही कल्पना होय. शास्त्राने हे सर्वात आधी शिकवले की, एखादा अनुभव आपण मुद्दाम तयार करू शकतो, त्याची व्याप्ती वाढवू शकतो, तो परत परत निर्माण करू शकतो आणि तसे करून नैसर्गिक घटनांबद्दल पूर्वी अज्ञात असलेली माहिती मिळवू शकतो. एकोणिसाव्या शतकापर्यंत 'एक्सपिरिमेंट' हा शब्द ज्ञान मिळवण्याकरता अनुभव व्यापक करणे वा मुद्दाम तयार करणे अशा कल्पनेला उद्देशून वापरला जात असे. दुसऱ्या शब्दात, नैसर्गिक घटना निसर्गत: घडतील तशा पाहून त्यांच्या निरीक्षणातून निष्कर्ष काढण्याऐवजी निसर्गालाच आमच्या कल्पनेप्रमाणे वागायला लावून त्या कृत्रिम प्रकारे मिळविलेल्या निरीक्षणातून निष्कर्ष काढणे या प्रकारच्या विचारसरणीला हा शब्द लावला जात असे. आज 'एक्सपिरिमेंट' हा शब्द अगदी वेगळ्या अर्थाने वापरण्यात येतो. एक्सपिरिमेंट 'मध्ये अनुभव व्यापक बनविणे एवढीच एक गोष्ट आज मोडत नाही. तर अनुभवसंबंधित वस्तुस्थितीबद्दल जी अनेक तात्पुरती स्पष्टीकरणे (हायपॉथेसिस) उपलब्ध असतील त्यांची पारख करणे व अशा प्रकारे आपल्या

गुन्हा करण्यात आला होता त्या दुसऱ्या एका दृष्टीने हत्यारी गुन्ह्यासाठी ज्या हत्याराने गुन्हा करण्यात आला त्या हत्याराला दोषी धरण्यासारखा हा प्रकार आहे. मूर्खपणातला मूर्खपणा. या बाबतीत मला कुणी विचारले तर मी म्हणेन की स्वतःचा व्यवहार सांभाळण्यात आम्ही एखाद्या नतद्रष्ट कामगारासारखे वागत आहोत. नतद्रष्ट कामगार स्वतःच्या भिकार कारागिरीसाठी नेहमी अवजारांना दोष देत असतो. आमची अवस्था या कामगारापेक्षा भिन्न नाही. आम्हीसुद्धा स्वतःला दोष देण्याऐवजी आमच्या अवजारांना दोष देत आहोत. तंत्रवैज्ञानिक नव्या नव्या बदलांबद्दल चिकित्सक वृत्तीने विचार व्हावा याच विचाराचा मी देखील आहे. आमची भौतिक स्थिती सुधारण्यासाठी केला जाणारा प्रत्येक प्रयत्न अगदी बारकाईने तपासण्यात यावा आणि या प्रयत्नातून आमचे नुकसान होणार नाही याची खात्री केली जावी. परंतु तज्ज्ञ दृष्टीतून एखाद्या बाबीवर करण्यात येणारी कठोरातील कठोर टीका आणि आपण जे दोष काढीत आहोत त्या दोषांवर इलाज न सुचविताच निराशेने कायम गळा काढीत राहाणे या दोन कृतींमध्ये जमीनआस्मानाचा फरक आहे. अमक्या तंत्रज्ञानाच्या वापरामुळे तमके तोटे होत आहेत याचे नुसते रडगाणे गाण्यात फायदा काय? तुम्ही त्याच्यावर इलाज सुचविला पाहिजे. दुसरा चांगला पर्याय सांगितला पाहिजे.

या झाल्या आमच्या फुटकळ विशिष्ट तक्रारी. परंतु या विशिष्ट तक्रारींच्या आणि असंतुष्टपणाच्या पाठीमागे जे एक सर्वसाधारण कारण आहे त्याच्याकडे आता वळू या. बेकनचे घोषवाक्य की 'जीवन समृद्ध करण्यासाठी, सुखी बनविण्यासाठी शास्त्राचा पाठपुरावा करा. परंतु समाजात असे कित्येक लोक असतात की समृद्धी आणि स्वास्थ्य हे त्यांना निंद्य, तिरस्करणीय वाटते. कारण त्यांच्या डोक्यात समृद्धी आणि सुखस्वास्थ म्हणजे आत्मिक अवनती हे समीकरण आहे. आमच्या दुर्दशेचे खरे कारण आणि आमची खरी अडचण वेगळीच आहे. भौतिक समृद्धी ही आमची अडचण नाही. किंवा तंत्रविज्ञान हीसुद्धा आमची अडचण नाही. वैज्ञानिक संशोधनाच्या आणि एकूणच ज्ञानसंपादनाच्या सामर्थ्याबद्दल आमच्या मनात ज्या शंका आहेत तीसुद्धा आमची खरी अडचण नाही. आमची खरी अडचण मानवी अपयशाबद्दल आपल्या मनाने जी हाय खाल्ली आहे त्याच्याशी संबंधित आहे. आमचे व्यवहार सांभाळताना आम्हाला जे अपयश आले आहे त्या अपयशाच्या भावनेशी संबंधित आहे. कारण आम्ही अशी भावना करून घेतली आहे की या जगात मनुष्य प्राण्याचा टिकाव लागणार नाही. मनुष्यप्राण्यात मुळातच काही उणीवा आहेत नि या उणीवांवर तो मात करू शकणार नाही. या भावनेने आम्ही पुरते खचून गेलो आहोत नि आमच्या दुर्दशेचे खरे कारण हे मनाने खचून जाणे आहे. अठराव्या शतकामध्ये स्वतःविषयी आम्ही केवढ्या मोठमोठ्या आशा बाळगल्या होत्या. आम्ही स्वतःमध्ये खूप खूप सुधारणा घडवून आणणार होतो, परिस्थिती पूर्णपणे बदलून टाकणार होतो, नाही का? आमच्यातल्या सर्वसाधारण कर्तृत्त्वशक्ती तर सुधारणार होतीच परंतु कोणत्या तरी कारणाने—कोणते कारण ते स्पष्ट शब्दात सांगण्यात आले नव्हते—आमची नैतिक उंचीसुद्धा आमच्या

भौतिक समृद्धी बरोबरच वाढणार आहे असे आम्ही समजून चाललो होतो. थोडक्यात म्हणजे उत्तरोत्तर आमचे ' स्कूल रिपोर्ट ' वरवर जाताना आमच्या नजरेला पडणार आहेत ही आमची अपेक्षा. दुर्दैवाने आमचे शालेय रिपोर्ट सुधारत गेले नाहीत. पूर्वीच्या काळातील ज्या ज्या भयंकर दुष्कृत्यावद्दल, मूर्ख वागणुकीवद्दल त्या काळाचा आम्ही तिरस्कार करतो, ते ते दुष्कृत्य, ती ती मूर्ख वागणूक तोडीस तोड म्हणून आजही आम्ही स्वत:च करीत आहोत. समकालीन जीवनात गतकालीन निंद्य वर्तणुकीचे धादांत नमुने आपणाला दिसतात. अशा परिस्थितीत आमच्या बुद्धिमंताचे कर्तव्य काय असू शकते? परंतु पुन्हा एकदा बुद्धिमंतानी आम्हाला दगा दिला आहे. जिकडे पाहाल तिकडे तुम्हाला समाजतिरस्कार, आत्मनिंदा, आत्मतिरस्कार, थोडक्यात नकार आणि निषेध यांची रेलचेल आढळेल. परंतु होकार आणि स्वीकार मात्र औषधालाही सापडणार नाहीत. तत्त्वज्ञानाचा प्रांत घ्या (तत्त्वज्ञान हा शब्द येथे वरच्याप्रमाणेच ढरगुती अर्थाने मी वापरीत आहे.) याही प्रांतात परिस्थिती तीच आहे. एक प्रकारच्या चमत्कारिक स्वार्थाने पछाडले जावे तशा प्रकारे आज तत्त्वचिंतक बोलताना नजरेस पडतात. तत्त्वज्ञानाचे क्षेत्र आकुंचित बनून आज तत्त्वचिंतक आणि त्यांचे निकटचे जग इतके ते छोटे बनले आहे. वैयक्तिक संबंधांचे उपनगर ही तात्त्विक क्षेत्राची अंतिम हद्द. जणू काही ' जॅक (सोम्यागोम्या कोणीही ओळखीचा या अर्थाने) खाया, माझे टीक चालले आहे, तुझे तू पाहा' हा स्वहिताचा नि स्वार्थाचा क्लासिकल मंत्र पुन्हा एकदा नव्या संदर्भात आमच्या खाजगी, आंतरिक जगाच्या रूपात अवतरू पाहात आहे.

आज आपण जसे वागत आहोत, जे करीत आहोत त्याच्यापेक्षा निश्चितच आम्ही वेगळे वागू शकतो. वेगळे करू शकतो. किंबहुना आम्ही फक्त एकच विचार केला तरी आत्मनिंदेतील विखार कितीतरी कमी होईल . पुनरुज्जीवनाच्या पश्चात मधेच जो ऱ्हासाचा काळ आला तेव्हा असे गृहीत धरण्यात येऊ लागले होते की, आपल्या या जुन्या आवडत्या जगाचे काही खरे नाही. सर्व काही खलास झाले आहे. बायबलमध्ये सांगितलेल्या भविष्याप्रमाणे जगाचा म्हणजेच इतिहासाचा अंत जवळ आला आहे. सारे संपले आहे. परंतु याच दरम्यान काही हिंमतदार मंडळी पुढे आली आणि त्यांनी नव्या शास्त्राचे उद्घाटन केले. त्यांनी आपल्या मनाशी ही आशा बाळगली की अद्याप वेळ गेलेली नाही. अजूनमुद्धा आम्ही जग सुधारण्याची हिंमत बाळगू शकतो. मात्र तेव्हाच्या लोकांनी चांगल्या दिवसांसाठी अद्याप वेळ गेली नाही असे म्हटले होते तरी आपण आज थोडी वेगळी भूमिका घ्यावयास हवी. आपण स्वत:शी म्हटले पाहिजे की आमच्या सगळ्या महत्त्वाकांक्षा परिपूर्ण झाल्याचे दृष्य पाहावयास अद्याप खूप अवधी जावयास हवा. इतक्या लवकर ही अपेक्षा करण्यात अर्थ नाही. मानवी इतिहासाला आता कुठे प्रारंभ झाला आहे हे आम्हाला आज उत्तम प्रकारे जाणवले आहे. सुधारणेला वाव असतो ही तर नेहमीचीच गोष्ट आहे. परंतु सुधारणेला वाव असतो तसाच अवधीसुद्धा असू शकतो हे आता आम्ही शिकले पाहिजे. हायर प्रायमेमटस् (म्हणजे माकडे, एपवानर आणि मनुष्ये) यांच्यापाशी भरपूर प्रमाणात बुद्धिकौशल्य आणि हुषारी

असूनसुद्धा ही मंडळी खूप यशस्वी झाली असल्याचे दिसत नाही. मनुष्यप्राण्याला तर ५००,००० हजार वर्षांचा इतिहास आहे. असे असूनसुद्धा गेल्या फक्त ५००० किंवा त्याच्या आसपासच्या वर्षात काय ते तो त्याच्या विशेष कर्तृत्वशक्तीसाठी बक्षिस मिळवू शकला आहे. आणि गेल्या फक्त ५०० वर्षांच्या काळातच एक जैविक प्राणी म्हणून तो काही प्रमाणात यशस्वी होऊ लागला आहे. वैश्विक काळाच्या (कॉस्मिक टाईम) मापात बोलायचे ठरविले आणि सजीवांच्या उत्क्रांतीचा काळ समजा एका वैश्विक वर्षामध्ये बसवला तर मनुष्यप्राण्याच्या उत्क्रांतीसाठी फक्त एक दिवस देता येईल. आपल्या मानवी किंवा दैनंदिन दिवसाच्या हिशेबात गेली फक्त दहा ते पंधरा मिनिटेच काय ते पृथ्वीतलावरील आपले जीवन काहीसे बिनसंकटाचे गेले आहे. एरवी इतका प्रदीर्घ काळ आमचे जीवन धोक्याने भरलेले आणि अनिश्चितच होते. ही दहा-पंधरा मिनिटे उजाडली म्हणून, नाहीतर त्याच्याआधी आम्ही कोठल्याही क्षणी पृथ्वीतलावरून अदृष्य झालो असतो. तरीसुद्धा प्रतीकूल आणि भांबावून टाकणाऱ्या जगातील, जीव मुठीत धरून कसेबसे जीवंत असणाऱ्या छोट्या जमातींच्या रूपात शिल्लक राहिलो असतो. फक्त गेल्या पंधरा मिनिटातच ज्याला प्रगती शब्द लावता येईल असे काही घडून आले आहे. ( ते का घडून आले याच्या कारणात मी शिरत नाही; अर्थात ती तंत्रवैज्ञानिक कारणे देता येणार नाहीत असे नाही.) आपल्यासमोर राजकीय, आर्थिक, नैतिक असे अनेक प्रश्न आहेत. या प्रत्येक प्रश्नाचा संबंध आमच्या जीवनपद्धतीशी, आमच्या आचारविचारांशी आहे. आणि तरीही त्यातील एकाही प्रश्नावर निश्चित स्वरूपाचे एकच एक उत्तर दिले आहे असे म्हणता येणार नाही. आता कुठे आम्ही शिकणे सुरू केले आहे. आणि कदाचित त्याच्याचमुळे पुढेमागे आम्ही काहीतरी शिकू अशी आशा करावयास जागा आहे. तेव्हा प्रगतीच्या आशेची कुचेष्टा करू पाहाणे म्हणजे मुर्खपणाची हद्द होय. आत्म्याचे दारिद्र्य आणि विचारांची क्षुद्रता याचाच तो पुरावा आहे. आमच्या प्रश्नासाठी निश्चित स्वरूपाचा इलाज आम्हाला सापडू शकला नाही, ज्याच्यापुढे आणखी प्रवास करावा लागणार नाही असे अखेरचे विश्रामधाम आम्ही गाठू शकलो नाही म्हणून गर्भगळित होण्याचे काही कारण नाही. थॉमस हॉब्ज जीवनाला शर्यतीची उपमा देत असे. आणि म्हणत असे की या शर्यतीत जे सर्वात पुढे असतात त्यांना अत्यानंद होत असतो. अत्यानंदाची ही हॉब्जची व्याख्या नजरेसमोर असल्याने हॉब्जला सर्वजण कट्टर भौतिकवादी–यश मिळालेच पाहिजे या जिद्दीचे तत्त्वज्ञान बनविणारा पहिला महाभाग असे म्हणत असत. परंतु खरे तर हॉब्जच्या विचारांची ही केवळ चेष्टा झाली. एका अर्थाने हॉब्ज हा गो-गेटर–यशाच्या मागे धावणारा खरा, परंतु तो धावण्याचा पुरस्कार करणारा होता, 'गेटिंग'चा नव्हे. गृहीत धरलेल्या शर्यतीमध्ये शर्यत संपली असे सांगणारा खांबच नव्हता. हॉब्जप्रणित शर्यतीचे सर्वात मोठे लक्षण म्हणजे त्या शर्यतीत भाग घेणे होय. आणि ही शर्यत कसली होती तर हे जग अधिक सुंदर कोण बनवितो याची. हॉब्ज जेव्हा म्हणतो की, शर्यत सोडून शर्यतीमधून बाहेर पडणे म्हणजे मृत्यूला आमंत्रण देणे तेव्हा

त्याच्या डोळ्यासमोर आत्मिक मृत्यू होता. 'लेव्हियाथन' या त्याच्या ग्रंथात तो लिहितो की, आम्ही जोवर जिवंत आहोत तोवर अक्षय मन:शांती या नावाची काहीही गोष्ट आपल्यासाठी उपलब्ध नाही. कारण जीवन म्हणजे गती अशी स्थिती असल्याने, ज्या जीवनात काही अर्थ नाही असे जीवन असू शकत नाही. तसेच ज्या जीवनात वासना नाही किंवा भयग्रस्तता नाही असेही जीवन असू शकत नाही. एवंच पुढे जात राहाणे यात जे समाधान आहे ते अन्य कशातही नाही. मी हॉब्जच्या मताशी सहमत आहे.

●●●



अनुक्रमणिका

# हिटलर आणि स्टॅलिन – समांतर आयुष्ये

## नाना जोशी

विसावे शतक समजावून घेण्यासाठी, हिटलर आणि स्टॅलिन या दोघांच्याही 'कामगिरी'ची अगदी बारकाईने तपासणी करणे आवश्यक आहे. एरवी विसावे शतक समजावूनच घेता येणार नाही. तसे करीत असताना त्या दोघांच्या राजवटींची कोठची वैशिष्ट्ये आणि उद्दिष्टे समान होती आणि कोणती वेगळी होती याची दखल घेणे हे विशेषकरून महत्त्वाचे आहे. या दोघांच्या चरित्राची अनेक नवी साधने उपलब्ध झाली आहेत. रशियात नुकत्याच झालेल्या घडामोडींनंतर आणि क्रांतीनंतर रशियन सरकारने, आपले काही दफ्तरखाने अभ्यासाला खुले केले. जर्मनीचा पराभव दोस्त राष्ट्रांनी केल्यानंतर जर्मनीचा साराच दफ्तरखाना अभ्यासास उपलब्ध झाला. या साऱ्या नव्या साधनांच्या मदतीने अभ्यासकांनी या दोघांच्याही चरित्रावरती नवा प्रकाश टाकला. नवी माहिती वाचकासमोर आली. हिटलरच्या बाबतीत आता आणखी नवी माहिती अभ्यासकास संशोधनानंतर मिळेल असे सध्या तरी दिसत नाही. स्टॅलिनच्या बाबतीत तसे म्हणता येणार नाही, कारण अजूनही रशियन दफ्तरखान्याचा फारच थोडा भाग अभ्यासकास उपलब्ध झाला आहे. त्याची जी नवी माहिती अभ्यासकांना उपलब्ध होत आहे, त्याने स्टॅलिनच्या व्यक्तिमत्वास उजाळा न मिळता ते अधिकच काळेकुट्ट होत चालले आहे. प्रिन्सटन विद्यापीठातील डॉ. रॉबर्ट टकर यांनी नुकतेच तीन–खंडातील स्टॅलिनचे चरित्र प्रसिद्ध केले.

त्यांनी या नव्या चरित्राच्या प्रस्तावनेत म्हटले आहे की "माझे चरित्र लिहून पुरे झाल्यानंतर कितीतरी नवी माहिती उपलब्ध झाली, पण त्यामुळे मी स्टॅलिनसंबंधी काढलेल्या निष्कर्षात काही फरक करावा असे काहीही त्या नव्या माहितीत नाही! खुद्द रशियात राहाण्याऱ्या रशियन लेखकाला स्टॅलिन चरित्राची साधने अजूनही प्राप्त होत नाहीत, तर मग डॉ. टकर यांच्यासारख्या अमेरिकन संशोधकांची गोष्टच सोडा. असे असले तरी सध्या रशियात व जे नवे वातावरण तयार झाले आहे, त्यामुळे स्टॅलिनच्या राजवटीचा प्रत्यक्ष अनुभव असलेले लोक, आता अगदी मोकळेपणाने त्या राजवटीच्या

वैशिष्ट्यांची व उद्दिष्टांची चर्चा करू लागले आहेत हेही तितकेच खरे. हा सारा अभ्यास सर्व बाजूंनी व नव्याने उपलब्ध होत असलेल्या साधनांच्या मदतीने होत असला तरी त्यात एक मुख्य त्रुटी राहून गेली आहे, असे पॉल जॉनसन या प्रख्यात राजकीय समीक्षकाचे मत आहे. जॉनसन यांच्या मते या दोन्ही नेत्यांच्या ज्या समान अशा राजकीय श्रद्धा होत्या त्याचे पुरेसे विश्लेषण इतिहासकारांनी आणि चरित्र लेखकांनी केलेले नाही. जे काही थोडे फार विश्लेषण झाले आहे, ते अगदी जुजबी स्वरूपाचे आहे. या दोन्ही नेत्यांनी एकमेकांवर जो राजकीय प्रभाव पाडला त्याबद्दल अजूनही कोणी फारसे लिहलेले नाही. हे दोन्हीही नेते ज्या काळात वावरत होते, त्या काळाची काही विशिष्ट प्रकृती होती, तिचा काही एक युगधर्म होता. त्या प्रकृतीने व युगधर्माने ते कितपत झपाटले होते हेही कोणी सांगत नाही असे पॉल जॉनसन यांचे म्हणणे आहे. यासंबंधात श्री. पॉल जॉनसन यांनी अलिकडेच थोडे लिहिले आहे. त्याचा हा त्रोटक असा परिचय.

श्री. जॉनसन यांच्या मते कोणीही विश्लेषकाला सुरुवातीलाच एका अगदी गंभीर स्वरूपाच्या अडचणीला सामोरे जावे लागते. ती अडचण म्हणजे हिटलर आणि स्टॅलिन या दोघांच्या संबंधी प्रचलित असलेल्या समजुती. प्रचलित असलेल्या समजुती येणे-प्रमाणे. हिटलर आणि स्टॅलिन हे दोघेही दोन प्रकारच्या जहाल तत्त्वप्रणालींचे पुरस्कर्ते होते. हिटलरचा जर्मनी आणि स्टॅलिनचा रशिया, हे दोन्ही देश राजकीय इंद्रधनुष्याची परस्पर विरोधी अशी टोके होती. या प्रकारच्या समजुती दुसऱ्या महायुद्धापूर्वीच्या काळात प्रचलित होत्या. विशेषत: डाव्या गटात, त्या गटांच्या पाठीराख्यात व सहप्रवाश्यात. दुसरे महायुद्ध होऊन गेले. त्या युद्धानंतरही चांगली चाळीस वर्षे होऊन गेली. तरीसुद्धा ही दुसऱ्या महायुद्धापूर्व काळात डावे आणि त्यांचे सहप्रवासी यांच्या मनात घट्टपणे रोवून बसलेली समजूत अजूनही त्याच परिस्थितीत आहे. त्यात अगदी काहीही फरक पडलेला नाही. पॉल जॉनसन यांच्या मते ही संकल्पना – स्टॅलिन व हिटलर (ही परस्पर विरोधी टोके होती आहेत) गृहीत धरावयाची याचा अर्थ स्टॅलिनने – हिटलरच्या राजवटीसंबधी केलेले विवरण व व्याख्या स्वीकारण्यासारखेच ते आहे. ही संकल्पना गृहीत धरली, स्टॅलिनचे विवरण व व्याख्या स्वीकारल्या की मग, हिटलर आणि स्टॅलिन या दोघांच्या राजवटीची वैशिष्ट्ये आणि उद्दिष्टे समजावून घेण्याच्या कामात जबरदस्त अडसर निर्माण होतो. दुसऱ्या महायुद्धापूर्वीच्या कालखंडातील वस्तुस्थितीचे वर्णन करताना 'उजवागट'', ''डावा गट'', ''फॅसिझम'' असली लेबले वापरून त्या कालखंडातील वस्तुस्थितीसंबंधी यथार्थ वर्णन करता येणार नाही. तशा प्रकारे त्या परिस्थितीचे वर्णन करणे योग्यही नाही. हिटलर आणि स्टॅलिन यांच्या कृत्याचे वर्णन करताना ही लेबले उपयोगी नाहीत हे ध्यानात ठेवावयास हवे.

स्टॅलिन आणि हिटलर यांचा जन्म अनुक्रमे १८७९ आणि १८८९ सालचा. दोघेही तसे अर्धशिक्षित. परंतु काही ज्ञानशाखांतील त्यांचे वाचन अफाट होते. इतके अफाट होते

की 'दिखाऊ विचारवंताचे'' सोंग चांगल्या प्रकारे वठवीत. 'दिखाऊ' (Psudo) हा शब्द एका विशिष्ट अर्थाने येथे वापरण्यात आला आहे. एकोणिसाव्या शतकात आणि विसाव्या शतकाच्या राजनीती या ज्ञानशाखेतील संशोधकांनी जे सिद्धांत, संकल्पना व कल्पना मांडल्या होत्या, त्यातल्या बऱ्याच या दोघांनी आत्मसात केल्या होत्या. तसेच त्यांनी चांगले रवंथ करून त्या पचविल्याही होत्या. त्या सर्वांचा – सिद्धांत, संकल्पना आणि कल्पनांचा प्रत्यक्ष आविष्कारही ते करीत होते. एक विशेष या ठिकाणी लक्षात घ्यावयास हवा. हे सारे ते दोघे आपापल्या पद्धतीने करीत होते. हाच तो विशेष. कमालीचा सारखेपणा व एकवाक्यता असलेल्या एका तत्त्वप्रणालीचे ते वारसदार होते, ही संकल्पना त्यांच्या ''कर्तृत्त्वाचे' विश्लेषण करण्यासाठी अत्यंत उपयुक्त अशी संकल्पना आहे. म्हणूनच त्या दोघांनाही समजावून घेण्यासाठी ती संकल्पना चांगली आत्मसात करणे हे अतिशय महत्त्वाचे आहे. ही संकल्पना आत्मसात करण्याआगोदर तत्कालीन थोडा इतिहास प्रथम समजावून घेणे, त्याचे ज्ञान करून घेणे, हेही आवश्यक आहे. तसे केले तर हिटलर व स्टॅलिन हे नेमके काय करू पाहात होते हे तपासून पाहाता येईल.

काही राजकीय विश्लेषक, काही नेत्यांना ''परंपरावादी'' म्हणून संबोधितात. दुसरे काही विश्लेषक याच नेत्यांना ''उजव्या गटाचे'' नेते समजतात. एखाद्या नेत्याला ''परंपरावादी अथवा उजव्या गटाचा नेता मानण्यात येते, तेव्हा तसे करण्यामागे या विश्लेषकांची एकच ठाम अशी श्रद्धा असते. ती श्रद्धा अशी की कोणत्याही व्यक्तीत मूलभूतपणे सुधारणा करताच येत नाही. संपूर्ण अशी नैतिक स्वरूपाची क्रांती घडून येईल अशी ख्रिश्चन धर्मीयांची अपेक्षा असते. परंतु त्याचबरोबर सध्याच्या युगात ती क्रांती घडून येणार नाही असे त्यांना वाटत असते. ''राजकीय प्रक्रिया'' या साधना-करवी ''नवा मानव'' घडविणे शक्य आहे, ही संकल्पना यशस्वीपणे जाँ-जाकस रूसो या तत्त्वज्ञाने प्रथम मांडली. त्यानेच त्या संकल्पनेचा जोरदारपणे पुरस्कार केला. त्यात त्याला थोडेफार यशही आले. एक जर्मन तत्त्वज्ञ हेगेल यांनी रूसोचे विचार व संकल्पना या दोन्ही आपल्याशा केल्या. हेगेल यांना अभिप्रेत असलेल्या समाजाचे संकल्प-चित्र त्यांनी आपल्या लिखाणातून मांडले आहे. त्यांच्या सामाजिक अभियांत्रिकीच्या कामात ''राज्य'' ह्या व्यवस्थेकडे देण्यात आलेले भूमिका इतकी महत्त्वाची आहे, की तिचे स्वरूप काही वेळा अतिशय आधिभौतिक आहे असे वाटू लागते. हेगल यांचे तत्त्वज्ञान मार्क्सने आपल्या स्वतःच्या कल्पनांचा इमला उभारण्यासाठी वापरले. मार्क्सने आपल्या मनाशी योजलेले परिवर्तन घडून येण्यासाठी प्रस्थापित समाजात ठिणगी पडण्याची आवश्यकता होती. ही 'ठिणगी' कशी पडते हे समजावून सांगण्यासाठी मार्क्सने सामाजिक 'पेचप्रसंग' ही संकल्पना मांडली. हेगेल व मार्क्स दोघांनाही वंश ही गोष्ट अतिशय महत्त्वाची वाटत होती. इतकी महत्त्वाची की त्यांच्या कल्पनेत येऊ घातलेले सामाजिक परिवर्तन हे जणू त्यावरच अवलंबून आहे. विवेचनाच्या या ठिकाणी आणखीही एका घटनेची नोंद घेतली पाहिजे. मार्क्सने १८४३-४४ च्या सुमारास ज्यू

विरोध (anti-Semitism) हा सिद्धांत मांडला. पुढे परिपक्व दशेला पोहोचलेला मार्क्सवाद हा १८४३-४४ च्या "ज्यू-विरोध" या सिद्धांताचा काही प्रमाणात तरी विकसीत झालेला असा भाग आहे. असेही म्हणता येईल की, "ज्यू दलाली" संबधी मार्क्सला कमालीचा द्वेष वाटे. या ठिकाणी "दलाल" या शद्बाला अनेक अर्थ आहेत. उदा., दारोदार जाऊन माल विकणारे, रस्त्यावरचे फेरीवाले, पैसा मिळवण्यासाठी कसलेही कुकर्म करणारे, फक्त पैशाच्या पाठी असलेले व्यापारी इत्यादी. मार्क्सच्या "ज्यू दलालां"बद्दल असलेल्या द्वेषाचे विस्तारित असे स्वरूप, उपक्रमशीलता दर्शवणाऱ्या आणि बुर्झ्वा वर्गाच्या द्वेषात झाले. सुरुवातीला इतिहास घडवणारा एकमेव घटक "वंश" हा समूह होता. कालांतराने "वंश" या समूहाचे महत्त्व नाहीसे करण्यात आले. त्याची जागा सामाजिक "वर्ग" या संकल्पनेने घेतली. त्याचबरोबर आणखीही एक मुद्दा याठिकाणी ध्यानात घ्यावयास हवा. डार्विनच्या उत्क्रांतीवादाच्या एका तत्त्वानुसार जे प्राणी निरोगी व सुदृढ असतात, तेच तगून राहातात. हेच तत्त्व "समाज" ह्या समूहाला लावण्यात येते. मानवी समूहात ज्या व्यक्ती व गट निरोगी, सुदृढ, बलवान आहेत त्याच तग धरून राहातात. अथवा जे तग धरून राहातात ते निरोगी, बलवान असतात. मार्क्सवर या सामाजिक डार्विनवादाचा जरूर परिणाम झाला होता. मार्क्सनंतर अनेक वर्षांनी आलेल्या हिटलरलाही "सामाजिक डार्विनवाद" व त्यात अनुस्यूत असलेली संकल्पना मान्य होती. त्याला ती पटलेलीही होती. 'वंश' आणि 'सामाजिक वर्ग' या दोन्ही संकल्पनांविषयीचे मार्क्सने केलेले विवरण संदिग्ध आहे. या संदिग्धतेचे प्रतिबिंब ज्या राजवटी मार्क्सवादी समजल्या जातात – उदा., माओचा चीन, कॅस्ट्रोचा क्यूबा, रूमानियाचे सेसेस्कू – ह्या सर्व राजवटीत सातत्याने प्रतिबिंबित झाल्याचे दिसते. या साऱ्याच मार्क्सवादी राजवटी "वंश" या संकल्पनेवर आधारीत असलेल्या राष्ट्रवादाकडे झुकताना दिसतात. तसेच या सर्व राजवटींना, आपल्या राष्ट्राबाहेरील परदेशी व्यक्तींविरुद्ध द्वेष असलेलाही आढळतो. १९४१ सालापासून स्टॅलिनच्या रशियाने ही प्रवृत्ती प्रदर्शित करण्यास सुरुवात केली. स्टॅलिनच्या अखेरच्या वर्षात या प्रवृत्तीने राक्षसी स्वरूप धारण केले. अगदी शिगेला पोचलेला "ज्यू विरोधी द्वेष" असे स्वरूप त्या प्रवृत्तीने धारण केले होते. आपणास रास्तपणे असे म्हणता येईल की, स्टॅलिन आणखी थोडी वर्षे राहिला असता, तर 'ज्यूंचा नायनाट झालाच पाहिजे' हा कार्यक्रम स्टॅलिनने हाती घेतला असता. याच प्रकाराचा कार्यक्रम प्रत्यक्ष अमलात आणताना हिटलरने जे क्रौर्य आणि हिंसा यांचा उपयोग केला, त्याची बरोबरी स्टॅलिनने केलीच असती. वेळ प्रसंगी हिटलरलाही मागे टाकले असते.

याबाबतीत विचार करताना मुसलोनीचे उदाहरण उद्बोधक ठरेल. मुसलोनीने आपल्या राजकीय जीवनाचा आरंभ मार्क्सवादी म्हणून केला. तथापी त्या मुसलोनीच्या मार्क्सवादाने अत्यंतिक स्वरूपाच्या राष्ट्रवादाकडे मोहरा वळविला होता. लेनिनच्या मते मुसलोनीही हा अगदी ज्याला आदर्श समजावे, ज्याला नावाजावे आणि इतरांपेक्षा मार्क्सवादाच्या अंमलबजावणीत जो आघाडीवर आहे असा तो मार्क्सवादी होता. पहिल्या

महायुद्धापूर्वी मुसलोनीची अशी खात्री पटली की, सत्तेकडे घेऊन जाणारा एकच राजमार्ग आहे. तो राजमार्ग म्हणजे, कामगारवर्गाच्या हितसंबंधांना, त्यांच्या वर्गीय अशा स्वार्थाला आवाहन करण्यापेक्षा बहुवर्गीय अशा देशभक्तीच्या भावनेला आवाहन करणे, तिचा अनुनय करणे. आजचे अनेक इतिहास लेखक, विश्लेषण स्टॅलिन आणि हिटलर यांनी एकमेकांवर जो प्रभाव पाडला त्याची दखल जरूर घेतात. परंतु त्या दोघांवरही मुसलोनीने जी यशस्वी अशी छाप पाडली होती त्याकडे मात्र सर्वस्वी दुर्लक्ष करतात. पहिले महायुद्ध आणि दुसरे महायूद्ध यांच्या दरम्यानच्या काळातील युरोपियन इतिहासाचे लेखन आणि विश्लेषण अनेक संकल्पनाच्या आधारे करण्यात येते. मार्क्सवाद ही त्या संकल्पनापैकी एक. आणखीन एका प्रकारच्या विश्लेषणात एका दुष्ट प्रवृत्तीने, दुसऱ्या चांगल्या प्रवृत्तींना कसे बिघडवले याचा अभ्यास होतो. या दुष्ट प्रवृत्तीत, पहिल्या महायुद्धाला अग्रस्थान द्यावे लागेल. पहिले महायुद्ध ही त्या बिघाड घडवून आणण्याच्या कामातील पहिल्या क्रमांकाची व अगदी आरंभीची अशी शक्ती होती. मानवाच्या दृष्टीने, जी परिमाणे सुसंकृततेचे लक्षण समजली जातात, ती सारीच परिमाणे आणि मानदंड अगदी जमीनदोस्त होतील असा तडाखा त्या शक्तीने दिला होता. त्यामुळेच राजकीय हिंसेच्या युगाला सुरुवात झाली. युरोपियन् समाजाची ही जी सामाजिक अवनती झाली, त्याचा फायदा कोणी उठविला असेल तर तो लेनिनने. रशियातील अगदी बाल्यावस्थेत असलेली लोकशाही राजवट, जबरदस्ती आणि हिंसा यांच्या जोरावर लेनिनने उलथून टाकली. अनेक विद्वान या तथाकथित क्रांतीस खरीखुरी क्रांती मानतात. असे जेव्हा ते विद्वान सांगतात, तेव्हा दोन गोष्टी सांगायचे त्यांच्या मनात असते. एकीकडे त्या क्रांतीचे नैतिक असे समर्थन करण्याची इच्छा त्यांना असते. त्याजबरोबर त्यांना असेही सांगावयाचे असते, तो बनाव हे कटकारस्थान, जुलुमजबरदस्ती नव्हती, ती अगदी खरीखुरी अशी क्रांती होती. इतिहासात ती क्रांती – ऑक्टोबर क्रांती – ही अगदी एकमेव व आगळी अशी क्रांती मानण्यात येते त्याचे कारण ती 'खरीखुरी' क्रांती होती हेच. वास्तविक ती क्रांती हा एक सरळसोट सैनिकी उठाव होता. त्या उठावाचा नेता ट्राटस्की. त्या नेत्याचे, ट्राटस्कीचे व्यक्तित्त्व देवकोटी (CHARISMA) स्वरूपाचे याबद्दल शंकाच नाही. तसेच हेही स्पष्ट आणि उघड आहे की ट्राटस्कीच्या धाडसाशिवाय आणि त्याच्या अगदी निर्दय अशा वागणूकीशिवाय लेनिनला सत्तेवर कधीही येता आले नसते. या यशस्वी ठरलेल्या सैनिकी उठावापाठोपाठ मध्ययुरोपमध्ये १९१८ आणि १९१९ च्या दरम्यान मार्क्सवाद्यांनी सत्ता बळकावण्यासाठी, तसेच उठाव केले, त्याच प्रकारचे प्रयत्न केले, पण ते सारे अयशस्वी ठरले.

मार्क्सवाद्यांनी हिंसेचा केलेला पद्धतशीर उपयोग ही हिटलर आणि मुसलोनी या दोघांच्याही उदयासाठी आवश्यक अशी पार्श्वभूमी होती. यातील मुसलोनी यांनी केलेला हिंसेचा स्वीकार इतका पद्धतशीर आणि यशस्वी होता की १९२२ साली कोणत्याही

प्रकारची जुलूमजबरदस्ती, पाशवी बळ यांचा वापर न करता नुसत्या धमकीच्या जोरावर मुसलोनीला सत्ता हस्तगत करता आली. ट्राटस्कीप्रमाणे मुसलोनींही ''देवकोटी'' तला नेता नव्हता . आरंभीच्या काळात धाडस व औधत्यही होते. परंतु १९३० साली स्टॅलिन आणि हिटलर या दोघांनाही मुसलोनीने मागे टाकले. कालांतराने मुसलोनीला एका 'विदुषकाचे' स्वरूप प्राप्त झाले ही गोष्ट अगदी खरी. त्या कारणानेच मुसलोनीच्या कर्तृत्त्वाच्या जगास विसर पडला आहे. परंतु हिटलर आणि स्टॅलिन यांचा अभ्यास करताना मुसलोनींच्या त्या सुरुवातीच्या कर्तृत्त्वाला जरूर महत्त्व आहे. १९२० साली ज्यांची सर्वत्र अतिशय वाहावा होत होती, ज्यांचे जगात अनुकरण होत होते, असा तो नेता होता. त्याचे स्मरण करणे आवश्यक आहे. १९२० सालच्या सुमारास हिटलर त्याच्याकडे एक 'हिरो' म्हणून पाही. त्याच्या दृष्टीने मुसलोनी हा पुजनीय-वंदनीय असा नेता होता. हिटलरच्या मते, एका दुय्यम दर्जाच्या लोकांना, मुसलोनीने केवळ आपल्या व्यक्तिमत्वाच्या प्रभावाखाली मोठेपण प्राप्त करून दिले होते. स्टलिनवरही मुसलोनीचा प्रचंड प्रभाव होता. १९२९ सालापासून स्टॅलिनने ''व्यक्तिमत्त्वाचे स्तोम'' या सूत्राचा विचार केला होता. अनेक विद्वान १९२९ साली या सूत्रांचा स्वीकार झाला याची नोंद घेतात. परंतु स्टॅलिन हा मुसलोनीच्या पावलावर पाऊल टाकून त्याचे अनुकरण किती करत होता, याची दखल मात्र हे विद्वान घेत नाहीत. त्याबद्दल पुरेशी आस्थाही दाखवीत नाहीत . १९२८-२९ सालच्या दरम्यान मुसलोनी हा फॅसिस्ट नेता पुजनीय. त्याने मार्क्सवादी आणि प्रतिगामी गटातील शत्रूंचा पुरा नायनाट करण्यात यश मिळवले होते. तो आपल्या स्वत:च्या पक्षात अत्यंत सामर्थ्यशाली असा नेता होता. तो इतका सामर्थ्यशाली होता की त्याने फॅसिस्टपक्षाच्या महासमितीला, आपल्या स्वत:च्या नेतृत्त्वाखाली सरकारच्या एका खात्याचे स्वरूप दिले होते. १९२९ च्या फेब्रुवारी महिन्यात, त्याने अत्यंत चलाखीचा भीमटोला हाणण्यात यश मिळवले. मुसलोनीने त्याला स्वत:च्या ज्या अटी पसंत होत्या, त्या अटींवरहुकूम पोपवरांवर मैत्री प्रस्थापित करण्यात यश मिळविले. या मैत्रीमुळे एक गोष्ट शक्य झाली. ती म्हणजे त्याच्या पाठीराख्यांना अनेक पदव्या वहाल करणे अगदी सोपे झाले. ''ईश्वराने इटालीच्या उद्धारासाठी पाठवलेली व्यक्ती,' 'नैतिक पिता', 'एक नवा संत फ्रांन्सिस', 'ईश्वरी सिझर' या त्या अनेक पदव्यांपैकी काही. या पदव्या मिळाल्या, त्या पोपमैत्रीमुळे अगदी कृतार्थ असल्यासारखे झाले होते. १९२९ सालच्या मे महिन्यातील निवडणुकीत त्याने चांगलीच हातचलाखी केली होती. अगदी भानामती वाटावी अशी. त्या निवडणुकीत झालेल्या एकंदर मतदानापैकी मुसलोनीला ९८.४% मते मिळाली. १९२९ च्या सप्टेंबर महिन्यात त्याचा आत्मविश्वास एवढा वाढला की, त्याने रोममधील मंत्रालयातील अनेक खात्यांवरील आपले प्रत्यक्ष नियंत्रण सोडून दिले. १९२९ साली स्टॅलिनचा पन्नासावा वाढदिवस होता. हा वाढदिवस साजरा करण्यासाठी व त्या दिवसाचे स्मरण राहावे म्हणून स्टॅलिनने एका वैशिष्ट्यपूर्ण धोरणास मंजुरी दिली. या धोरणानुसार स्टॅलिनच्या ''व्यक्तिमत्वाचे स्तोम''

माजविण्यात येणार होते. १९२९ साली स्टॅलिनने 'जो जिनीयस आहे असा महान नेता आणि शिक्षक' ही पदवी धारण केली.

मुसलोनीबद्दल इतक्या विस्ताराने लिहिणे जरूर होते. स्टॅलिनने मुसलोनीकडून काय शिकवण घेतली हे त्यावरून स्पष्ट होईल. मुसलोनीच्या इतिहासाची उजळणी करण्यामागे ते प्रमुख कारण. स्टॅलिनने मुसलोनीप्रणीत ''फॅसिझमच्या'' अनेक अंगांचा भरपुर उपयोग केला. परंतु एक तत्त्वप्रणाली व्यक्त करणारी सामाजिक प्रक्रिया या स्वरूपात फॅसिझमचे काय करायचे याची स्टॅलिनला कल्पना नव्हती. त्यासंबंधात काय धोरण ठरवावे हाच.खरा पेच होता. स्टॅलिन हा प्रज्ञावान नेता नव्हता, हे सर्वच विचारवंतानी मान्य केले आहे. फॅसिझमचे काय करायचे त्यावद्दल, ''पार्टीलाईन'' काय असावी यासंबधी त्याला कोणाकडूनही कसल्याहीप्रकारचे मार्गदर्शन मिळालेले नव्हते. मार्क्सच्या एकाही ग्रथांत वा लिखाणात फॅसिझमसंबंधी एकही अक्षर नव्हते. लेनिनची गोष्ट स्टॅलिनपेक्षा फार वेगळी होती. लेनिनचे स्वत:चे असे इतिहासविषयक तत्त्वज्ञान होते. पण फॅसिझमचा उगम फारच उशिरा म्हणजे १९२० नंतर झाल्याकारणाने, लेनिननेही त्या विषयी लिहिलेले नाही. फॅसिझम म्हणजे कशा प्रकारची समाजरचना आहे, फॅसिझमचे तत्त्वज्ञान कोठच्या स्वरूपाचे आहे, यावद्दल लेनिनला काहीच कल्पना नव्हती. म्हणूनच लेनिनला फॅसिझमचा समावेश आपल्या इतिहासविषयक तत्त्वज्ञानात करता आला नाही. फॅसिझम हा खरे म्हणजे मार्क्सवादातूनच वाहेर आलेला एक राजकीय पक्ष होता, असेच त्याचे वास्तव वर्णन करता येईल. परंतु त्याचा उगम व विस्तार १९२७ नंतर झाल्याकारणाने, त्याचा पोथी मानल्या जाणाऱ्या ग्रंथात उल्लेख नाही. म्हणूनच त्यास मान्यता देण्याचा प्रश्न नव्हता. परंतु कोणताही मार्क्सवादी हे साधे सरळ सत्य कबूल करणार नाही. निदान त्या काळी तरी मान्य करण्यास तयार झाला नसता. फॅसिझम ही इटालीत निर्माण झालेली चमत्कारिक स्वरूपाची जहाल अशी सामाजिक विचारसरणी होती. हे असे होते तरी ठोकळेवाज मार्क्सवादापुढे वेगळाच पेच होता. मार्क्सवादाची पोथी झालेली होती. या पोथीचे युरोपमध्ये आणि इतरत्रही पठण होत होते. वेळप्रसंगी त्यातील विचारांचे अनुकरणही. अशा परिस्थितीत मार्क्सवादी पोथीला फॅसिझम हे भविष्यकाळातील घटीत आहे हे मान्य करणे अर्थातच शक्य नव्हते—कारण पोथीत तसा उल्लेख नव्हता. प्रत्यक्षात फॅसिझम ही चळवळ इटालीत यशस्वी ठरत असल्याकारणाने, तिच्यावद्दल मार्गदर्शन करणे आवश्यक होते. ती चळवळ काळ्या शब्दात मांडणेही क्रमप्राप्तच होते. म्हणून फॅसिझम हा वुर्झ्वा कालखंडाची अखेरची मृत्यूघंटा ठरली. तिचे एकंदर स्वरूप नैतिकदृष्ट्या अत्यंत दुष्ट आहे, असेच भासविणे भाग होते. हे सारे लक्षात घेतल्यानंतर स्टॅलिन फॅसिझमविषयी धोरण ठरविण्यास उत्सुक नव्हता. अनेक आढेवेढे घेतल्यानंतर स्टॅलिनने फॅसिझमची व्याख्या करण्यास मंजुरी दिली. त्याने पुढील व्याख्येस मान्यता दिली. १९३३ च्या डिसेंबर महिन्यातील कम्युनिस्ट इंटरनॅशनलने ही व्याख्या केली. ती व्याख्या येणेप्रमाणे, ''आर्थिक भांडवलशाहीतील

साम्राज्यवादी आणि अत्यंत संकुचित अशा घटकांची अगदी उघड उघड आतंकवादी स्वरूपाची हुकूमशाही," याचाच अर्थ फॅसिझम राजकीय विचारसरणीच्या इंद्रधनुष्यात अगदी उजव्या टोकाला आहे असा होत होता. हे स्थान फॅसिझमला जे एकदा प्राप्त झाले ते कायमचे. अजूनही अनेक विचारवंतांच्या मनात फॅसिझम त्याच ठिकाणी आहे.

अर्थात हिटलरचाही या व्याख्येत अंर्तभाव करता येईल इतकी ती व्याख्या ऐसपैस होती. हिटलर १९३३ च्या सुमारास सत्तेवर आला. दिवसेंदिवस त्याची ताकद वाढतच होती. परंतु या फॅसिझमबद्दल केलेल्या व्याख्येतील प्रत्येक शब्दाचा नेमका अर्थ असेल तर हिटलरला फॅसिस्ट म्हणता आले नसते. हिटलरची जडणघडण ही मुसलोनीप्रमाणे मार्क्सवादी विचारांच्या अनुषंगाने झाली नव्हती. हिटलर मार्क्सवादाकडे एक अत्यंत मूर्ख असा सिद्धांत अशा स्वरूपात पाहात असे. 'ज्यू प्रणित विश्वनागरिकत्त्वाचा' तो एक दर्शनी भाग आहे असे त्याचे मत होतं. फॅसिझमच्या आरंभीच्या काळात ज्यूदेखील फॅसिस्ट चळवळीत अगदी आघाडीवर राहून काम करीत. निदान १९२० साली तरी तशी परिस्थिती होती. हिटलरच्या नात्झी पक्षाला ही घटना व तो विचारही अगदी असह्य होता. हिटलर स्वत:ला नेहमी समाजवादी म्हणवून घेत असे. कामगार चळवळीतून त्याचा उदय झाला होता.. परंतु नेत्याने कामगारांचे फक्त प्रतिनीधीत्व करावयाचे नसते. अशी हिटलरची श्रद्धा होती. १९२४ साली प्रसिद्ध झालेल्या 'माईन काम्फ' (माझा संघर्ष) या आपल्या आत्मचरित्रात त्याने लिहिले आहे की, अगदी विस्तृत अशा आम जनतेची राजकीय समजूत इतकी विकसीत झालेली नसते की सर्वसामान्य अशा निश्चित राजकीय दृष्टिकोनावर ती जनता येऊन पोहोचेल. लेनिनचे मत ह्यापेक्षा वेगळे नव्हते. १९२१ सालच्या दहाव्या काँग्रेससमोर भाषण करताना लेनिन म्हणाला की " श्रमजीवी अशा संपूर्ण जनतेची आणि कामगारवर्गाची अभेद्य फळी संघटीत करणे, त्यांचे ऐक्य घडवून आणणे, आणि त्यांचे शिक्षण करणे हे फक्त कम्युनिस्ट पक्षालाच शक्य आहे. आम जनतेच्या मनात, मध्यमवर्गीयांच्या मनात जसे दोलायमान विचार निर्माण होतात, तसे विचार येणे अपरिहार्य आहे. फक्त कम्युनिस्ट पक्षच त्या विचारांचा मुकाबला करील." मुसलोनीने फॅसिस्ट पक्षाकडे अगदी हुवेहूब हीच भुमिका सुपूर्द केली होती. हिटलर मुसलोनी हे जर फॅसिस्ट तर मग लेनिनही फॅसिस्ट होता असाच निष्कर्ष विचारवंतास काढावा लागेल.

परंतु कम्युनिस्ट, नात्झी आणि फॅसिस्ट या तिघांच्याही मते लोकशाहीच्या वतीने कार्यवाहीत आणावयाच्या हुकूमशाही राज्यव्यवस्थेवर जरी श्रद्धा होती तरी त्यातील प्रत्येकाला प्राप्त झालेली संधी आणि परिस्थिती वेगवेगळी असल्याकारणाने, ती हुकूमशाही प्रस्थापित करण्याचे त्यांचे मार्ग भिन्न असणे क्रमप्राप्त होते. लेनिन आणि मुसलोनी या दोघांनी जुलूमजबरदस्ती, धाकदपटशा आणि प्रत्यक्ष हिंसा यांचा वापर करून सत्ता हस्तगत केली होती. तसा तो अगदी जवळचा मार्ग होता. हिटलरलाही या मार्गाचा अवलंब करणे आवडले असते. परंतु ते उद्दिष्ट साध्य करण्यासाठी त्याच्याकडे 'ट्रॉटस्की' नव्हता. ट्रॉटस्कीने ऑक्टोबरक्रांतीत काय कामगिरी

बजावली याचा उल्लेख वर येऊन गेलाच आहे. त्याच बरोबर मुसलोनी जसा बेछुट होता तसा हिटलर नव्हता. ती त्याची प्रवृत्तीच नव्हती. म्हणूनच १९२३ सालच्या नोव्हेंबर८-९ चा उठाव फसल्यानंतरचे हिटलरचे वर्तन अत्यंत लांछनास्पद आणि तिरस्करणीय असे आहे. परंतु तो उठाव फसल्यानंतर मात्र त्याला तो जवळचा मार्ग उपलब्ध नव्हता. दीर्घ पल्ल्याचा मार्ग पत्करणे त्याला भाग होते. जगातील अत्यंत सुरक्षित अशा राष्ट्रात तो वावरत असल्याकारणाने मतपेटीच्या द्वारे दूरच्या पल्ल्याच्या मार्गानेच जाणे त्याला भाग पडले. हिटलरचे तसे वस्तुनिष्ठ दृष्टिकोनातून लिहिलेले चरित्र अजूनही उपलब्ध नाही. पुढेमागे एखादा प्रज्ञावान साहित्यिक ते लिहीलही. परंतु आजवर प्रसिद्ध झालेल्या चरित्रातून आणि ऐतिहासिक कागदपत्रातून त्याच्या वागणुकीचे, त्याच्या कर्तृत्वाचे, त्याला तोंड द्यावे लागले त्या परिस्थितीचे अनेक दुवे उपलब्ध आहेत. हिटलर हा एक प्रकारचा राजकीय जिनियसच होता. अर्थात अत्यंत दुष्ट प्रवृत्तीचा. आपल्या वक्तृत्वाकरवी, अथक चिकाटीच्या जोरावर, आपल्या संघटना कौशल्याच्या मदतीने आणि तो जे आवाहन करीत होता, त्यातील कल्पकतेच्या सहाय्याने त्याने अगदी मंदगतीने एकंदर सर्व जर्मन मतदार संघात आपले एकमेव असे स्थान प्रस्थापित केले. दुसऱ्या महायुद्धापूर्वी ५ मार्च १९३३ साली जर्मनीत युद्धपूर्वकाळातील अखेरची निवडणूक झाली. ती निवडणूक प्रत्यक्ष होण्याआधी जर्मन राज्यव्यवस्थेतील, चॅन्सलर या प्रमुख पदावर हिटलर स्थानापन्नही झाला होता. एकंदर झालेल्या सर्व मतदानापैकी पन्नास टक्क्यापेक्षाही कमी मते हिटलरला मिळाली होती हे खरे, परंतु जी मते मिळाली ती काही कमी नव्हती. सुमारे १ कोटी ७३ लाख मते – अथवा ४३.९% मते – हिटलरला मिळाली होती. हा मताचा आकडा हिटलरला त्या निवडणुकीच्या अगोदरच्या निवडणुकीत मिळालेल्या मताशी पडताळून पाहाता हिटलरने आगेकूच किती वेगाने केली होती हे ध्यानात येते. १९३२ साली जर्मनीत दोन निवडणुका झाल्या. त्यात हिटलरला ३०% हून अधिक मते मिळाली होती. त्याला मिळालेल्या एकंदर मतांचे आकडे १ कोटी ३८ लाख आणि १ कोटी १८ लाख असे आहेत. येथे आणखीन एक मुद्दा लक्षात ठेवावयास हवा. हिटलर सत्तेवर येण्यापूर्वी जर्मनीत जी राजवट होती त्याला वायमार प्रजासत्ताक असे नाव आहे. त्या प्रजासत्ताकात झालेल्या निवडणुकीत एकंदर दहा राजकीय पक्षांनी भाग घेतला होता. या दहाही राजकीय पक्षात हिटलरला बाकी सर्वांपेक्षा कितीतरी अधिक मते मिळाली होती. याला अपवाद फक्त एकच, तो म्हणजे जर्मन समाजवादी पक्षाचा. १९१९ सालच्या निवडणुकीत जर्मन समाजवादी पक्षाला सुमारे १ कोटी १६ लाख मते मिळाली होती. मार्क्सवादी त्या काळात हिटलरचा नाझी पक्ष हा फक्त कनिष्ठ मध्यमवर्गीयांचा पक्ष होता अशी त्या पक्षाची प्रतिमा निर्माण करण्याचा प्रयत्न करतात. अजूनही मार्क्सवाद्यांचे ते प्रयत्न अथकपणे चालूच आहेत. परंतु निवडणुकीत झालेल्या मतदानात, कोठच्या वर्गाने कोठच्या पक्षाला मते दिली याचा जरा तपशिलात जाऊन अभ्यास केला असता मार्क्सवाद्यांचा विधानातील फोलपणा सिद्ध होतो. पहिले आणि

दुसरे महायुद्ध या दरम्यानच्या काळात जर्मन समाजातील प्रत्येक सामाजिक वर्गात आणि थरात हिटरलने आपले बस्तान हळुहळू बसविले होते. १९३२ साली नात्झी पक्षाचे जवळजवळ एका राजकीय पक्षात रूपांतर झाले होते. हिटलरबद्दल आणि नात्झी पक्षासंबंधी आणखी एक अपसमज पसरविण्याच्या बाबतीत मार्क्सवादी मोठे प्रयत्नशील असतात. मार्क्सवाद्यांचा असा दावा असतो की नात्झी पक्षाला जर्मन उद्योगपतींचे साहाय्य होते. परंतु प्रत्यक्षात वस्तुस्थिती अगदी वेगळी होती. नात्झी पक्ष हा सामान्यपणे व बहुतांशी स्वत:साठी स्वत:च पैसे उभे करीत असे. नात्झी पक्षाचे सदस्य आणि पाठीराखे फार मोठ्या रकमेच्या देणग्या देत. नात्झी पक्षात प्रवेश मिळवण्यासाठी प्रवेश फी द्यावी लागे. प्रवेशफी द्वारेही मोठी रक्कम जमा होई. पक्ष कार्यकर्ते पैसे जमविण्यासाठी दारोदार पेट्या घेऊन फिरत. जर्मन कम्युनिस्टही हे करीत. परंतु या बाबतीत नात्झी हे कम्युनिस्टांपेक्षा अधिक यशस्वी ठरले होते. कलावंत व्हावे अशी हिटलरची इच्छा होती. स्थापत्यशास्त्रज्ञ होण्याचा त्याचा प्रयत्न होता. या दोन्हीबाबतीत तो अयशस्वी झाल्याकारणाने तो अगदी नैराश्यग्रस्त होता हे खरे. परंतु जनतेचा पाठिंबा आपल्याकडे खेचून घेण्याच्या बाबतीत तो अधिकच कल्पक होता, उपक्रमशील होता. तो कलाक्षेत्रातच काम करता तर उत्कृष्ट रंग-मंच व्यवस्थापक म्हणून त्याने मोठे नावही मिळविले असते. नात्झीपक्षाच्या सभासदांनी घालावयाचा गणवेष, त्यांनी धारण करावयाची पदके, पक्षाची निशाणे, झेंडे यांच्या निर्मितीसाठी हिटलरने अपार कष्ट घेतले होते. मुसलोनीचे फॅसिस्ट अथवा सोव्हियत युनीयन या दोघांच्या बटबटीत आणि बेंगरूळ निर्मितीपेक्षा नात्झी पक्षाची या बाबतीतील निर्मिती ही कीतीतरी चांगली आणि वरच्या दर्जाची होती. नवे तंत्रविज्ञान हिटलरला भुरळ पाडी. नव्या तंत्रज्ञानाचा उपयोग आपल्या कार्यासाठी करून घेण्यात हिटलरने फारच मोठे कौशल्य प्रकट केले होते. त्या काळी दूरध्वनीक्षेपक नुकतेच प्रचारात येत होते. विजेऱ्याच्या साहाय्याने टाकावयाचे प्रचंड ताकदीचे प्रकाशझोतही त्याचवेळी नुकतेच तयार होऊ लागले होते. हिटलरने ह्या दोन्हींच्या साहाय्याने न्यूरेंगबर्ग येथे पहिला 'ध्वनी आणि प्रकाश' या नावाने अलिकडे ओळखल्या जाणाऱ्या भव्य देखाव्याची निर्मिती केली. त्याने पहिल्या मोटर हायवेज बांधल्या. फोकसवॅगनला (जनतेची गाडी) प्रोत्साहन दिले. या दोन्ही उपक्रमात त्याचा आधुनिक दृष्टिकोन जसा दिसतो. तसेच त्यास "लौकिक असे आवाहन" कसे प्राप्त होईल याकडे त्याने पुरवलेले लक्षही दिसून येते.

तंत्रविज्ञानाची आवड आणि कलेबद्दलची आत्मीयता यांच्या मदतीने पक्षासाठी हिटलरने काय केले याची माहिती वर येऊन गेलीच आहे. त्या शिवाय हिटलर आणि त्याचे शिष्य यांनी संघटनात्मक पातळीवर अनेक महत्त्वाच्या गोष्टी केल्या. तसेच पक्षसंघटना मजबूत करण्यासाठी, तिचा प्रसार व्हावा यासाठी संघटनात्मक पातळीवर अनेक महत्त्वाच्या गोष्टी केल्या. तसेच पक्षसंघटना मजबूत करण्यासाठी, तिचा प्रसार व्हावा यासाठी संघटनात्मक पातळीवर काय करणे आवश्यक आहे याचा अंदाज बांधून

ते सर्व अंदाज फक्त संकल्पाच्या पातळीवर न ठेवता ते सर्व प्रत्यक्ष कार्यवाहीत आणले. त्यांनी जर्मनीत अनेक प्रकारची मंडळे व गट निर्माण केले. या मंडळात आणि गटात तरुण आणि तरुणी या सर्वांना प्रवेश असे. प्रत्येक वयोगटासाठी वेगवेगळे मंडळ व गट होते. तसेच अनेक ज्ञानशाखा, करमणुकीचे प्रकार, छंद या प्रत्येकासाठी वेगळी मंडळे व गट स्थापलेले होते. नात्झींचा म्हणून जो जीवनविषयक दृष्टिकोन होता त्यात लाखोंनी सहभागी व्हावे हा हेतू ती मंडळे व गट स्थापण्यामागे होता. हिटलरनेच त्या गटाचे आणि मंडळाचे उद्दिष्ट जाहीर केले होते. "लोकांचे सामाजीकरण" (Socialising people). मार्क्सवाद्यांच्या 'उत्पादनाचे सामाजीकरण' या विध्वसंक अशा उद्दिष्टापेक्षा हे उद्दिष्ट विधायक आहे असे त्याचे म्हणणे होते. त्या चळवळीत सहभागी झालेले असंख्य जर्मन हे नात्झीपक्षाचे सभासदही नव्हते.

हिटलर सत्तेवर येण्यापूर्वी ते नात्झीपक्षाचे सभासद झाले नाहीतच. हिटलर सत्तेवर आल्यानंतरही ते सभासद झालेच असेही नाही. हे जरी सत्य असले तरी नात्झीपक्ष हा एक प्रचंड राजकीय पक्ष होता याचाही विसर पडू देता कामा नये. नात्झीवाद आणि कम्युनिझम या दोघात एक महत्त्वाचा फरक आहे. 'उठाव' करून दोघांनीही सत्ता हस्तगत केली हे खरे; तथापी सुरुवातीला लेनिनचा पक्ष हा नात्झीपक्षाशी तुलना करता अगदी छोटा पक्ष होता. लेनिन–ट्रॉटस्कीनी सत्ता हस्तगत केल्यानंतर कम्युनिस्ट पक्ष हाच मुळी 'सरकार' होता. सरकारच्या हाती जी सत्ता असते आणि त्यातून जे फायदे मिळतात, ते प्राप्त करून घेण्यासाठी अनेक स्त्रीपुरुषांनी कम्युनिस्ट पक्षाचे सदस्यत्व पत्करले. या सर्व संधिसाधू माणसांतून हळुहळू एक प्रस्थापितांचा असा प्रचंड वर्ग व पक्ष तयार झाला. परंतु त्यास जनतेचा पक्ष कधीच म्हणता आले नसते. झारच्या रशियातही उमरावांचा वर्ग होता. त्या वर्गाने रशियन राज्यकारभारात एक विशिष्ट प्रकारची भूमिका नेहमीच वठवली होती. कम्युनिस्ट पक्षातील प्रस्थापितांची राज्यकारभारात तीच उमरावी भूमिका होती. कांकणभरही वेगळी नव्हती. कम्युनिस्ट पक्षातील प्रस्थापितांचा वर्ग हा झारशाहीतील उमराववर्गा इतकाच संख्येने मोठा होता. त्याचे अधिकारही झारच्या उमरावीवर्गासारखेच होते. या आणि दुसऱ्या अनेक धोरणामुळे रशियन कम्युनिस्ट पक्षाला निवडणुकीत जबरदस्त अपयश प्राप्त झाले होते. बोल्शेव्हिकांच्या राजवटीत दुसऱ्या अनेक पक्षांना भाग घेता येईल अशा फक्त दोनच निवडणुका त्या मानाने खुल्या व स्वतंत्र अशा वातावरणात झाल्या. पहिले लोकशाहीनियुक्त पंतप्रधान केरेन्सकी यांनी 'घटना समिती' निवडण्यासाठी निवडणूक आयोजित केली होती. ही 'घटना समिती" झारशाही गेल्यानंतर येणाऱ्या रशियन राज्यव्यवस्थेची घटना तयार करणार होती. या घटना समितीच्या निवडणुका १९१७ सालच्या १२–२४ नोव्हेंबर रोजी झाल्या. लेनिनच्या बोल्शेव्हिक पक्षाचा सोशल रेव्होल्युशनरी पक्षाने जबरदस्त पराभव केला. या सोशल रेव्होल्युशनरी पक्षात शेतकरी वर्गातील लोक मोठ्या प्रमाणात होते. या पक्षाला ७०७ जागापैकी ४१० जागा मिळाल्या. या निवडणुकीत झालेल्या मतदानाचे आकडे अजूनही जाहीर झालेले नाहीत.

त्याबद्दल कोणत्याही मार्क्सवाद्याने आजवर तक्रार केलेली नाही. (भाई श्रीनिवास सरदेसाई, आता सांगत आहेत की रशियन कम्युनिस्टांनी त्यांना खोटे सांगितले. त्यांचीही याबाबत तक्रार नाही. कम्युनिस्ट पक्षातील चाणक्य भाई डांगे त्याबद्दल काही बोलत नसत. मग सामान्यापासून, अतिसामान्य सहप्रवाशांबद्दल तर बोलायलाच नको.) ते आकडे जर जाहीर झाले, तर त्यांच्या अभ्यासानंतर १९१७ च्या निवडणुकीवर आणखी विदारक प्रकाश पडेल. लेनिनने या निवडून आलेल्या घटनासमितीची बैठक भरताच, त्याच क्षणी पाशवी बळाचा वापर करून घटनासमितीस कुलूप ठोकले. या लेनिनच्या कृत्याचे 'व्यवहारी' माणसाला आश्चर्य वाटणार नाही. या व्यवहारी माणसांना फक्त सत्तेच्या राजकारणाचे गणित पाठ असते. म्हणूनच त्यांना लेनिनच्या या दडपशाहीचे आश्चर्य वाटणार. ते म्हणतील चालायचच ते. लेनिनला आपण निवडणुकीत प्रचंड मार खाल्ला आहे व त्याचा अर्थ काय हे त्याला चांगले ठाऊक असल्याकारणानेच लेनिनने घटनासमितीला कुलूप लावण्याचे काम अगदी जलदीने केले.

त्या मानाने स्वतंत्र खुल्या वातावरणात झालेली व अनेक पक्ष सहभागी होऊ शकले अशी दुसरी निवडणूक १९९१ च्या जून महिन्यात झाली. या निवडणुकीतही रशियन कम्युनिस्टपक्षाचा अगदी दारूण असा पराभव झाला. लेनिनच्या बोलशेव्हिक पक्षाच्या दारूण पराभवापेक्षाही अधिक दारूण असा. या निवडणुकीत झालेल्या एकूण मतापैकी फक्त १५% मते कम्युनिस्ट पक्षाला मिळाली. रशियन निवडणुकीत मतदानाचे आकडे आणि जर्मन निवडणुकीतील मतदानाच्या आकड्यांची तुलना करताना काही ठोस असे निष्कर्ष निघतात. लेनिनच्या पक्षाला सुमारे फारतर २६% आणि रशियन कम्युनिस्ट पक्षाला १६% मते मिळाली होती. या उलट नात्झी पक्षाला ४३ टक्के मते मिळाली होती. याचा अर्थ लेनिनच्या बोल्शेव्हिकपक्षापेक्षा व रशियन कम्युनिस्टपक्षापेक्षा हिटलरचा नात्झी पक्ष हा जनतेपर्यंत अधिक प्रमाणात पोहोचला होता, हे अगदी उघड व स्पष्ट आहे. लेनिनचा पक्ष वाढला तो लेनिन सत्तेवर आल्यानंतर. हिटलर सत्तेवर येण्यापूर्वीच कितीतरी अगोदर, हिटलरने एक प्रचंड असा जनता पक्ष निर्माण केला होता. १९२८ सालच्या ऑक्टोबर महिन्यापासून, १९२९ च्या सप्टेंबर महिन्यापर्यंत नात्झीपक्षाची सदस्यसंख्या १ लाखावरून दीड लाखावर गेली. १९३० साली हा आकडा २ लाखावर गेला. १९३२ च्या अखेरीस हीच सभासदसंख्या ८ लाखांहून अधिक होती. हिटलरने स्वतंत्र व खुल्या वातावरणात झालेल्या निवडणुकात, आपल्याकडे प्रचंड प्रमाणात मते खेचण्यात यशस्वी झाला. त्याचे कारण एकच. नात्झीपक्षाची झालेली ही प्रचंड वाढ. १९२८ च्या ऑक्टोबरपासून १९२३ च्या नोव्हेंबर डिसेंबरपर्यंत नात्झीपक्ष आठपटीने वाढला आणि जर्मन इतिहासात तोवर तरी दुसऱ्या कोणत्याही राजकीयपक्षाने इतके झपाट्याने वाढलेले आणि प्रचंड असे संघटन उभारण्यात यश मिळविले नव्हते.

जर्मन जनतेचा उत्स्फूर्त व स्वयंसेवी पाठिंबा मिळवण्याचे श्रेय हिटलरला होतेच. त्याला जोड म्हणून हिटलरच्या नेतृत्त्वाखालील सरकारने जर्मन अर्थव्यवस्थेचा



अनुक्रमणिका

कारभार यशस्वी रीतीने चालविला. त्यामुळे हिटलरपाशी असलेल्या कौशल्याला अधिक हातभार लागला. म्हणूनच जर्मन जनतेचा उत्स्फूर्त व स्वयंसेवी पाठिंबा मिळवणे हिटलरला सहज शक्य झाले. या ठिकाणी रशियातील 'मार्क्सवादी समाजवाद' आणि जर्मनीतील हिटलरचा 'राष्ट्रीय समाजवाद' या दोघांच्यातील तुलना मोठी उद्‌बोधक ठरेल. हिटलर ही एक अत्यंत विध्वसंक प्रवृत्तीची व्यक्ती होती, याबद्दल तिळमात्र शंका नाही. परंतु ह्या बाबतीत तो खासच विध्वसंक नव्हता. खास करून लेनिन आणि स्टॅलिन या दोघांशी तुलना करता, हे हिटलरचे वैशिष्ट्य मोठे उठून दिसते. एकदा 'आहेरे' बुर्झ्वावर्गाची मालमत्ता जप्त केल्यानंतर समाजाचे चलनवलन कसे करायचे, त्याचे साधन (हत्यार) कोणते, आणि या साधनाने नजिक आणि दूरच्या काळात कोठची धोरणविषयक पावले उचलावयाची याबद्दल मार्क्सवादाने कोणतीही योजना वा सूत्र सांगितले नव्हते. लेनिनने प्रथम साधन (हत्यार) घडविले. बिनीच्या स्थानावर असलेला कम्युनिस्टपक्ष हे ते हत्यार. परंतु लेनिनने हत्यार घडविले तरी त्याच्याजवळ काहीही धोरण नव्हते. हाती सत्ता घेतल्यानंतर लेनिनच्या या धोरणास त्याकाळी "युद्धजन्य परिस्थितीतील साम्यवाद" (War Communism) हे नाव प्राप्त झाले होते. त्या धोरणाची भूरळ पडली. हे धोरण – युद्धजन्य परिस्थितीतील साम्यवाद — प्रथम १९१७ साली जर्मन सेनापती लुडेनडोर्फ यांनी अमलात आणले होते. पहिल्या महायुद्धाच्या काळात, सैनिकी उत्पादन वाढविण्याची अत्यंत निकड जर्मनीलाच होती. त्यासाठी अनेक मार्ग व धोरणे यांची तपासणी होत होती. सरतेशेवटी अगदी घायकुतीला येऊन, लुडेनडोर्फ यांनी युध्यजन्य परिस्थितीतील साम्यवाद — हेच धोरण अमलात आणले. या धोरणानुसार मध्यवर्ती सत्तेने अर्थव्यवस्थेच्या मार्गदर्शनाची सर्वपक्षाची सूत्रे जवळजवळ आपल्या हाती घेतली होती. लेनिनला त्याच वेळी आणखीही एका ग्रंथाने आकर्षित केले होते. त्या ग्रंथाचे नाव 'देर झुकुन्फस्टाड' (DER ZUKUNPSTAAD) (युटोपिया – भविष्य काळातील रामराज्य). एवंच लेनिनकडे आर्थिक धोरण असे काही नव्हते. जे होते ते त्याने तयार केलेल्या घोषणेद्वारा व्यक्त झाले होते. "सोव्हियत सत्ता अधिक अखिल रशियाचे विद्युतीकरण म्हणजे साम्यवाद. या घोषणेद्वारा लेनिन आपल्याला अभिप्रेत असलेला युद्धजन्य परिस्थितीतील साम्यवाद म्हणजे काय ते सांगत होता. परंतु हे सारे करीत असताना लेनिनने एका प्रमुख गोष्टीकडे दुर्लक्ष केले. एकतर सेनापती लुडेनडोर्फ यांनी जर्मन उद्योगधंदे जप्त केले नव्हते. लुडेनडोर्फ फक्त या उद्योगधंद्यानी काय केले पाहिजे यासंबंधी हुकूम देत होता. १९१७ सालच्या क्रांतीपूर्व रशियात, उद्योगधंद्याचे क्षेत्र पश्चिम युरोपशी तुलना करता तसे विस्तीर्ण होते असे नाही. पण जे होते ते झपाट्याने वाढत असलेले आणि आपणास उज्ज्वल भविष्यकाळ आहे असा विश्वास निर्माण करणारे होते. परंतु हे रशियन उद्योगधंदे चालविणारे उपक्रमशील असे नेतृत्त्व – यात प्रामुख्याने ज्यू आर्मेनियन आणि मूळ जर्मनीतून आलेल्या व रशियात स्थाईक झालेले जर्मन या सर्वांचा भरणा अधिक करून होता – लेनिनने पार निकालात काढले. या

नेतृत्त्वाची लेनिनने अगदी ससेहोलपट केली. याच नेतृत्त्वाने १९१७ सालापूर्वीच्या क्रांतीपूर्व–रशियातील उद्योगधंद्याची उभारणी केली होती. व ते कार्यक्षमपद्धतीने चालविले होते. या नायनाट केलेल्या व देशोधडीला लावलेल्या वर्गाच्या जागी लेनिनने अत्यंत अकार्यक्षम असे नेतृत्त्व आणले. हे नेतृत्त्व सुरुवातीपासूनच अकार्यक्षम व कमालीची उधळमाधळ करणारे होते. लेनिनच्या अपयशाला स्टॅलिनने फारच मोठ्या प्रमाणात हातभार लावला, इतकेच नव्हे तर त्यात प्रचंड प्रमाणात भर टाकली. लेनिन फक्त उद्योगधंद्यांचा नाश करून थांबला. स्टॅलिनने आणखी एक पाऊल पुढे टाकले. शेतीव्यवसायावर आणि शेतकरी वर्गावर स्टॅलिनने वरवंटा फिरवला. स्टॅलिनने रशियातील अत्यंत कुशल व कार्यक्षम शेतकऱ्यांचे खून केले. त्यांची उपासमार केली आणि त्यांची सर्व मालमत्ता जप्त केली. डॉ. रार्बर्ट कॉन्क्वेस्ट यांच्या 'दि ग्रेट टेरर'–हा ग्रंथ आता रशियातही प्रमाण ग्रंथ मानतात–या ग्रंथात स्टॅलिनी हुकूमशाहीचे अत्यंत तपशीलवार असे वर्णन आढळेल. जिज्ञासूंनी मूळ ग्रंथच वाचावा. (पं. नेहरू ज्यास शांतीदूत म्हणत त्या) स्टॅलिनने केलेल्या शेतीक्षेत्रातील प्रचंड मानवी हत्याकांडाने रशियाची एवढी जबरदस्त हानी झाली की त्यातून रशिया १९९२ साल उजाडले तरी वर आलेला नाही. शेतीव्यवसायाची उत्तम जाण असलेले उपक्रमशील असे सारेच शेतकरी स्टॅलिनने नाहीसे केले. रशियासमोर असलेल्या अनेक जटिल समस्यात रशियन नागरिकांना पुरेसा अन्न-धान्य पुरवठा ही सर्वात प्रमुख अशी समस्या आहे. स्टलिनच्या पुरोगामी धोरणाचे हे फक्त (एकेकाळी अन्न-धान्य आयात करणारा भांडवलशाही भारत, कम्युनिस्ट चाणक्य–डांगे आणि भाई सरदेसाई यांना आपले आयुष्यभर नंदनवन मानलेल्या 'समाजवादी' रशियास धान्य पुरवीत आहे असे आजच्या जगास बघायला मिळाले. ही खऱ्या अर्थाने स्टॅलिनची सरदेसायांवर कृपा).

१९१४ साली रशियन जनतेचे जीवनमान पश्चिम युरोपशी तुलना करता उंचावरचे नव्हते. परंतु तो एक विकासनशील देश होता व म्हणूनच त्या देशाची परिस्थिती बरी होती. समाजवादी रशियात जेवढे मांस दरडोइ होते, त्यापेक्षा जास्त मांस रशियन जनतेला मिळत होते. यावरून झारकालीन रशियाच्या त्यामानाने सुबत्तेची कल्पना येईल. परंतु १९१७ च्या आक्टोबर क्रांतीनंतर रशियात राज्यावर आलेल्या कोणत्याही कम्युनिस्ट राजवटीला आपल्या अस्तित्त्वातील कोणत्याही काळी १९१४ ची जीवनपातळी गाठता आलेली नाही. रशियन राजवट आणि समाज, ही इतकी जुलूम-जबदस्ती करणारी का झाली याचे उत्तर या कारणातच आहे. हिटलरच्या जर्मनीत जर्मनीचे जीवनमान उंचावले होते. हिटलरचा राष्ट्रीय समाजवाद आणि लेनिन-स्टॅलिनचा मार्क्सवादी समाजवाद यांच्यातील आणखी एका फरकाकडे लक्ष वेधता येते. लेनिनने गुप्त पोलिसांच्या संघटनेची–चेधा हे तिचे नाव–निर्मिती ७ डिसेंबर १९१७ रोजी केली. लेनिनने सत्ता बळकाविल्यानंतर काही थोड्या आठवड्यांच्या आतच या संघटनेची निर्मिती झाली हे लक्षात ठेवले पाहिजे. त्यानंतर रशियात अनेक वर्षे सातत्याने अनेक प्रकारच्या श्रमछावण्यांची (Concentration Camps) निर्मिती एकसारखी होतच होती. १९१८

च्या जानेवारी महिन्यात पहिल्या श्रमछावणीची स्थापना झाली. १९२० ते ३० च्या दरम्यान त्या श्रमछावण्यांच्या संख्येत एकसारखी वाढ होतच होती. १९३० साली स्टॅलिनने ६ लाख लोकांची रवानगी या छावण्यात केली होती. १९३१-३२ साली या आकड्याने २० लाखाच्या घरात हनुमान उडी घेतली. (स्टॅलिनची माओप्रणित Great Leap Forword). प्रख्यात लेखक सोल्झेनित्सिन यांनी या श्रमछावणीतील वातावरणाचे साग्रसंगीत वर्णन करणारा गुलागआर्चिपेलॅगो या नावाचा प्रचंड ग्रंथ चार खंडातून लिहिला आहे. डॉ. रॉबर्ट कान्क्वेस्ट यांच्या ग्रंथाचा उल्लेख वर झाला आहेच. त्यांनी जी माणसे श्रमछावण्यात मृत्युमुखी पडली, प्रत्यक्ष तुरुंगात होती, या सर्वांचा मागे केलेला हिशेब आता चुकीचा ठरला आहे. पूर्वी डॉ. कॉन्क्वेस्ट यांनी हा आकडा दोन कोटी दिला होता. नुकतीच रशियन सरकारच्या दप्तरखान्यातून जी नवी माहिती बाहेर आली आहे, त्यानुसार हा आकडा दोन कोटीपेक्षा कितीतरी जास्त आहे, असे रशियन लेखकांचे म्हणणे आहे. या एका क्षेत्रात मुसलोनीच्या फॅसिस्टाकडून धडे घेण्याऐवजी लेनिन-स्टॅलिन या मार्क्सवाद्यांकडून हिटलरने धडे घेतले होते. हिटलरचे या बाबतीतील मार्क्सवाद्यांचे शिष्यत्त्व वादातीत आहे. मुसलोनीनेही गुप्त पोलीसांची संघटना स्थापन केली होती. तोही वेळप्रसंगी लोकांचे खून पाडीत होता. अनेक विरोधकांची रवानगी त्याने तुरुंगात केली होती. हे सारे जरी सत्य असले तरीही मुसलोनीची दडपशाही ही जुन्यापुराण्या राजघराण्याच्या दडपशाहीशी मिळतीजुळती होती. नव्या साम्यवादी तानाशाहीच्या दडपशाहीने मुसलोनीच्या फॅसिस्ट दडपशाहीला केव्हाच मागे टाकले होते. हिटलरचे वागणे, धोरण, मुसलोनी-लेनिन-स्टॅलिन या सर्वांपेक्षा वेगळे होते. हिटलरने सत्तेवर येण्या अगोदर कितीतरी दिवस आधी Storm Trooper–झंझावाती सैनिक–या संघटनेची स्थापना केली होती. या संघटनेचा तोंडावळा लेनिनच्या चेका या संघटनेसारखाच होता. हिटलर हे सारे बुद्धीपुरस्सर करीत होता. एकदा सत्तेवर आल्यानंतर चार आठवडे पुरे होण्याअगोदरच त्याने पहिला वटहुकूम जारी केला. या वटहुकुमानुसार कोणत्याही व्यक्तीची रवानगी संरक्षित कोठडीत करण्यात येई. लगेच हिटलरने पहिली श्रमछावणी (डाचाउ) निर्माण केली. हे साध्य करण्यास हिटलरला फक्त सात आठवडे लागले. या कामाला लेनिनला किमान बारा आठवडे लागले होते. हिटलर लेनिनचा तसा हुषारच शिष्य होता, यावद्दलही आता संशय उरलेला नाही. नात्झी आणि सोव्हियट गुप्त पोलिस नियमित संपर्क ठेवून होते. ते एकमेकांना हवी असलेली माहिती पुरवीत. काही काळानंतर कैद्यांची देवाणघेवाणही होउ लागली. आणखीही एक मुद्दा या ठिकाणी लक्षात घेतला पाहिजे. व्हर्साय तहाने जर्मनीवर काही सैनिकी अटी लादण्यात आल्या होत्या. त्या चुकविण्यासाठी प्रथम लेनिनने जर्मनीला व मागाहून स्टॅलिनने हिटलरला मदत केली. या पडद्याआड होत असलेल्या गुप्त हालचालींची **व्याप्ती** आणि तिची **प्रकृती** अजूनही तितकीशी स्पष्ट झालेली नाही. अनेक बाबतीत ती आजवर गुप्त ठेवण्यात आली आहे. त्या हालचालीतील, माहितीतील गुढे अजूनही गुढेच राहिली आहेत. कालांतराने रशियन

सरकार आपले दप्तरखाने अभ्यासकास सध्या आहे त्याहूनही अधिक प्रमाणात उपलब्ध करून देईल तेव्हा या गुप्त हालचालींची व्याप्ती, प्रकृती आणि इतर अनेक सध्या गूढ असलेल्या गोष्टी स्पष्ट होतील व मग त्यांच्या यथार्थ स्वरूपाचे ज्ञान सर्व जगास होईल. तथापी या देवाणघेवाणीबद्दल मात्र आज कोणासही (अर्थात पूर्वीचे कम्युनिस्ट, त्यांचे सहप्रवासी आणि तथाकथित स्वतंत्र मार्क्सवादी – यांत पूर्वी प्रा. न. र. फाटकांचाही समावेश होत असे वगळता – कोणासही संशय राहिलेला नाही.)

दडपशाही करण्यासाठी आवश्यक असलेली सर्वप्रकारची सर्वंकष सत्ता हिटलरकडे होती हेही अगदी स्पष्ट आहे. परंतु युध्द चालू नव्हते तेव्हा शांततेच्या काळी हिटलरने या पाशवी सत्तेचा त्यामानाने फारच थोडा उपयोग केला. एकदा युद्ध चालू झाल्यानंतर हिटलरचे क्रौर्य फारच उफाळून वरती आले. मग शांतता होती तोवर स्टॅलिनशी तुलना करता तो मवाळ का वरे वाटतो. त्याचे एक स्पष्टीकरण असे आहे की, हिटलरला त्या सत्तेचा वापर करण्याची जरूरीच नव्हती. हिटरल व स्टॅलिन यांच्यातील तोच महत्त्वाचा फरक आहे. आपल्या विरुद्ध होत असलेले 'कट' आणि 'विरोधक' यांचा 'शोध' लावणे अगदी आवश्यकच आहे असे हिटलरला कधीच वाटले आही. हे असे असण्याचे कारण, त्या दोघांचा उदय वेगवेगळ्या प्रकारच्या सामाजिक प्रक्रियेतून झाला होता यात. जनतेचा पाठिंवा आणि निष्ठा प्राप्त करून घेण्यासाठी तसे घडावे. जनतेच्या मनात त्या प्रकारची भावना निर्माण व्हावी. यासाठी जनतेस स्फूर्ती यावी म्हणून काय करावे लागते हेही हिटलरला चांगलेच माहीत होते. शिवाय त्याच्या आवाक्यातही ते होते. स्टॅलिनचा उदय व त्याने सत्तेवर येणे हे अगदी वेगळ्याच प्रक्रियेतून झाले. प्रत्येक संघटनेत अधिकारानुसार शिडी व उतरंड असते. तशी बोल्शेव्हिक पक्षातही होती. पक्षात अधिकारावर असलेल्या नेत्यांचा एक वेगळाच गट तयार होतो. या अशा वेचक नेत्यांच्या गटात कटकारस्थाने करून, हिकमती डावपेच व व्यूव्हरचना करून, वेळप्रसंगी विश्वासघाताचा अवलंब करून स्टॅलिनचा उदय झाला व कालांतराने पक्षात तो सत्ताधीश वनला. स्टॅलिनच्या सहकाऱ्यांनी त्याला सहकार्य देऊ केले, त्याच्यावर पूर्ण विश्वास टाकला,तरी सहकाऱ्यांबद्दल स्टॅलिन नेहमीच साशंक असे. त्याने त्या "स्वामीभक्तीचा" कधीही स्वीकार केला नाही. तसेच आमजनतेतही आपण लोकप्रिय आहोत यावरही त्याचा विश्वास नव्हता. या दोन्ही गोष्टी महत्त्वाच्या आहेत. स्टॅलिनच्या या साशंकवृत्तीचे तपशीलवार वर्णन ग्रंथकार बुलक यांनी केले आहे. तपशील अगदी बारीक सारीक घटनांची नोंद घेऊन करण्यात आला आहे. त्या वर्णनात कसलीही अतिशयोक्ती नाही. अगदी यथार्थ असेच ते आहे. या अविश्वासामुळे स्टॅलिनला आपल्या सहकाऱ्यांची तुरुंगात रवानगी करणे, त्यांचे खून करणे, इत्यादी मार्गाचा अवलंब करून त्याला राज्य करावे लागले. बोल्शेव्हिक पक्षातील सर्वोच्च पदावर असलेल्या नेत्यांपासून तो पक्षातील अगदी शेवटच्या पायरीवर उभ्या असलेल्या सामान्य कार्यकर्त्यांपर्यंत सारेच भिऊन आहेत असे स्टॅलिनला आढळले की त्याचा आत्मविश्वास वाढे. स्टॅलिनने आपल्या खऱ्याखुऱ्या आणि काल्पनिक शत्रूंना जे

वागविले त्यात हिटलरने अत्यंत महत्त्वपूर्ण अशी कामगिरी बजावली आहे, याबद्दल आता कसलीही शंका राहिलेली नाही. १९३४ साली हिटलरने अत्यंत नाखुषीने एक निर्णय घेतला. तो निर्णय म्हणजे आपल्या सहकाऱ्यांचा नि:पात करणे. अर्नस्ट रोएहम हा त्याचा सहकारी आणि एस. ए. संघटनेत नेतृत्त्वापदी असलेले हिटलरचे सहकारी यांचा खून करण्याचे हिटरलने ठरविले. हा निर्णय घेण्याला हिटलरला अंतर्गत आणि बहिर्गत अशी अनेक कारणे होती. अंतर्गत याचा अर्थ पक्षांतर्गत. येथे जर्मनी या देशाचा काहीही संबंध नव्हता. 'हा क्रूर असा निर्णय घेतल्यानंतर त्यानुसार ठोस कृतीही केली. १९३४ च्या ३० जून पासून जुलै २ पर्यंत हिटलरने अनेक सहकाऱ्यांचे-विरोधकांचे अक्षरश: खून पाडले. मानवी मनाला किळस येईल, धक्कादायक वाटेल इतक्या निष्ठुरतेने. या सर्व घडामोडींचा स्टॅलिनवर अर्थातच परिणाम झाला व त्याची छापही उमटली.

या सर्व घडामोडीतील एका गोष्टीने स्टॅलिनवर कमालीची छाप टाकली. ती गोष्ट म्हणजे हिटरलची कमालीची बिनधास्त निष्ठुरता. तसेच त्या हिटलरी निष्ठुरतेला कसलाही विरोध झाला नाही. त्याबद्दल साधा विसंवादी असा एकही सूर उमटला नाही. त्या उलट त्या निष्ठुरतेला नाझिपक्षाने, जर्मनीतील प्रस्थापित वर्गाने, सामान्य जर्मन जनतेने आणि सर्वात महत्त्वाचे म्हणजे आंतरराष्ट्रीय लोकमत या सर्वांनी संमती दर्शवली होती. या सर्वांचा – हा जो हिटलरला सर्वत्र पाठिंबा मिळाला, विरोध झाला नाही, या परिणामांची स्टॅलिनने खास करून नोंद घेतली होती. हे सारे पाहिल्यानंतर स्टॅलिनने हिटलरच्या वागणुकीचे अनुसरण करावयाचे ठरविले. स्टॅलिनला अत्यंत धोकादायक प्रतिस्पर्धी आपणास कोण आहे असे वाटत असेल तर तो किरॉव्ह. म्हणूनच त्याचा १ डिसेंबर १९३४ रोजी खून करण्यात आला. त्या खुनाचा कट अत्यंत काळजीपूर्वक करण्यात आला होता. त्याचे नियोजन अगदी पक्के असेच होते. या खुनातूनच ज्या 'पक्ष-शुद्धीकरणास अत्यंत राक्षसी स्वरूपाची शुद्धिकरणे मानले जाते. त्यास सुरुवात झाली या खुनातून जे खटले उभे राहिले त्याचे कारण ते खटले हेच या राक्षसी पक्ष शुद्धीकरणास मिळाले. ही तथाकथित पक्षशुद्धीकरणे स्टॅलिनच्या मृत्यूपर्यंत म्हणजे १९५३ सालपर्यंत सातत्याने चालू होती. याचा अर्थ या सर्व वर्षात रोज कोणाला तरी यमसदनाला–अर्थात रशियन कम्युनिस्ट पक्षाच्या, अंतिमत: सोव्हियत जनतेच्या भल्यासाठी (सरते शेवटी भाई डांगे, भाई सरदेसाई, प्रा. न. र. फाटक यांना अभिप्रेत असलेल्या पृथ्वीवरील नंदनवनाच्या प्रस्थापनेसाठी) पाठविले जात होते असे नाही. काही वेळा दररोज, काही वेळा आठवड्यानंतर, तर कधी एखाद्या महिन्याच्या अवधीनंतर स्टॅलिन नावाच्या बकासुराला त्याचे बळी सोव्हियत समाजाने पोहोचविणे भागच होते. अगदी आंतरराष्ट्रीय कम्युनिस्ट आणि त्यांचे सहप्रवासी यांच्या टाळ्यांच्या गजरात. (भारतात आणिबाणी आल्यानंतर भाई डांगे यांनी हे टाळ्या वाजविण्याचे काम चालू ठेवले होते. जयपूरची महाराणी आणि ग्वाल्हेरच्या राणीसाहेब या तुरुंगात गेल्या ही त्यांच्या दृष्टीने आणीबाणीची मोठीच कमाई.)

हिटलरला आपल्या राजवटीची पहिली कित्येक वर्षे 'भीती' व 'दहशत' ह्या गोष्टींवर कधीही अवलंबून राहावे लागले नाही. त्याच्या राजवटीची संध्याकाळ येईपर्यंत ही परिस्थिती कायम होती. त्या शेवटच्या वर्षात मात्र हिटलर 'भीती व दहशत' या भावनेचा उपयोग राज्य करण्यासाठी म्हणून करू लागला. हिटलरचा आपल्या ज्येष्ठ अशा बहुतेक सहकाऱ्यांवर पूर्ण विश्वास होता. अनेक प्रकारचे व अनेक क्षेत्रातले, फार वरच्या थराचे अधिकार त्याने त्यांच्याकडे सुपूर्द केले होते. हिटलरने हा जो आपल्या सहकाऱ्यांवर विश्वास टाकला, त्यांच्याकडे हे अधिकार सोपविले त्याबद्दलची कृतज्ञता त्या सहकाऱ्यांनी आपल्या स्वामीनिष्ठेच्या द्वारा प्रकट केली होती. हिटलरने आपल्या सहकाऱ्यांवर जो विश्वास टाकला होता त्याचे एकप्रकारे ही स्वामीनिष्ठा हे हिटलरला मिळालेले पारितोषिक होते. हिटलर सत्तेवर येण्यापूर्वीच्या काळात जर्मन समाजवादी पक्ष आणि कम्युनिस्ट पक्ष हे दोन्हीही पक्ष अत्यंत प्रबळ व संघटीत असे पक्ष होते. हिटलर राज्यावर आल्यानंतर थोड्याच दिवसात या दोन्ही पक्षाचे जवळजवळ विघटन झाले. त्या पक्षातील अनेक सदस्यांना नात्झी राज्यपद्धतीत सामावून घेण्यात आले. अनेक हिटलरविरोधकांनी आणि बुद्धीजीवी वर्गातील लोकांनी जर्मनी हा देश सोडून अन्य देशात स्थलांतर केले. जर्मनीत यापैकी जे मागे राहिले, त्यांच्यापैकी काहींचा खून करण्यात आला, तर काहींची रवानगी तुरुंगात झाली. हिटलरची राजवट ही 'लोकप्रिय' राजवट होती. जर्मनीतील बहुसंख्य जर्मनांना ती पसंत होती. या वस्तुस्थितीचे हिटलरच्या टीकाकारांना फारच वैषम्य वाटते. हिटलरची राजवट जनतेला मान्य असण्याची प्रामुख्याने दोन कारणे. १) जर्मन अर्थव्यवस्थेस पुनरुज्जीवन प्राप्त झाले. २) जर्मनीतील बेकारी झपाट्याने कमी झाली. हिटलरचे आर्थिक धोरणही लुडेनडोर्फ यांच्या वॉर-सोशलिझम (युद्धजन्य समाजवाद) या ग्रंथावरच आधारलेले होते. लुडेनडोर्फ हे हिटलरचे मित्र व सहकारी. लक्षणीय मुद्दा हा की **लेनिनने देखील आपले आर्थिक धोरण 'वॉर-सोशालिझम' या ग्रंथावर आधारलेले होते.** नरंत लेनिन (आणि स्टॅलिनने देखिल) यांनी जी चूक केली ती चूक हिटरलने केली नाही. हिटलरने भांडवलदारांची संपत्ती व त्याजबरोबर त्यांची कार्यक्षमता जप्त केली नाही. लुडनडोर्फ यांनी दाखवलेल्या मार्गानुसारच जावयाचे म्हणजे भांडवल व भांडवलदारांबरोबर येणारी कार्यक्षमता ही दोन्ही जप्त करावीच लागतात हे हिटलरला मान्य नव्हते. १९३० सालचे हिटलरचे संभाषण प्रख्यात लेखक बुमाख यांनी आपल्या ग्रंथात समाविष्ट केले आहे. ते संभाषण हिटलरच्या अर्थविषयक धोरणावर फार जोरदार प्रकाशझोत टाकते. ओट्टो स्ट्रास्सर आणि हिटलर या दोघातील हे संभाषण आहे. ओट्टो स्ट्रासर हे भांडवलदारांच्या सर्व संपत्तीचे आणि त्यांच्या मालकीच्या साधनांचे राष्ट्रीयीकरण झाले पाहिजे या मताचे होते. हिटलरने त्यांना असे सांगितले की हो अशा प्रकारचे धोरणविषयक पाऊल टाकणे म्हणजे जर्मन अर्थव्यवस्थेचा विनाश ओढवून घेण्यासारखे आहे. जर्मन भांडवलदारांनी आपल्या कार्यक्षमतेच्या जोरावर समाजात सर्वात वरच्या क्षेत्रातील जागा मिळवण्यासाठी कष्ट केले आहेत, झगडा दिला आहे.

याचाच अर्थ नवीन समाजात हा जो वर्ग तयार झालेला आहे तो "नैसर्गिक निवड" या तत्त्वाला अनुसरूनच. त्यावरून या मानवी समाजातील ते वरच्या श्रेणीतील लोक आहेत हेच सिद्ध होते. ही वस्तुस्थिती आहे म्हणूनच या वर्गाला आर्थिक क्षेत्रात नेतृत्त्व करण्याचा अधिकार आहे. असे असले तरीही त्या वर्गाला जे सांगण्यात येईल तेच त्याने केले पाहिजे आणि जे उत्पादन करतील ते त्यांनी समाजाच्या स्वाधीन केले पाहिजे. या वर्गाने राष्ट्रहितासाठी आवश्यक आहे ती जरूर अशी कार्यवाही करण्यात जर कुचराई केली, तर मग – आणि फक्त त्या परिस्थितीतच – राष्ट्र हस्तक्षेप करील, एरवी नाही. परंतु हे धोरण कार्यवाहीत आणण्यासाठी भांडवलशाहीची काहीही आवश्यता नाही. त्यासाठी फक्त एकाच गोष्टींची आवश्यकता आहे. ती गोष्ट म्हणजे एका प्रवळ अशा राष्ट्राची. हिटलरच्या 'राष्ट्रीय समाजवादाचे' सार पुढील विचारात आहे. "भांडवलदाराला भीती दाखवली पाहिजे. तो त्या भीतीच्या दडपणाखाली असला पाहिजे आणि समाजातील इतर सर्वसामान्य नागरिकांप्रमाणे त्याने राष्ट्राचे हुकूम शिरोधार्थ मानले पाहिजेत हे नि:संशय."

स्टॅलिनच्या पहिल्या पंचवर्षीय योजनेचे यश (कारण पाच वर्षात पुरी व्हावयची योजना चार वर्षात पुरी झाली.) सर्वत्र जाहीर करण्यात आले होते. त्या तथाकथित यशाच्यामुळे अनेकांची दिशाभूल झाली. ह्यात हिटलर ही होता. त्याचा एक परिणाम झाला. तो म्हणजे हिटलरने १९३७ साली स्वत:ची अशी चौवर्षीय योजना जाहीर केली. हे करीत असताना त्याने एक अगदी गुप्त स्वरूपाचे टाचण आपल्या सहकाऱ्यात प्रसारित केले. त्या टाचणात ही चौवर्षीय योजना कोठच्या प्रकारच्या वातावरणात सिद्ध करावयाची आहे, त्याबद्दल लिहिले आहे. या चौवर्षीय योजनेवर कोणत्या प्रकारच्या 'धाकदपटशांचे' सावट पडलेले आहे, हेही हिटरलने स्पष्ट केले आहे. चौवर्षीय योजनांचा संकल्प कोणत्या परिस्थितीत सिद्ध करावयाचा यासंबंधी लिहिताना हिटलरने लिहिले, 'आपल्या एकंदर साधनसामुग्री'त सैनिकी विकासाची व्याप्ती ही फार मोठी असणेच शक्य नाही. इतर सर्व राष्ट्रीय उद्दिष्टे – यात कोणताही अपवाद असणार नाही – ही सैनिकी उद्दिष्टांची तुलना करता, खालच्या क्रमांकावर असली पाहिजेत. आर्थिक मंत्रालयाने राष्ट्रीय पातळीवरची आर्थिक उद्दिष्टे काय असली पाहिजेत हे ठरवून दिले आहे. आणि खाजगी उद्योगधंद्यांनी ती उद्दिष्टे पुरी करावयाची आहेत व कार्यवाहीत आणावयाची आहेत. खाजगी उद्योगधंद्यांना ही उद्दिष्टे सिद्ध करणे हे आपल्या आवाक्याबाहेरचे वाटत असेल तर राष्ट्रीय समाजवादी सरकारला हे प्रश्न कसे सोडवायचे याचे चांगले ज्ञान आहे. ......... जर्मनी नाहीसा होणार नाही. फारतर थोडेसे भांडवलदार व व्यापारी नाहीसे होतील.'

अशा रीतीने भांडवलशाही क्षेत्रातील उद्योजकांना हिटलरने त्यांची जागा दाखवून दिली होती. हिटलरचे आर्थिक धोरण हे दुसऱ्या महायुद्धोत्तर काळातील जाँ मोन्ने यांच्या फ्रान्समधील आर्थिक धोरणापाशी मिळतेजुळते आहे. 'दर्शक नियोजन' हे नाव (Indicative planning) फ्रान्समध्ये या आर्थिक धोरणास देण्यात आले होते. असे

जरी होते तरी हे धोरण यशस्वी होण्यास फार प्रचंड प्रमाणात आम जनतेला एका विशिष्ट शिस्तीत व चाकोरीत जखडून ठेवणे प्राप्त होते. सर्व जर्मनी व्यापून बसलेला आणि प्रचंड असा नात्झी पक्ष आणि त्या पक्षाच्या अनुषंगिक संघटना या सर्वांनाच ही जबाबदारी उचलून ती यशस्वीपणे पार पाडणे आवश्यक होते. त्यात ते सारे यशस्वी झालेही. दुसऱ्या महायुद्धोत्तर काळातले उदाहरण घ्यायचे झाल्यास जपान या राष्ट्राचे उदाहरण देता येईल. दुसऱ्या महायुद्धानंतर राष्ट्रीय उद्दीष्टांबद्दलची तीव्र जाण आम जपानी जनतेत देण्यात आली होती. हिटलरच्या जर्मनीत नात्झी पक्ष आणि पक्षाशी संलग्न असणाऱ्या संघटनानी ही जाण निर्माण करण्याचे काम केले. भांडवलदार आणि कामगार हे सारेच हिटलरवादाच्या विळख्यात जखडले गेले होते. यासंबधीचे एक उत्तम उदाहरण म्हणजे आय. बी. फारबेन ही कंपनी व या कंपनीची हिटलरने केलेली वाताहत. ही एक अत्यंत बलशाली, जगात सर्वांना माहीत असलेली, आपल्या धंद्याच्या क्षेत्रात कमालीचे प्राविण्य मिळवलेली, उदारमतवादी म्हणून सर्वांस ज्ञात असलेली कंपनी. हिटलरवादाची उद्दिष्टे अमलात आणणाऱ्या एका हुकुमी हत्यारात या कंपनीचे रूपांतर झाले होते. हिटलरी शासनापुढे या कंपनीने पार शरणागती पत्करली. सरतेशेवटी इतरांना जसा अखेरचा हिशेब चुकता करावा लागला, (Final solution) तसेच याही कंपनीचे झाले. ( जगातील सर्व ज्यूंचा संपूर्ण नाश करण्याच्या हिटलरी प्रक्रियेला हिटलरने FINAL Solution हे नाव दिले होते.) ते काहीही असो. जर्मनीने आंतरराष्ट्रीय स्तरावर जोवर निदान शांतता पाळली, तोवर हे हिटलरी धोरण कार्यक्षम ठरले होते. सर्व जर्मनीतील बेकारी नाहीशी झाली होती, सर्व जर्मनांना काम मिळाले होते; संप नव्हते; रस्त्यावर निदर्शने नव्हती; मारामाऱ्या नव्हत्या; विरोध पार निकालात निघाला होता. काही जर्मन – ह्यात काही जर्मन ज्यूंचाही समावेश होता – जे कोणी देशत्याग करून गेले होते, ते १९३५-३७ च्या सुमारास परत मायदेशी आले. बुमाख यांनी आपल्या ग्रंथात असे सांगितले आहे की १९३९ साली जर्मनीत फक्त १० हजार कैदी होते. त्यांच्यावर पहारा करण्यासाठी ४ हजार शिपाई होते. एकंदर तीन श्रमछावण्यात (Concentration Camps) या कैद्यांची विभागणी करण्यात आली होती. रशियन श्रमछावण्यातील कैद्यांशी या आकड्यांची तुलना केली असता या एकाच बाबतीत कम्युनिस्ट रशियाने केवढी प्रचंड आघाडी मारली होती हे वाचकांच्या ध्यानात येण्यास अडचण पडू नये.

१९२० सालानंतर लगेच जर्मनीत प्रचंड उलथापालथ झाली होती. तोवरच्या जर्मन इतिहासात जी आर्थिक मंदी अत्यंत प्रखर ठरली असती अशा आर्थिक मंदीतून जर्मनीस जावे लागले होते. या सर्व वेदना सहन करून हिटलरच्या काळात जर्मनी स्थिरावला होता. निदान तसे भासत तरी होते. सामाजिक सोयी, सर्वांना काम, आणि काही थोड्या प्रमाणात ऐहिक क्षेत्रातील भरभराट असे रूप जर्मनीत दिसू लागले होते. पुन्हा एकदा सशस्त्रीकरणाचा कार्यक्रम हाती घेतल्याकारणाने सर्वसामान्य जर्मन माणसाच्या जीवनमानात फार वाढ झाली नाही हे खरे. परंतु बहुतेक सर्व जर्मनांनी संमती देऊन ही गरिबी पत्करली होती. जे काही घडत होते ते त्यांच्या संमतीने घडले होते. सर्व जर्मनीत



अनुक्रमणिका

अशा प्रकारे एक नवे आत्मविश्वासाचे वातावरण होते. हिटलरने आपली उद्दिष्टे साध्य करण्यासाठी या नव्या आत्मविश्वासाचा, नव्या वातावरणाचा, मोठ्या कौशल्याने वापर केला. ऱ्हाईनलँडचे (जर्मनीचे) सशस्त्रीकरण, ऑस्ट्रीया जर्मनी सामीलनामा आणि सुडेटन हा प्रदेश गिळंकृत करणे ही सारी उद्दिष्टे हिटलरने जो नवा आत्मविश्वास व जे नवे वातावरण निर्माण केले गेले होते या दोहोंचाही उपयोग करून साध्य करून घेतले. १९३८ च्या अखेरीस जर्मन इतिहासातील एक सर्वात जास्त यशस्वी असा मुत्सद्दी म्हणून आपले स्थान प्रस्थापित करण्यात हिटलरने यश मिळवले आहे असे ह्या जगास पाहावयास मिळाले. आपण तत्कालीन घटनांचे निरीक्षण केले तर हिटलर हा अतिशय लोकप्रिय असा नेता निश्चितच होता, असाच निष्कर्ष काढावा लागेल.

मार्च १९३९ मध्ये, बिगरजर्मन अशा झेकोस्लोवाकियावर आक्रमण करीपर्यंत तरी हिटलरचा 'नैतिक ताळेबंद' हा महाभयानक जरी असला, तरी स्टॅलिनशी तुलना करता तो कमी भयानक होता हे नि:संशय. हिटलरने ज्यूंचा छळ केला, त्यांची लूटमार केली हे खरे आहे. परंतु मध्य आणि पूर्व युरोपमधल्या हिटलरपूर्व काळातील अनेक राज्यकर्त्यांनी तेच केले होते, हेही इतिहासास ज्ञात आहे. हिटलर आक्रमक होता. हिटलरने जर्मनीतील लोकशाहीच्या गळ्याला नख लावले आणि त्या देशातील कायद्याचे राज्य निकालात काढले हेही खरे. परंतु या साऱ्या घटना १९३० सालच्या युरोपात सर्वसामान्यपणे बहुतेक सर्व युरोपीय देशात घडणाऱ्या होत्या. हिटलरने हजारो लोकांचा खून केला होता हेही सत्य आहे. परंतु याबाबतीत स्टॅलिनचा धावफलक सहस्त्रपटीने 'मोठा' होता. स्टॅलिनने ज्यांचा खून केला त्यांची गणती हजारोंनी होणार नव्हती, तर कित्येक दशलक्षात झाली असती. अनेकांचा अंदाज असा होता की, या खून झालेल्या माणसांची गणना अनेक कोटीत होती. एवंच १९३९ साल हे हिटलरच्या आयुष्याला वळण देणारे साल ठरले. त्याच्या नैतिक अध:पातास प्रचंड वेग देणारे ते वर्ष ठरले. त्याच्या नशिबाने पलटी खाल्ली; आपले नवे साम्राज्य (REICH) हे सरतेशेवटी भस्मसात कसे होईल याची खातरजमा तो करीत होता. हिटलरला ज्यूंचा समूळ उच्छेद करण्यासाठी काही एका आवरणाची आवश्यकता होती. हे आवरण हिटलरला प्राप्त होईल याची व्यवस्था जगातील इतर राष्ट्रांनी केली. एक प्रकारे ते हिटलरच्या काळ्या कारस्थानात सामील होते. हे 'आवरण' निर्माण होण्याची व्यवस्था झाल्याकारणाने हिटलरला ज्यू-उच्छेद हे काळेकृत्य करणे शक्य झाले. या ठिकाणी इतर राष्ट्रांनी मदत केली हे विधान बुद्धिपुरस्सर केलेले आहे. सर्वसामान्यपणे रशियन माणूसही जेथे महतप्रयासाने पोहोचतो, अशा दुर्गम स्थानी स्टॅलिनने शेकडो 'दशलक्ष' लोकांचा खून केला आणि बाहेरच्या जगाला, स्टॅलिन तेथे नेमके काय करीत होता याबद्दल 'नक्की' असे काहीच सांगता येणार नव्हते. (म्हणूनच पं. नेहरूंनी स्टॅलिनला Man of peace – शांततेचा दूत म्हणून गौरविले त्याचे आश्चर्य वाटू नये!!) तसे हिटलरच्या बाबतीत नव्हते. जर्मनीत शांतता असताना, ६० लक्ष ज्यूंची हत्या करणे हिटलरला कधीही

शक्य झाले नसते. त्याला 'आवरण' हवे होते. त्यासाठीच आणि त्याच अर्थाने त्याला युद्धाची आवश्यकता होती.

ते काही असो. 'ज्यू जंतृ'चा पुरा नायनाट करण्याची संधी त्याला युद्धाने प्राप्त करून दिली. 'ज्यू जंतृ'चा नायनाट (Jewish Bacilus) हे हिटलरने आपल्या स्वत:च्या ज्यूंचा उच्छेद करण्याच्या धोरणास दिलेले नाव. हे करताना हिटलर एक प्रचंड असा जुगार खेळत होता. ज्यू लोकांचा नायनाट हे धोरण सक्रिय कार्यवाहीत आणणे हे तो जुगार खेळण्यामागचे एक कारण. तो प्रचंड असा जुगार खेळण्याला दुसरीही अनेक कारणे होती याचा आपण विसर पडू देता कामा नये. हा प्रचंड जुगार खेळण्याअगोदर सतत सहा वर्षे तो छोट्या मोठ्या प्रमाणात जुगार खेळत होताच. त्यात त्याला चांगले यशही प्राप्त झाले होते. त्यानंतर मात्र त्याने आपले स्वत:चे आणि जर्मनीचे भवितव्य पणाला लावले. हे धाडस करीत असताना, त्याला एकापाठोपाठ अनेक मोठे जुगारी असे राजकीय डाव खेळणे क्रमप्राप्तच होते. स्टॅलिनने हे अशा प्रकारचे धोके असलेले साहस कधीही पत्करले नसते. ते तसे वागणे हे त्याच्या स्वभावाला धरूनच होते. हिटलर आणि स्टॅलिन या दोघांच्या व्यक्तिमत्त्वात, प्रकृतीत आणि स्वभावात, तसाच मुलभूत स्वरूपाचा फरक होता. अनेक लेखकांनी या दोघांच्या स्वभावातील अनेक साम्ये टिपली आहेत. तसे करणे फारसे कठिण नाही. परंतु त्या दोघांच्यात जो फरक होता त्यावर पॉल जॉनसन यांनी नेमके बोट ठेवले आहे. जॉनसन यांच्या मते ह्या दोघांच्यातील फरक अजूनही कोणाच्याच लक्षात आलेला नाही. हिटलर हा क्रियाशील नेता होता. या उलट स्टॅलिन 'जे आहे तेच व तीच स्थिती' मान्य करणारा असा नेता होता. स्टॅलिनला क्रांतीकारक पक्ष निर्माण करणे कधीही जमले नसते. ते काम लेनिननेच करावे. तसेच ट्राटस्की प्रमाणे धडक मारून सत्ता काबीज करणे हेही त्याला जमले नसते. हिटलरप्रमाणे मतपेटीच्या द्वारा सत्ता हस्तगत करणे त्याला शक्य झाले नसते. एवढेच नाही तर मुसलोनीप्रमाणे प्रचंड देखावा करून, त्याच्या जोरावर अवडंबर माजवून स्टॅलिनला सत्तेवर येणेही जमले नसते. कमालीचा कावेबाजपणा, धूर्तता आणि निष्ठुरता यांच्या साहाय्याने लेनिनकडून आलेल्या वारसाहक्कांचा स्टॅलिनने पुरेपूर फायदा उठविला. तसेच एखादी संधी स्टॅलिनला जर मिळाली, मिळणार आहे असे वाटले, तर त्यापासून प्राप्त होणारे घबाड मिळवण्याचा मोका त्याने कधीही गमावला नाही. स्टॅलिनला एखाद्याच्या घराला कुलूप नाही असे आढळले तर तो दरवाजावर लाथ मारून तो घराचा दरवाजा सताड उघडा करील व त्याची लूट करील. परंतु पद्धतशीरपणे – कुलूप असले तरीही – घरफोडी हा व्यवसाय करण्याचे धाडस त्याने कधीही केले नसते. तसे करावयास तो भ्यालाच असता. धोका पत्करणे त्याला आवडत नसे. म्हणून तर स्टॅलिनला इतक्या लोकांचा खून करावा लागला. हिटलरने जेवढ्या लोकांचा खून केला असेल, त्याच्या चौपट लोकांचा खून स्टॅलिनने केलेला आहे. गुन्हेगारी या क्षेत्रात देखील–मग इतर मान्यवर अशा क्षेत्रांचे सोडाच–स्टॅलीन, संस्थापक, प्रतिभावान अथवा नवनिर्माता ठरला नसता. स्टॅलिनला घटनानिर्मितीपेक्षाही

घडलेल्या घटनांबद्दल प्रतिक्रिया व्यक्त करणे जमत असे. तीच त्याची प्रवृत्ती होती.

या उलट हिटलरचे होते. तो एक घायकुत्या स्वभावाचा नेता होता. इतिहासाला बुद्धिपुरस्सर चालना देणारा, काल गतिमान आहे, एकदा का काल गेला की तो संपतो, याचे सदैव भान असणारा, कालाच्या रथाला "पंख" आहेत याची सदैव जाणीव असणारा असा होता. स्टॅलिनची प्रकृती हिटलरशी तुलना करता वेगळी होती. स्टॅलिन सर्वंकष आणि संपूर्ण अशी सत्ता एकदा का हस्तगत झाली, तिच्यावर असलेली आपली पकड घट्ट झाली की मग तो त्यात समाधानी असे. हिटलरला सत्तेचा वापर, जागतिक राजकारणासाठी करण्याची जबरदस्त ओढ होती. तसेच सत्तेचा वापर ज्यूंचा वांशिक उच्छेद करण्याच्या आंतरिक अशा जबरदस्तीने त्याला पछाडले होते. १९३० सालच्या अखेरीस जर्मनीबहिर्गत असलेल्या प्रश्नांची 'सोडवणूक' आपण सोडून द्यावी, आपण त्या प्रश्नांची तड लावण्याचा प्रयत्न करू नये असे विचार तो आपल्या मनात खेळवीत होता. परंतु कालांतराने हे विचार व कल्पना ह्या कमकुवत हृदयाच्या द्योतक आहेत असे मानून, त्या त्याने सोडून दिल्या. स्टॅलिनने प्रस्थापित केलेली त्याची अशी एक 'राक्षसी राज्यव्यवस्था' केवळ त्या व्यवस्थेच्या अस्तित्त्वामुळे हिटलरला मोहवीत असे. पहिल्या व दुसऱ्या महायुद्धाच्या दरम्यानच्या काळात सारे जग नैतिकदृष्ट्या ह्या खालच्या पातळीवर गेले होते. हिटलर आणि स्टॅलिन यांना एकमेकांबद्दल वाटणारे आकर्षण हे त्या नैतिक अधःपाताचे एक लक्षणच आहे. दुष्ट, घातक आणि अनिष्ट अशा प्रकृतींची माणसे त्या कालखंडात एकमेकांवर छाप टाकीत, एकमेकांच्या कृष्णकृत्यांना प्रोत्साहन देत होती. हिटलर व स्टॅलिन त्याला अपवाद ठरणे शक्य नव्हते. हिटलरला स्टॅलिनच्या प्रकृतीचा, स्वभावाचा अंदाज अगदी अचूक असाच आला होता. हिटलरची इतर बाबींप्रमाणेच या बाबतीतही परीक्षा योग्य होती. स्टॅलिनच्या त्या तथाकथित अभेद्य संरक्षक चिलखतात, अनेक अगदी सूक्ष्म अशा चिरा आहेत हेही हिटलरने जाणले होते. तसेच आपल्यासारखी गुन्हेगारी प्रवृत्ती असलेली व्यक्ती स्टॅलिन – या गुन्हेगार माणसाचा आवाकाही हिटलर ओळखून होता. 'गाठ पडे ठका ठका' असेच ते होते. म्हणूनच हिटलरने असा निष्कर्ष काढला की आपण ह्या गुन्हेगाराबरोबर प्रथम शस्त्रसंधी व समझोता करावा, आणि सोईची वेळ पाहून त्याचा नायनाट करावा. एवंच १९३९ च्या ऑगस्ट महिन्यात – त्या अगोदरच कितीतरी दिवस जर्मनी–रशिया या दोन राष्ट्रांच्या दरम्यान केव्हाच प्रस्थापित झालेले पण बाहेरच्या जगास ज्ञात नसलेले संबंध उघड्यावर आले – हिटलर-स्टॅलिन या दोघांच्या दरम्यान जो करार झाला होता त्या कराराच्या रूपाने ते जगासमोर आले. या दोघांच्यातला हा करार, कसलीही सभ्यता न पाळणारा, बदमाषीचा जणू अर्क असलेला असाच तो करार होता. या करारातील जाहीर कलमे चीड आणणारी होती. ( अर्थात कम्युनिस्ट व त्यांचे सहप्रवासी यांच्या व्यतिरिक्त सर्वांना.) परंतु या करारात गुप्त असे आणखी एक कलम होते. ते आता फारच कुप्रसिद्ध आहे. ( याचाही उल्लेख 'कम्युनिस्ट व

त्यांचे मित्र' आजही करीत नाहीत ) या कलमानुसार पोलंड या राष्ट्राची चौथी फाळणी होणार होती. ( भारताच्या फाळणीला कम्युनिस्टांचा कॉंग्रेसपेक्षाही अधिक सक्रिय पाठिंबा होता तो याच चालीवर असावा.) या अगोदरच पोलंड या राष्ट्राचे त्याच्या आजूबाजूच्या राष्ट्रांनी आजवर तीन वेळा लचके तोडले होते. तसेच या करारानुसार बाल्टिक राष्ट्रे व फिनलंड ही चार राष्ट्रे गिळंकृत करण्याची मुभा रशियाला देण्यात आली होती. इस्टोनिया, लॅटिव्हिया, लिथुनिया या तीन राष्ट्रांच्या बाबतीत या कलमांची अंमलबजावणी करणे स्टॅलिनला सहज शक्य झाले. फिनलंड या चिमुकल्या पण शूर राष्ट्राने स्टॅलिनला जबरदस्त विरोध करून, प्रत्यक्ष लढाईत रशियास जेर केल्याकारणाने फिनलंडच्या बाबतीत स्टॅलिनला ते कुप्रसिद्ध कलम प्रत्यक्ष कार्यवाहीत आणता आले नाही. नुकत्याच घडलेल्या रशियन क्रांतीत ही तीन्हीही बाल्टिक राष्ट्रे पुन्हा स्वतंत्र झाली हा भाग वेगळा. वरवर पाहता या करारानुसार स्टॅलिनच्या धोरणात एक आमूलाग्र अशी क्रांती अंतर्भूत आहे असे दिसते. परंतु या करारावर सही करून आणि त्या गुप्त कलमाच्या द्वारा, ह्या करारापासून होणारे फायदे पदरात पाडून घेणे हे स्टॅलिनच्या स्वभावाला धरून होते. आजवर त्याने केलेल्या अनेक कृत्यात — त्या करारावर सही करणे हे स्टॅलिनचे कृत्य — त्याची प्रकृती व स्वभाव अत्यंत वैशिष्ट्यपूर्ण अशा पद्धतीने व्यक्त करणारे कृत्य होते. या ठकाणी कोणासही एकच दृश्य पाहावयास मिळेल. दोन महागुंड, पाळेगार, ठग – पेंढारी यांच्या नेतृत्त्वाखाली असलेल्या राजवटी परस्परांच्या फायद्यासाठी गठबंधन करीत होत्या. ते दोघेही 'समाजवादाचा' उद्घोष करीत होते. पण त्या दोघांचेही 'समाजवाद' अगदी वेगवेगळ्या प्रकारचे होते. परंतु या दोन्ही राक्षसी राजवटींचा एक समान गुण होता. तो म्हणजे या दोन्हीही राजवटींनी ज्यूडिओ-ख्रिश्चन नैतिकतेला संपूर्णतः सोडचिठ्ठी दिली होती. त्या दोन्हीही राजवटींची वेळप्रसंगी खून करण्याची तयारी होती. आपल्या फायद्यासाठी, आपली उद्दिष्टे यशस्वी करण्यासाठी कोठच्याही तऱ्हेचा धरबंद, मर्यादा न ठेवता, वेळप्रसंगी चोरी लुटालूट करण्याला या राजवटींची संमती होती. रिबेनट्राप हे हिटलरचे परराष्ट्रमंत्री. हे मॉस्को करारावर सही करून जर्मनीस परतल्यानंतर त्यांनी हिटलरला असे सांगितले की, रिबेनट्राप मॉस्कोत असताना त्याना अगदी 'घरी असल्यासारखे' वाटत होते. तशा प्रकारची त्यांची बडदास्तही ठेवण्यात आली होती. ते म्हणाले "जणू काही मी माझ्या (नाझी) पक्षाच्या अगदी बुजुर्ग कॉम्रेडसच्या गराड्यात होतो". दुसऱ्या एका अर्थाने रिबेनट्राप हे आपल्या (नाझी) पक्षाच्या बुजुर्ग कॉम्रेडच्या गराड्यातच होते. हिटलर आणि स्टॅलिन या दोघांनी ज्या व्यक्तींचा वापर केला होता, त्यातील अनेकांनी हिटलर किंवा स्टॅलिन या दोघांपैकी कोणाचीही चाकरी अगदी मनापासून आणि उल्हसित मनाने केली असती.

या सगळ्या घडामोडीत स्टॅलिनची वर्तणूकही जगावेगळी आणि काहीशी अपेक्षाभंग करणारी होती. या कराराच्या रूपाने जो बनाव रचण्यात आला होता, त्यात प्रत्येकाच्या – हिटलरच्या आणि स्टॅलिनच्या — वाट्याला काही ना काही काम आले



अनुक्रमणिका

होते. त्यापैकी स्टॅलिनने आपल्या वाट्याला आलेले काम अगदी चोख बजावले. अगदी एखाद्या अतिशय इमानी अशा भागीदारासारखे. स्टॅलिनची वर्तणूक ही अपेक्षाभंग करणारी होती असे जे वर म्हटले आहे त्याचे कारण एकच. ते म्हणजे स्टॅलिन आपल्या आयुष्यात प्रथमच आपल्या वचनाला जागला होता. आजवरच्या त्याच्या कारकीर्दीत आपण दिलेले वचन पाळणे हे त्याला ठाऊकच नव्हते. चोरी अथवा दरोडा किंवा तत्सम पापकृत्य यशस्वीरीत्या पार पाडावयाचे असेल तर ते दुष्कृत्य करणाऱ्या टोळीवाल्यांना किमान नीतिमत्ता पाळावी लागते. दिलेल्या शब्दाला जागावे लागते. स्टॅलिनचे वागणे हे त्या नीतिशास्त्राला धरून होते. हे गृहीत धरले तरच त्याच्या त्यानंतरच्या काळातील वागणुकीचा अर्थ लावण्यास मदत होईल. १९४१ साली हिटलर विश्वासघात करणार आहे असे स्टॅलिनला सांगण्यात आले होते. परंतु त्या 'अमंगल' भविष्यवाणीवर, त्या दुश्चिन्हावर स्टॅलिनने विश्वास ठेवण्यास साफ नकार दिला. म्हणूनच हिटलरने प्रत्यक्षात विश्वासघात केला आहे असे स्टॅलिनला आढळून आले, तेव्हा त्याला आश्चर्याचा धक्काच बसला. परंतु जशी स्टॅलिनची फसगत झाली होती, तशी हिटलरचीही झाली होती. हिटलरने स्टॅलिनच्या स्वभावाची व वागण्याची अगदी योग्य व अचूक अशी परीक्षा केली होती. परंतु स्टॅलिन ज्या रशियन साम्राज्यावर राज्य करीत होता, त्या साम्राज्यात जी जनता होती, त्या जनतेच्या कर्तृत्वाबद्दल हिटलरने योग्य अंदाज बांधला नाही. त्या जनतेचे कर्तृत्व हिटलरने कमी लेखले ही त्याची सर्वांत मोठी घोडचूक. एकोणिसाव्या शतकात राजनैतिक वर्तुळात एक वाक्प्रचार अगदी शास्त्रपूत मानण्यात येत असे. 'रशिया हा वाटतो तितका कधीही बलवान नसतो. रशिया हा वाटतो तितका कधीही कमकुवत नसतो.' हिटलरला ह्या जुन्या वाक्प्रचाराचा विसर पडला. निदान त्याच्या शेवटच्या वाक्याचा. त्याला फक्त त्या वाक्प्रचारातील पहिल्या भागाचे स्मरण होते. स्टॅलिनसारख्या बेजबाबदार, खुनशी हुकूमशाहाची धोंड उरावर असतानाही रशियन साम्राज्यातील जनतेने हिटलरचा पराभव केला. हे रशियन इतिहासात प्रथम घडत नव्हते. नेपोलियन बोनापार्टलाही हाच अनुभव आला होता. पहिल्या अलेक्झांडर– सारखा अत्यंत अयोग्य, कमकुवत राजा असतानाही रशियन साम्राज्यातील जनतेने नेपोलियनचा पराभव केला. त्याचीच पुनरावृत्ती हिटलरच्या वेळी झाली. या साठीच १९३९-४१ ही वर्षे महत्त्वाची. आधुनिक इतिहासाला कलाटणी मिळाली ती त्याच काळात. ती कलाटणी आधुनिक इतिहासाच्या दृष्टीने अत्यंत निर्णायक अशा स्वरूपाची होती. १९३९ सालच्या सुरुवातीला राष्ट्रीय आणि आंतरराष्ट्रीय हा दोन्ही पातळ्यावर हिटलर अत्यंत प्रबळ स्थानावर होता. त्यावेळी हिटलरसमोर अनेक शक्यता होत्या. आणि त्यातून कोठल्याही शक्यतेची निवड करण्याचे स्वातंत्र्य त्याला होते. परंतु १९४१ च्या अखेरीस हिटलर या १९३९ साली उपलब्ध असलेल्या साऱ्या शक्यता गमावून बसला. हिटलरने अगदी अटळ अशा पराभवाच्या चरकात आपली स्वेच्छेने रवानगी करून घेतली होती. २६ फेब्रुवारी १९४९ च्या सुमारास खुद्द हिटलरलाही आपली स्वत:ची चूक उमजली होती.



अनुक्रमणिका

त्याबद्दल अगदी पूर्ण अशी जाण त्याला आली होती. युद्धछावणीत (Bunker) राहात असताना, त्याने आपला सहकारी मार्टीन बोरमान यांच्याजवळ बोलताना पुढील उद्‌गार काढल्याचे हिटलरचरित्राचे प्रख्यात अभ्यासक बुमाख यांनी नमूद केले आहेत. हिटलर बोरमान यांना म्हणाला, 'खरे म्हणजे अत्यंत उत्कृष्ट अशी गोष्ट एकच होती ... राष्ट्रीय समाजवादाच्या तत्त्वज्ञानाने भारलेल्या तरूण वर्गाची निर्मिती... आणि त्यानंतर मग अटळ असे ज युद्ध होते ते पुकारण्याचे व लढण्याचे काम भविष्यकाळातील पिढ्यांवर सोपवायचे...' मी सध्या हे कार्य अंगीकारले आहे. ते दुर्दैवाने, एकाच व्यक्तीच्या हातून अथवा एकाच पिढीत कार्यवाहीत येईल अथवा सिद्धीस जाईल असे नाही''.

या अत्यंत भयावह अशा घटनांवर अनेक इतिहासकार विचार करतील. त्याचे विश्लेषण करतील. हे काम व हा अभ्यास गेली चाळीस वर्षे सातत्याने होतच आहे. बुमाख हे अनेकांपैकी एक. त्यांनी यासंबंधी एक प्रचंड ग्रंथराजच लिहिला आहे. या त्यांच्या ग्रंथातील अनेक घटनांची अगदी तपशीलवार नोंद. आपणास त्या घटनासंबंधी विचार करण्यास पुन्हा एक संधी देते. परंतु तसे करीत असताना आपणास आणखी एका प्रचंड अडचणीला सामोरे जावे लागते. कोणत्याही निर्णायक अशा ऐतिहासिक घटनासंबंधी विचार करताना आपण नेहमीच अमुक अमुक घटना घडली नसती तर काय घडणे शक्य होते? एखादी घटना एका विशिष्ट प्रकारे न घडता दुसऱ्याच एखाद्या प्रकारे घडली असती तर? असे जर तर आपल्या मनात निर्णायक अशा ऐतिहासिक घटनासंबंधी विचार करताना नेहमीच उभे राहातात. या ज्या संभाव्य अशा अनेक शक्यता असतात त्यातून निवड कशी करायची हाच मोठा पेच असतो. हिटलरच्या बाबतीत तोच पेच आपणासमोर आहे. हिटलरने सर्व जगास युद्धाच्या खाईत लोटले याबद्दल वादच नाही. परंतु त्या अत्यंत विनाशात्मक झंझावातापेक्षा आणखी अधिक दुःसह अशा परिस्थितीला सर्व जगात तोंड द्यावे लागले असते का? विशेषतः मार्क्सवादाच्या – म्हणजे रशियन साम्राज्यवादाच्या – गुलामगिरीत मध्य व पूर्व युरोपीय राष्ट्रे डांबली गेल्यानंतर? त्या राष्ट्रावर, तसे पारतंत्र्य लादले गेल्यानंतर सर्व जगावर पराकोटीच्या विनाशाची परिस्थिती ओढवली असती. या ठिकाणी एक गोष्ट गृहीत धरण्यात आलेली आहे. हिटलर-स्टॅलिन करार दोघांनीही इमान राखून पाळलेला आहे व रशिया-जर्मनी हे युद्ध झालेलेच नाही. पॉल जॉनसन या प्रख्यात लेखकाच्या मते तसा प्रसंग ओढवण्याची शक्यता होती हे त्या प्रश्नाचे उत्तर आहे. हिटलर १९४५ च्या फेब्रुवारीत ज्या निर्णयास अखेरीस आला तोच निर्णय १९३९ च्या सुरुवातीलाच हिटलरने घेतला असता तर? या परिच्छेदाच्या अगोदरच्या परिच्छेदाच्या शेवटी हिटलर व मार्टिन बोरमान या दोघांच्यातील संभाषण उद्‌धृत करण्यात आले आहे. त्याकडे वाचकांनी पुन्हा एकदा नजर टाकावी म्हणजे हा मुद्दा अधिक स्पष्ट होईल. हिटलरने १९३९ साली महायुद्ध चालू न करता ते केव्हा करावयाचे हा निर्णय आपल्या वारसदारावर सोपविला असता तर? तसे झाले असते तर सर्व जगाला अत्यंत विकट

पेचप्रसंगाला तोंड द्यावे लागले असते. मग मात्र सर्व जगास त्या पेचप्रसंगातून बाहेर पडण्याची जवळजवळ आशाच नव्हती. हिटलरने स्थापन केलेल्या आणि घडविलेल्या राष्ट्राने शांततामय आक्रमण करण्याचे धोरण अवलंबिले असते तर जर्मनीचा फायदाच झाला असता. दूरवरच्या भविष्यकाळाचा ह्या राष्ट्राने विचार केला असता तर, या धोरणातले प्रभावी व बिनखर्चाचे धोरण कुठलेही नाही हेच जर्मनीस आढळले असते. मध्य युरोपमधील शक्तीशाली जर्मनीने इतर प्रदेशात जोरदार अशी आर्थिक मुसंडी मारली असती. आपल्या अवतीभोवती जर्मनीकडे प्रेमाने व सहानुभूतीने पाहाणाऱ्या राजवटींची निर्मिती हिटलरच्या जर्मनीने केली असती. हे सारे शांततेने, कधीकधी धाकदपटशाचा वापर करून अथवा अन्य मार्गाने, तथापी चुकीच्या मार्गाचा अवलंब न करता हिटलरच्या जर्मनीला करणे सहज शक्य होते. (दुसऱ्या महायुद्धानंतर स्टॅलिनने हे करून दाखवलेच. सारा पूर्व युरोप स्टॅलिनच्या रशियन साम्राज्याच्या टाचेखाली, अगदी अमेरिका, इंग्लड, फ्रान्स – या साऱ्या देशांच्या संमतीने आला.) अखिल युरोपखंडात एका स्थैर्यशाली आणि कायम राज्यावर असलेल्या नाझी जर्मनीने हळूहळू आपले वर्चस्व प्रस्थापित केले असते. सर्व युरोपखंडावर जर्मनीने प्रभुत्त्व गाजविले असते. एवढेच नव्हे तर कालांतराने, रशियासुद्धा नाझी जर्मनीच्या छत्राखाली आला असता याबद्दल शंका नाही. सोव्हियत राज्यपद्धतीतील कधीही दुरुस्त होऊ न शकणाऱ्या त्रुटी, या सर्व जगासमोर आज अधिक उघड्यावर आल्या आहेत. या त्रुटींबद्दल डांग्यांसारख्या भारतीय कम्युनिटांनाही संदेह राहिलेला नाही. स्थैर्यशाली आणि प्रबळ अशा नाझी जर्मनीने या अशा या प्रकारच्या सोव्हियत रशियाला – ऑपरेशन बारावरोसापेक्षा अधिक सावकाशीने जर्मनीने आपल्या नियंत्रणकक्षेत खेचले असते. पश्चिम पॅसिफिक महासागरात सर्वंकष हुकूमशाहीवादी आणि केवळ सैनिकी आधिपत्याखाली असलेला जपान त्या हिटलरच्या काळात प्रभुत्त्व गाजवीत होता. मग या परिस्थितीत युरोप गमावलेलाच आहे, हिंदमहासागरात, पॅसिफिक महासागरात नियंत्रण नाही, ग्रेटब्रिटन हे राष्ट्र कसेबसे तग धरून बसले असते, तरी नशीब. पॉल जॉनसन यांच्या विश्लेषणानुसार ग्रेट ब्रिटन या झटपटीत टिकलेही नसते. हे सर्व घडल्यानंतर अर्थातच अमेरिका ही दिवसेंदिवस अगदी एकटी पडली असती. एवंच आस्तेकदम हिटलरवादाने सर्व जगात नाझी पक्षाच्या राजवटीचा विजय अगदी पक्का झाला असता. हळूहळू सर्व जगाचीच ती राज्यपद्धती झाली असती. खुल्या बाजारपेठापेक्षाही हिटरलप्रणित राष्ट्रीय भांडवलशाही अर्थव्यवस्था हीच खरी अर्थव्यवस्था व तीच आर्थिक प्रगतीचा पुढे रेटणारा घटक ठरला असता. वर्गसंघर्ष या कल्पनेपेक्षा वांशिक तत्त्वज्ञान ही तत्त्वप्रणाली सर्व जगात मान्यवर अशी फॅशनेबल तत्त्वप्रणाली ठरली असती.

पं. जवाहरलाल नेहरू म्हणाले असते हिटलर हा शांततेचा दूत आहे. (Stalin is a man of peace हे त्यांचेच वाक्य) मग गावगन्ना हुजऱ्यांचे विचारूच नका. राम पटवर्धन, अरूण साधू, कवि सुर्वे, यांसारखे अनेकजण या दिंडीत सामील झाले असते.

जगातील सर्व विद्यापीठात आज जसा मार्क्सवादाचा ज्या अहमहमिकेने अभ्यास होतो तसाच वांशिक तत्त्वप्रणाली या संकल्पनेचाही अभ्यास झाला असता. आज ज्या प्रकारे (प्राध्यापक न. र. फाटक, गं. बा. सरदार, आपले एम. एन. राय यांच्यापासून प्रा. नलिन पंडित, प्रा. कांता रणदिवे यांच्यापर्यंत) मार्क्सवाद त्याचे पंथ-उपपंथ यांना जसे शेंबूड जसा जमिनीला चिकटतो तसे चिकटुन असल्याचे, त्या मार्क्सवादी पंथ-उपपंथ वैचारिक फांद्यांना धरून अत्यंत केविलवाण्या परिस्थतीत लोंवकळताना पाहातो. (केविलवाण्या एकाच गोष्टीसाठी खरा खवा भाइ डांगेच घेऊन गेले. हे सारे उरले आहेत ते हिशोब चुकता करायला शिल्लक आहेत) तसेच दृष्य आपणास पाहावयास मिळाले असते. मार्क्सवादाऐवजी ते वांशिक वाद या तत्त्वप्रणालीच्या अवतीभोवती घुटमळताना दिसले असते. खरे म्हणजे वर्गसंघर्ष (मार्क्सप्रणित) आणि वांशिक तत्त्वज्ञान—एक मार्क्सप्रणित आणि दुसरे हिटलरप्रणित—या दोन्हीही अगदी अस्पष्ट व धुसर अशा संकल्पना आहेत. या बद्दल काहीही शंका नाही. खरे म्हटले तर अगर एरवीही अत्यंत भयावह असे दृष्य आहे. गेल्या अर्धशतकात युरोप अनेक प्रकारच्या यमयातनांतून आणि अत्यंत निराशाजनक अशा परिस्थितीतून गेला आहे. तसे असले तरी आज, इतिहासात, प्रथमच आपणास एक वेगळाच युरोप पाहावयास मिळतो. सर्वच प. युरोपिय—तसेच जवळजवळ सर्व युरोपिय देशांत—लोकशाही विद्यमान आहे. लोकशाही विद्यमान असलेल्या सर्व युरोपमध्ये आज कायद्याचे राज्य आहे. १९९० पूर्वी जे देश रशियन साम्राज्यात होते, तेही आज हळूहळू लोकशाही राज्यव्यवस्था व कायद्याचे राज्य या प्रकारच्या समाजव्यवस्थेत व राज्यव्यवस्थेत प्रवेश करीत आहेत. आपणास आजतरी असे जग दृष्टीस पडते खरे. राजकीय आणि आर्थिक या दोन्ही क्षेत्रांतील स्वातंत्र्य ही आगामी भविष्यकाळातील वैचारीक अशी वाट आहे. एका आंतरराष्ट्रीय अशा राज्यव्यवस्थेची पहिलीवहिली पावले टाकली जात आहेत. ही आंतरराष्ट्रीय राज्यव्यवस्था आता नुसती कल्पना राहिलेली नसून ती काही प्रमाणात तरी आपण कार्यवाहीत आलेली पाहातो. हे सारे पाहिल्यानंतर १९३९ साली हिटलर अधिकारी झाला या बद्दल ईश्वराचे आभार मानावे तेवढे थोडेच आहे.

●●●

# १

# फसवी सत्ये

'–द राइट टू वर्क–' 'काम मिळण्याचा हक्क'

कोलिन विल्सन

स्वैर अनुवाद

विश्वास पाटील

अनेक वर्षांपूर्वी जगभरच्या कामगाराना, आणि या कामगारांमध्ये भारतातील कामगारही येतात, काम न करण्याचा, काम थांबवून संपावर जाण्याचा हक्क हवा होता. आज कामगाराना आपल्या मागण्यांसाठी संपावर जाण्याचा हक्क उपलब्ध आहे. परंतु गेली कित्येक वर्षे संपावर जाण्याच्या हक्काबरोबरच 'काम मिळविण्याचा हक्क' –'द राइट टू वर्क'–असाला पाहिजे अशीही मागणी कामगार वर्गाकडून पुढे येऊ लागली आहे. लोकसंख्येत झालेली वेसुमार वाढ आणि नवेनवे तंत्रवैज्ञानिक शोध लागल्याने पूर्वी ज्या कामासाठी माणसे लागत असत तेच काम यंत्राद्वारे होऊ लागल्याने कारखान्याच्या क्षेत्राकडून कामगारांची मागणी कमी होत गेल्याचा बहुधा हा परिणाम असावा. तशातच तेलाच्या किंमती भडकत गेल्याने दिवसेंदिवस बेकारीत भर पडू लागल्याचेही ते द्योतक म्हणता येईल. एकोणिसशे साठीत व सत्तरीत जे कामगार आमची इच्छा नसेल तर आम्हाला कामाला जुंपता येणार नाही, 'काम न करण्याचा हक्क आम्हाला आहे' अशा प्रकारचे नारे देत असत तेच कामगार अलिकडे रेल्वेगाडीच्या डब्यांवर तसेच रेल्वेलाईनीच्या बाजूच्या दगडी भिंतींवर, पाण्याच्या पाइपांवर वगैरे ज्याला काम नाही त्याला 'काम मिळविण्याचा हक्क आहे' या प्रकारच्या घोषणा खरडताना आपण पाहात आहोत. काम मागणाराला 'काम मिळालेच पाहिजे' 'काम मिळणे हा त्याचा हक्क आहे' या दाव्याचा गर्भित अर्थ असा दिसतो की काम मागणाराला सरकारने काम दिलेच पाहिजे, गरज पडल्यास सरकारने तशा प्रकारचे कायदेही करावेत, आणि कायदे करून कामाची गरज असणाराला आपापल्या कारखान्यात काम द्यावयास मालकमंडळीना भाग पाडावयास हवे. कारण कामगाराना



अनुक्रमणिका



तसा काहीतरी कायदेशीर हक्कच आहे, किंवा तशी जणू काही त्याला सरकारी सनदच आहे. एखादा मनुष्य काम करावयास तयार आहे म्हणजे ज्यांचा कारखाना वगैरे आहे त्यानी त्याला काम दिलेच पाहिजे, गरजू कामगाराला काम पुरविणे हे मालकमंडळींचे कर्तव्यच आहे, मग भले त्यांना जादा कामगारांची गरज असो अथवा नसो. काम मिळविण्याचा हक्क कामगाराला आहे. काम न देण्याचा हक्क मालकाला नाही असे काहीतरी हे तर्कशास्त्र असावे. या सर्व प्रकारणात हास्यास्पद भाग हा आहे की या प्रकारच्या युक्तिवादामध्ये, दाव्यामध्ये आणि मागणीमध्येही काही चुकीचे तर्कशास्त्र आहे, हा दावाच विचित्र आहे हे अनेकांच्या लक्षातही आलेले दिसत नाही. ही एक 'कॉन्फिडन्स ट्रिक' आहे, विश्वासाचा गैरफायदा घेण्याचा हा प्रयत्न आहे हे सुध्दा कोणाच्या ध्यानात आलेले दिसत नाही. 'काम मिळण्याचा हक्क' ही मागणी म्हणजे तर्कदृष्टतेचा अगदी कहरच होय हे तर उघडच आहे. पण 'राईट टू वर्क' ही घोषणाच अशी काही नेत्रदीपक आणि भुरळ पाडणारी आहे की भले भले त्या घोषणेच्या आकर्षणाला बळी पडले आहेत असे आज तरी म्हणावे लागते.

अर्थात कामाच्या हक्काच्या मागणीचा संबंध जेव्हा फक्त तुमच्या स्वत:शीच असतो तेव्हा काम करण्याचा तुमचा हक्क तुम्हाला कोणीच नाकारू शकत नाही. परंतु तुमच्या व्यतिरिक्त इतर अन्य व्यक्तींशी जेव्हा तुमच्या हक्कांचा संबंध येतो तेव्हा ते सगळे प्रकरण गुंतागुंतीचे बनू लागते. घराची झाडझूड करायची की गादीवर लोळत दिवस घालवायचा हे ठरविण्याचा पूर्ण हक्क तुम्हाला आहे. मनास आले तर तुम्ही भरदार झाडून काढू शकता. मनास आले नाही तर आळसात गादीवर लोळत संपूर्ण दिवस फुकटही घालवू शकता. तो हक्क तुम्हाला आहे. परंतु दुसऱ्याच्या घरी जाऊन तुम्ही म्हणू लागलात की मला तुमच्या बैठकीच्या गादीवर दिवसभर लोळत पडायचे आहे, तो माझा हक्क आहे तर ते मान्य होईलच असे नाही. कारण तेथे तुमचा संबंध अन्य व्यक्तींशी येतो; आणि त्या अन्य व्यक्तींना स्वत : चेही काही खास हक्क असतात. जी.के.चेस्टरटन नावाचा एक प्रख्यात ब्रिटीश लेखक होऊन गेला. चेस्टरटन हा त्याच्या हजरजबाबीपणासाठी प्रसिध्द होता. तसेच बोलणाराच्या बोलण्यातील तार्किक विसंगती मोठ्या विनोदी पध्दतीने उघड करण्यासाठीही तो प्रसिध्द होता. तर या चेस्टरटनने एके ठिकाणी त्याला भेटलेल्या एका न–राज्यवाद्याचा. अनार्किस्टाचा किस्सा दिला आहे. न–राज्यवाद्याला सरकार नावाची वस्तुच वर्ज्य असते. कारण मनुष्याच्या स्वातंत्र्यावर कसलाही प्रकारचे बंधन असता कामा नये अशी त्यांची तात्विक भूमिका आहे. सरकार आणि सरकारी कायदे हा त्याना मानवी स्वातंत्र्याचा संकोच वाटतो. असो. तर चेस्टरटन महाशयाना भेटलेला न-राज्यवादी त्याना म्हणाला की 'स्वातंत्र्य हा ज्या अर्थी मनुष्यप्राण्याचा जन्मसिध्द हक्क आहे. आणि त्यामुळे हा हक्क ज्या अर्थी त्याच्यापासून काढून घेता येत नाही त्या अर्थी कोणाच्याही नाकावर ठोसा मारण्याचा हक्क मला आहे.' त्यावर चेस्टरटन उत्तरले की, 'नाही, माझ्या नाकाला जेथून सुरूवात होते तेथे तुझे स्वातंत्र्य संपुष्टात येते.' याचाच अर्थ

असा की जेथे एकापेक्षा जास्त व्यक्तींचा संबंध येतो तेथे हक्कांचा प्रश्न सुलभ न राहता गुंतागुंतीचा बनतो. कारण एकाच्या हक्कामुळे दुसऱ्याला उपद्रव होण्याची शक्यता तेथे निर्माण होते.

एकमेकांच्या सहकार्याने जेथे कामे करायची असतात तेथे ही गोष्ट आपण स्वभावत : च मान्य केलेली असते. त्यामुळे भागीदारी करणारांपैकी एखाद्याने जरी आक्षेप घेतला तरी इतराना स्वत : च्या इच्छा मागे घ्याव्या लागतात, बेत तहकूब करावा लागतो. कोणा एखाद्याचे कुणा स्त्रीवर प्रेम बसले आणि त्या स्त्रीला त्याचा चेहरा न आवडणारा वाटला तर त्याला त्याचे एकतर्फी प्रेम सोडून द्यावे लागते. मग तिच्यावरचे त्याचे प्रेम कितीही उत्कट असो, नि त्याला ती कितीही हवीहवीशी वाटो तिची इच्छा हाच तेथे शेवटचा शब्द ठरतो. ती दोघे प्रेमिक बनणार की नाही हे तिच्या मतावर ठरते. एखाद्या उद्योगपतीला वाटले की शेजाऱ्याची फर्म आणि आपली फर्म या दोन्ही फर्मस आपण जर एकत्र केल्या तर आपल्या धंद्याची भरभराट होऊन आपण कोट्याधीश होऊ तर आपलं म्हणणे शेजाऱ्याला पटवून देणे एवढेच त्याच्या हाती असते. तो असे म्हणू शकत नाही की माझ्या धंद्यात शेजाऱ्याचा धंदा विलीन करणे हा माझा हक्क आहे आणि त्याप्रमाणे घडले पाहिजे दोन्ही फर्म एकत्र करू पाहाणाऱ्या उद्योगपतीच्या म्हणण्यात कितीही तथ्य असले, आणि फर्मस् एकत्रित केल्याने दोघांचाही भरमसाठ फायदा होणार असला तरीसुध्दा दुसऱ्याला जर पहिल्याचा चेहराच आवडत नसेल किंवा धंदे एकमेकात विलीन करण्यासाठी त्याने पुढे केलेली कारणेच जर त्याला पटत नसतील तर तथ्याचा मुद्दा तेथे अप्रस्तुत ठरतो.

याचा साधा अर्थ असा की जेथे परस्पर सहकार्याचा संबंध असतो तेथे नकाराचा हक्क हाच एकमेव महत्वाचा हक्क ठरतो. फक्त याच हक्काला तेथे किंमत असू शकते. मालक आणि कामगार (एम्प्लॉयर अँड एम्प्लॉइ) या दोघांतील संबंध हा मूलतः सहकार्याच्या मुद्याशी संबंधित असल्याने काम मागण्याचा हक्क एखाद्याला असू शकतो हा विचारच तेथे स्वाभाविकपणे बाद ठरतो. अशा हक्काचा प्रश्नच तेथे उपस्थित होऊ शकत नाही.

तथापी कोणाला कोणाविरूद्ध किती हक्क असू शकतो म्हणजेच मानवी हक्कांच्या प्रश्नामध्ये मुलभूत दुरूस्त्या सुचविणारे तत्ववेत्ते जगात आजवर कधी होऊनच गेले नाहीत अशातला भाग नाही. मानवी 'हक्कांच्या' प्रश्नामध्ये दुरूस्था सुचविणारे कित्येक तत्ववेत्ते आजवर होऊन गेले आहेत. यांच्यापैकी एक मातबर मार्कि द साद (फ्रेंच कादंबरीकार १७४०–१८१४) हा उलट्या तर्कशास्त्राचा एक महान आचार्य. कारण उलट्या तर्कशास्त्रात त्याचा हात कोणी धरू शकेल असे वाटत नाही.

●●●

# १

# फसवी सत्ये

(मॅन इज बॉर्न फ्री, अँड ही इज एव्हरीव्हेअर इन चेन्स–जँ जँक रूसो.)

'जन्माने मनुष्य स्वतंत्र आहे, पण पाहावे तेथे तो बेडयांमध्ये अडकलेला आढळतो'

'जन्माने मनुष्य स्वतंत्र आहे परंतु पाहावे तेथे तो बेडयांमध्ये अडकलेला आढळतो'

रूसोच्या प्रस्तुत वाक्यात असा काही नाटकी आवेश आणि आक्रमकपणा भरलेला आहे की एखाद्या विशाल मैदानात हे वाक्य रूसोने जर का उच्चारले असते तर लोकांच्या झुंडीच्या झुंडी त्याच्या मागे धावत आल्या असत्या आणि आयुष्यभर त्याला कशाचीही ददात पडली नसती. खरे तर हे वाक्य लिहून रूसोने राजकीय क्षेत्रातला एक नवा शोधच जाहीर केला होता. या वाक्याच्या आधारावर जगभराच्या राजकारणपटूंचा संसार मजेत चालू आहे असे जर आपण म्हणालो तर ते मुळीच चुकीचे ठरणार नाही. या वाक्याच्या निमित्ताने साध्या भोळ्या माणसाना भुरळ घालण्याची 'फ्रिडम' वा 'स्वातंत्र्य' या शब्दातील सुप्त शक्तीच त्याने त्यांच्या निदर्शनास आणून दिले होती. राजकारणपटूंसाठी एक ठेवणीतले अस्त्रच त्याने जणू वहाल केले होते. कारण दृढ आत्मविश्वासाने स्वांतत्र्याची कल्पना जर का तुम्हाला उच्चारता आली, तर भले अगदी चुकीच्या; तद्दन मुर्खपणाच्या संदर्भात जरी तुम्ही ते केले असले तरीसुद्धा श्रोतृसमुदायाकडून तुमचा जयजयकार झाल्यावाचून राहणार नाही. असो.

तथापी रूसोमहाशयांच्या या जगप्रसिद्ध वचनाकडे थोड्या काळजीपूर्वक पाहाण्याची जर का कोणी तसदी घेतली तर त्या वचनातील बौद्धिक गफलत लगेच त्याच्या ध्यानात येऊ शकेल. रूसो म्हणतो की मनुष्यप्राणी जन्माला येताना स्वतंत्र म्हणून जन्माला येतो. जन्माला येताना त्याच्या हातापायात एकही बेडी नसते. पुढे मात्र त्याच्या हातापायात बेड्या पडू लागतात. मात्र खरी वस्तुस्थिती ही आहे की जन्माला येतानाच मनुष्यप्राणी अनेक प्रकारची बंधने स्व:तबरोबरच घेऊन आलेला असतो. त्यामुळे 'मॅन इज बॉर्न फ्री' असे म्हणणे चुकीचे आहे. माणूस त्याच्या देहाचा गुलाम आहे, त्याच्या वासनांचा, त्याच्या पोटाला लागणाऱ्या भुकेचा, त्याला सतावणाऱ्या



अनुक्रमणिका

अनेक प्रकारच्या जैविक गरजांचा आणि त्याच्या विशिष्ट प्रकृतिस्वभावाचा तो गुलाम आहे. शिवाय जगभराच्या बहुतेक सर्वांनाच सताविणाऱ्या आणखीसुद्धा एका गुलामगिरिचा तो बळी आहे : उदा. स्वत:चा योगक्षेम चालविण्यासाठी कसल्या ना कसल्या प्रकारचा कामधंदा त्याला करावाच लागतो. असा कामधंदा त्याने केला नाही तर निव्वळ भूकेनेच त्याचा प्राण जाईल. मात्र जगातील बहुतेक कुणालाच पोटासाठी श्रम करावेसे वाटत नाही. रूसोचा खरा आक्षेप बहुधा या विशिष्ट गुलामगिरीवर असावा. बहुतेक लेखकमंडळींना पोटासाठी कष्ट करताना नेहमीच दु:ख होत असते. रूसोसुद्धा त्याला अपवाद नसणार. त्यामुळेच ज्या समाज व्यवस्थेतील एक छोटा वर्ग सकाळी नऊ दहा वाजेपर्यंत आरामात गादीवर लोळत राहतो तर दुसऱ्या मोठ्या वर्गाला पोटाला चार पैसे मिळविण्यासाठी सूर्य उगविण्याच्या आधीच गादीची उब टाकून धावत कामाचे ठिकाण गाठावे लागते त्या समाजव्यवस्थेवर त्याचा रोष असावा. आपण या दुसऱ्या वर्गात जन्माला आलो आहोत ही गोष्ट रूसो कधीच विसरू शकला नाही.

रूसोच्या बाबतीत अगदी टोकाची भूमिका घेण्याचे गरज नाही. त्याच्या लिखाणात काही चांगल्या सूचना, चांगल्या कल्पना जरूर आहेत. तथापी रूसो हा मूलत:च दुबळ्या मनोवृत्तीचा आणि खऱ्याखोट्याची ज्याला चाड नव्हती असा इसम होता ही गोष्ट लक्षात ठेवणे आवश्यक आहे. स्वत: केलेल्या चोरीचा आळ मोलकरणीवर घालून नोकरीवरून तिची हाकलपट्टी घडवून आणणारा रूसोच. ठेवलेल्या बाईपासून झालेल्या पाचीच्या पाच पोरांना ती पोरे जन्मत:च अनाथआश्रमाच्या परडीत सोडणारा आणि सरकारी खर्चातच त्यांचे पालनपोषण योग्य प्रकारे होऊ शकते असे स्वत:चे समर्थन करणाराही रूसोच. आणि हाच तो ढोंगी रूसो की डोक्यावरच्या छपरासाठी आणि महिना मिळणाऱ्या वीस फ्रॅन्कसाठी ज्याने वाडवडिलांचा धर्म सोडून कॅथलिक धर्म स्वीकारला होता. याच रूसोने प्रामाणिकपणाचा आव आणून 'कैफियतींचे' ('कन्फेशन्स') पुस्तक लिहिले होते. आणि ठायी ठायी अनेक खोट्या गोष्टी त्यात घुसडल्या होत्या. कॅथलिक पाद्र्यांकडून धर्मांतराची सूचना येताच फक्त नऊ दिवसाच्या अवधीत त्याने धर्मांतराचा निश्चय केला होता. परंतु कैफियतींमध्ये मात्र धर्म बदलावा की बदलू नये हा झगडा आपल्या मनात जवळ जवळ तीस दिवस सुरू होता असे बिनदिक्कत सांगणाराही रूसोच.

रूसो अगदी शंभर टक्के नादान होता याचा अर्थात हा पुरावा नव्हे. शिवाय नादान व्यक्ती तत्ववेत्ती म्हणून तितकीच नादान व कुचकामी असते असेही समजण्याचे कारण नाही. परंतु रूसो हा एक संधिसाधू इसम होता व त्याच्या त्या वृत्तीचे प्रतिबिंब त्याचा आचारविचार या दोन्हीत उमटते हे विसरले जाऊ नये म्हणून हा सर्व प्रपंच. रूसोच्या पहिल्या यशस्वी ललितकृतीचेच उदाहरण आपण घेऊ म्हणजे माझा मुद्दा स्पष्ट होईल. या ललितकृतीची पार्श्वभूमी अशी– डिडेरोला (१७१३–८४. तत्कालिन प्रसिद्ध तत्ववेत्ता, नाटककार आणि वाङमयसमीक्षक) भेटण्यासाठी पॅरिसहून चालत रूसो व्हेंसान्ने या गावी निघाला होता. डिडेरोला तेथे तुरूंगात ठेवण्यात आले होते.

व्हेंसान्ने गावाकडे जात असता वाटेत रूसोच्या वाचनात वर्तमानपत्रातील एक बातमी आली. बातमीत म्हटले होते की डिजाँ ॲकडमीने 'शास्त्र आणि कला या दोन क्षेत्रांमध्ये जी प्रगती घडून आली. त्या प्रगतीमुळे लोकांची नीती सुधारली की खालावली?' या विषयावर एक निबंधस्पर्धा आयोजिली आहे. ही बातमी वाचताच रूसोची कल्पनाशक्ती काम करू लागली. मन बेसुमार उत्तेजित झाल्याने 'आपले डोके कसे गरगरू लागले, आपण आता खाली पडतो की काय असे कसे वाटू लागले' इ. इ. सगळी हकिकत रूसोच्या कैफियतींमध्ये तुम्हाला वाचता येईल. पुढे फक्त दोन तासात निबंधाचा ढोबळ आराखडा रूसोच्या मनात तयार झाला होता. शास्त्र आणि कला या दोन्ही उद्योगांमुळे मानवजातीची सुधारणा होण्याऐवजी नैतिक हानीच अधिक झाली आहे, शास्त्र आणि कला यांच्या प्रभावामुळे मानवजात भ्रष्ट झाली असून अत्यंत निष्ठुर बनली आहे हे रूसोचे तात्पर्य त्याची एकूण मानसिक ठेवण विचारात घेता अपरिहार्य असेच होते. रूसोच्या मताने प्रिमिटिव्ह मॅन, म्हणजे रानटी अवस्थेतला मानव हा शहरी माणसापेक्षा कितीतरी पटीनी अधिक निष्कपट, निरागस, सुखी व समाधानी होता. रानटी अवस्था गेली आणि नंतर आली नागर-संस्कृती. या नागरसंस्कृतीने सर्वांची डोकी बिघडवून टाकली. सर्वांना नैतिकदृष्ट्या भ्रष्ट केले.... वगैरे. रूसोचे हे मत मूर्खपणाचे आणि वस्तुस्थितीचे अतिसुलभीकरण करणारे तर होतेच परंतु पूर्णपणे खोटेसुद्धा होते. गंमत गोष्ट अशी आहे की खुद्द रूसोला वन्य जमातींची इतकीशीसुद्धा माहिती नव्हती. रानटी अवस्थेतील माणूस त्याने स्वतःच्या डोळ्यानी कधी पाहिला नव्हता. वास्तविक जीवनाचा त्याचा स्वतःचा अनुभव फारसा सुखाचा नव्हता. त्याला बालपणापासूनच अनेक प्रकारच्या हालअपेष्टा काढाव्या लागल्या होत्या. त्याचे तोवरचे आयुष्य भटकण्यात गेले होते. त्यामुळे स्वभावाने निसर्ग दयाळू नसतो ही गोष्ट त्याला त्याच्या स्वतःच्या अनुभवावरून कळावयास हवी होती. खरे पाहाता खुद्द रूसोला खऱ्याखुऱ्या वस्तुस्थितीमध्ये कधीही स्वारस्य नव्हते. त्याला फक्त त्याचे स्वतःचे सुखदुःख, आशाअपेक्षा याना शब्दांवाटे वाट करून द्यावयाची होती.

एक गोष्ट येथे प्रथमच स्पष्ट करावयास हवी. कोणा प्रतिभावंताने वास्तव आणि त्या वास्तवाचे आदर्शरूप या दोहोंत त्याला आढळलेल्या तफावतीवर टीकात्मक भाषण केले तर ते गैर समजण्याचे कारण नाही. प्रतिभावंत लेखक-कवींचा तो अधिकारच आहे. परंतु त्याने केलेल्या भाष्याची किंमत जे वास्तव तो गृहित धरतो ते कितपत वास्तव आहे याच्यावर ठरते. कारण तो त्याच्या इंट्यूइशनने, अंतःस्फूर्तीने त्याला जे वास्तव जाणवले होते त्याच्याबद्दल बोलत असतो. तो जर पूर्णपणे काल्पनिक जगाबद्दल बोलत असेल तर त्याच्या त्या भाष्याला काहीच किंमत उरत नाही. बर्नाड शॉ हा ब्रिटिश विचारवंत नाटककार म्हणतो त्याप्रमाणे मानवी कल्पनाशक्तीमध्ये दोन प्रकार आहेत. एका कल्पनाशक्तीमध्ये कल्पनाशक्तीच्या स्वैर विहाराला अग्रक्रम देण्यात येतो. तर दुसरीमध्ये वास्तवाचे भान ठेवून कल्पनाशक्ती सैल सोडण्यात येते. पहिल्या प्रकारच्या कल्पनाशक्तीला शॉ 'रोमँटिक

इमॅजिनेशन'–'स्वच्छंदवादी कल्पनाशक्ती' असे नाव देतो. तर दुसऱ्या प्रकारच्या कलपनाशक्तीला तो 'रिॲलिस्ट' किंवा 'वस्तवदर्शी कल्पनाशक्ती असे नाव देतो. स्वच्छंदवादी कल्पना शक्ती वास्तवात जे दिसत नाही वा दिसणारही नाही त्याचे चित्रण करण्याचा प्रयत्न करते. तर वास्तवदर्शी कल्पनाशक्ती प्रत्यक्ष पाहाता आले नाही तरी ज्याला वास्तविकता आहे त्या वास्तविकाच्या वास्तविकतेचे चित्रण करण्याचा प्रयत्न करते. याचा अर्थ स्वच्छंदवादी लेखक–कलावंत प्रत्यक्षतेपेक्षा काल्पनिकाला किंवा वास्तविकापेक्षा आभासात्मकला जास्त महत्व देतो. तर वास्तवदर्शी लेखक-कलावंत निव्वळ काल्पनिकापेक्षा ज्याला वास्तविकाचा दुजोरा आहे त्याला जास्त महत्व देतो. परीकथा हे स्वच्छंदवादी कल्पनाशक्तीचे उदाहरण. स्वच्छंदवादी कल्पनाशक्ती परीकथांचे जग उभे करते आणि या प्रकारच्या कल्पनाशक्तीची अखेर वस्तुनिष्ट जगाबद्दलच्या द्वेषामध्ये आणि तिटकाऱ्यामध्ये घडून येते. याच्या उलट वास्तवदर्शी कल्पनाशक्ती वास्तव जगापासून कधीही फारकत घेत नाही. त्या क्षणी प्रत्यक्ष अस्तित्वात नसलेले परंतु कधी ना कधी जे प्रत्यक्षात येण्याची शक्यता आहे. अशा जगाचे स्वप्न पाहाण्याचे प्रयत्न तेथे असतात. एवढेच नव्हे तर हे नवे जग प्रत्यक्षात यावे यासाठी केले जाणारे प्रामाणिक प्रयत्नसुद्धा तेथे पाहाता येतात. बाहेरून रूसो असे भासवितो की तो वास्तवदर्शी आहे. परंतु आतून पाहिल्यास तो एक स्वच्छंदवादी आहे. अत्यंत संधिसाधू, स्वार्थासाठी सत्याला मुरड घालणारा, दिवास्वप्नात रमाणारा, स्वतःची फसवणूक करून घेण्याची ज्याची शक्ती कल्पनेपलिकडे होती असा. खरे पाहाता रूसो हा मानसिकदृष्ट्या एक दुवळा इसम होता. मात्र त्याने आव आणला होता की तो एक अत्यंत खंबीर आणि वास्तववादी गृहस्थ आहे. प्रत्यक्ष जगाला तो कधीच तोंड देऊ शकला नाही. जगाची तर त्याने इतकी भीती घेतली होती की एका गावात दिवस दोन दिवसापेक्षा अधिक काळ तो वास्तव्य देखिल करू शकत नव्हता. आपल्या पाठलागावर आपले शत्रू आहेत हे मानसिक भय तर त्याला संपूर्ण आयुष्यभर वेढून राहिले होते. प्रत्यक्ष वास्तव जगाला भिडण्याची शक्ती त्याच्या अंगात नसली तरी शब्दाची जादू त्याच्या रोमारोमात मुरलेली होती. शब्दांची आतषबाजी करण्यात त्याने भल्याभल्याना मागे काढले असते नि खुद्द त्याच्या काळात मागे काढलेही होते. शब्दाची जादू वापरण्यात तो एवढा वाकबगार होता की आदर्श मानवी समाजव्यवस्थेबद्दलचे स्वतःचे दिवास्वप्न हे जणू खऱ्या समाजाचे खरोखरीचेच चित्र आहे असा आभास तो सहजगत्या निर्माण करू शकला होता. आकर्षक दिवास्वप्ने रंगविण्याच्या त्याच्या कौशल्याचा प्रभाव आपण फ्रेंच राज्यक्रांतीच्या रूपात पाहू शकतो. फ्रेंच राज्यक्रांती हे रूसोच्या दिवास्वप्नाला आलेले फळ होते. या भयंकर दुर्दैवी चळवळीतून अंति काय निष्पन्न झाले याची नोंद शेकडो ग्रंथांतून केली गेली आहे.

स्वच्छंदवादी कल्पनाशक्तीमधून काल्पनिकाला, अवास्तविकाला (अन्-रिॲलिटिज्) जन्म मिळतो हे तर खरेच. परंतु या प्रकारच्या कल्पनाशक्तीवरचा हा

खरा आक्षेप नव्हे. या विशिष्ट कल्पनाशक्तीवरचा खरा आक्षेप हा आहे की ही कल्पनाशक्ती वाचकाचा बुद्धीभेद करते. या प्रकारच्या अवास्तविक चित्रांनी वाचकाच्या बुद्धीचा एकदा का कबजा घेतला की प्रयत्न करून वाचकाला त्या कल्पनाचित्रांच्या कचाट्यातून बाहेर पडता येत नाही. कारण वास्तविक आणि अवास्तविक, किंवा प्रत्यक्ष आणि केवळ काल्पनिक या दोहोतील फरक ओळखण्याची वाचकाची शक्तीच ही कल्पनाचित्रे नष्ट करून टाकतात. वास्तविक आणि अवास्तविक या दोहोतील सीमारेषाच येथे धूसर बनविल्या गेलेल्या असतात. कारण या प्रकाचे लेखक भाषेचा अचूकपणा, तिचा नेमकेपणा मारून टाकतात. 'माणसे स्वतंत्र म्हणून जन्माला येतात, आणि पाहावी तेथे ती लोखंडी बेड्यांमध्ये अडकलेली आढळतात' हे रूसोमहाशयांचे जगप्रसिद्ध वचनच घ्या. हे साधे वचन नाही, तर ती एक नेत्रदीपक घोषणा आहे. एक न्यूरॉटिक कॅचवर्ड. ही घोषणा कानावर पडताच अनेक अंगानी ऐकणाराची कल्पनाशक्ती उत्तेजित होऊ लागते; आणि त्याच वेळी त्याची विचारशक्ती लुळी पडू लागते. पाहावा तेथे मनुष्य लोखंडी बेड्यांमध्ये बंदिस्त केला गेला आहे आणि त्या बेड्या तोडून त्याला मुक्त केले पाहिजे हे तत्वज्ञान ऐकताक्षणी बुद्धीचा वेध घेते. त्याचा खरेपणा तपासावा असा विचारही ऐकणाराच्या मनात त्या तत्वज्ञानाबद्दल येत नाही. किंबहुना या प्रतिपादनाच्या खरेपणाची शंकाच कुणाच्या डोक्यात येऊ शकत नाही. दोन अधिक दोन बरोबर चार ही गोष्ट जशी ऐकताक्षणी खरी वाटते तसेच रूसोप्रणीत स्वातंत्र्यावरचे भाष्यही खरे वाटते. आपल्या हातापायात कसल्याही प्रकारच्या बेड्या नाहीत असे ज्याला वाटू शकेल असा एकही सद्‌गृहस्थ या पृथ्वीतलावर आढळणार नाही. प्रत्येकालाच खात्रीपूर्वक वाटत असते की होय, आपल्या हातापायात अमुक बेडी नसली तरी तमुक बेडी आहेच. कारण जगातील प्रत्येक मनुष्य या ना त्या प्रकारच्या अन्यायाचा आपण बळी आहोत. आणि हा अन्याय जाणूनबुजून केला गेला आहे. 'जन्माने मनुष्य स्वतंत्र असतो, परंतु पाहावे तेथे त्याच्या हातापायात बेड्या अडकविलेल्या दिसतात' हे रूसोचे वचन सकृद्‌दर्शनी दिसते तितके सालस आणि निरूपद्रवी नाही. कारण या विशिष्ट वचनातून रूसो असे सूचित करीत होता की जगात जो अन्याय, जे दु:ख, दैन्य, अत्याचार, लुबाडणूक वगैरे दिसतात त्याच्यावरचा एकमेक खात्रीचा इलाज मला माहीत आहे. 'ऑप्रेसर्सना' 'जुलूमशहाना' उलथून टाका की सगळे व्यवस्थित होईल. रूसोच्या प्रस्तुत वचनामध्ये प्रच्छन्न संदेश हा आहे. रूसो सांगतो की सगळ्या दु:खावर फक्त एक वस्तुनिष्ट उतारा आहे. 'जनसामान्य हो, हाती शस्त्र घ्या. हे पाप गाडून टाका. वूड्र्चा आणि अमिर-उमराव दोघांचीही कत्तल करा. ह्या मंडळींचे उच्चाटन झाले की गमावलेले सुवर्णयुग फिरून भूतलावर अवतरेल... अतिशय गुंतागुंतीच्या वस्तुस्थितीचे हे विकृत, निर्बुद्ध अतिसुलभीकरण होते. परंतु या सुभिकरणामुळे गेल्या दोन शतकात जगभर जो रक्तपात झाला आहे. जितके दु:ख, जितका अन्याय, अत्याचार या जगात घडून आला आहे तितका रक्तपात, तितका अन्याय, अत्याचार त्या आधीच्या वीस

शतकांमध्ये जुन्या जुलूमशहांच्या कृत्यांमुळे देखिल घडून आलेला नाही. असो.

रूसोच्या विरूद्धचे आपले येथवरचे मगळे आक्षेप अकरणात्मक स्वरूपाचे आहेत. रूसोच्या भूमिकेतील उणीवांचाच फक्त विचार आपण केला आहे. परंतु करणात्मक भूमिकेतूनसुद्धा रूसोवर टीका करता येईल. कारण रूसोने स्वातंत्र्य या शब्दाची व्यख्याच चुकीची केली आहे किंवा अधिक बरोबर म्हणजे या शब्दाच्या अर्थाला त्याने विकृती आणली आहे. आणि त्यातून स्वातंत्र्याच्या कल्पनेच्या संबंधातला रूसोचा बौद्धिक गोंधळ व्यक्त होतो. रूसो म्हणतो की बेड्या तोडा, आणि वेड्या तोडण्यासाठी बूर्झ्वा, अमिरुमराव या सर्वांना खलास करा. ('Ecrasez linfame') कारण या वेड्या बूर्झ्वांमुळे आल्या आहेत. सरदारदरकदारांमुळे आल्या आहेत. बहात्तर रोगांवरचा असली दवा म्हणून रूसो राजकीय क्रांतीचा पुरस्कार करतो. मानवी दु:खावरचा एकमेव उतारा, स्वातंत्र्य मिळवून देणारा धोपट मार्ग म्हणून राजकीय क्रांतीचे औषध रूसो सुचवितो. आजवर जगात अनेक राज्यक्रान्त्या झाल्या. राज्यक्रांतीमुळे मानवी स्वातंत्र्यामध्ये भर पडते की ते अधिक खच्ची होतात याचा अनुभव सर्वांनी घेतला आहे आणि हा अनुभव अत्यंत दु:खदायक आहे. खरी गोष्ट ही आहे की स्वातंत्र्य मिळवून देईल असा एकही धोपट मार्ग अस्तित्वात नाही. स्वांतत्र ही हिसकावून घेण्याची गोष्टच नाही. राजकीय स्वातंत्र्याला मानवजातीच्या आयुष्यमध्ये असाधारण महत्व आहे ही गोष्ट खरी. राजकीय स्वातंत्र्य हा एक महत्वाचा आदर्श आहे यातही काही शंका नाही. परंतु राजकीय स्वातंत्र्य मिळाले म्हणजे सर्व मिळाले असे मानता येत नाही. ते असो. स्वातंत्र्याच्या संदर्भात महत्वाचा प्रश्न स्वातंत्र्याचा ग्रास खरोखर कोण करतो बूर्झ्वा आणि धनिक की अन्य कोणी? स्वातंत्र्याचा खरा मारेकरी कोण? मला वाटते की स्वातंत्र्याचे खरे मारेकरी म्हणजे मानसिक कंटाळा आणि जीवनाला कसलेही उद्दिष्ट नसणे हे दोन आजार होत. स्वातंत्र्य ही एक विरोधाभासात्मकतेवर गोष्ट आहे. फिश्टे नावाच्या जर्मन तत्ववेत्त्याने स्वातंत्र्याच्या विरोधाभासात्कतेवर नेमके बोट ठेवले आहे. तो म्हणजे 'तुम्ही स्वतंत्र आहे या गोष्टीला काहीही महत्व नाही, तुम्ही स्वतंत्र बनला आहात ही जाणीव प्राप्त होणे हे खरे स्वर्गीय सुख.' (टू बी फ्री इज नथिंग, टू विकम फ्री इज हेवन्ली.' फिश्टेच्या म्हणण्याचा मतितार्थ असा की स्वातंत्र्याचा आनंद लुटायचा असेल तर ते स्वातंत्र्य आपण बुद्धिपुरस्सर सिद्ध करावयास हवे. स्वातंत्र्याच्या सवयीमुळे आम्ही स्वतंत्र आहोत हीच गोष्ट आपण विसरून जातो. मग कधीतरी हे स्वातंत्र्य धोक्यात येते आणि झगडून ते आपण पुन:प्रस्थापित करतो. या क्षणी मनाला जो आनंद होतो त्याची तुलना कशाही बरोबर होत नाही. काही उदाहरणे घेऊ. म्हणजे मुद्दा स्पष्ट होईल. तुम्ही गाडीखाली सापडता सापडता वाचला आहात आणि तुम्हाला आपण वाचलो याचा प्रचंड आनंद झाला आहे. हा आनंद होतो कारण जीवन म्हणजेच स्वातंत्र्य गृहित धरून तुम्ही जगत असता आणि एकाएकी त्या जीवनावर संकट आलेले असते. त्या संकटातून वाचताक्षणी तुम्हाला तुम्ही जीवंत आहात हे अधिक तीव्रतेने जाणवते. आपण दुसरे

उदाहरण घेऊ. कामावर जाण्यासाठी आठवड्याचे पहिले सहा दिवस रोज सकाळी तुम्हाला लवकर उठावे लागते, आणि त्याचा तुम्हाला कंटाळा येतो. परंतु रविवारी सुट्टी असून सुद्धा तुम्ही नेहमीच्या दुप्पट उत्साहाने अंथरूण सोडता. हे आपण का करतो आणि हा उत्साह कोठून येतो याचा विचार जर का तुम्ही केला तर तुमच्या ध्यानात येईल की रोज लवकर उठण्याचे बंधन असते पण रविवारी ते बंधन नसल्यामुळे तुम्ही लवकर उठता. एखाद्या बंधनाच्या तुलनेत नव्याने मिळविलेले तुमचे स्वातंत्र्य तुम्हाला अधिक तीव्रतेने तुमचे स्वतःचे वाटते. मुद्दा असा, अभाव जाणवला तरच भाव जास्त उत्कटतेने मनाला भिडतो. मानवी मनाला वाटणाऱ्या साहसाच्या आकर्षणामागील रहस्यसुद्धा वरील वस्तुस्थितीतच आहे. कोणी उंच उंच डोंगरशिखरे पादाक्रांत करण्यासाठी झटतात. कोणी जुन्या प्रकारच्या होडक्यातून समुद्रपर्यटनाला बाहेर पडतात. साहसाची ही जी ओढ माणसाला वाटते तिचा उगम स्वातंत्र्य धोक्यात घातल्यावाचून स्वातंत्र्याचे खरे दर्शन माणसाला होत नाही या वस्तुस्थितीमध्ये आहे. स्पर्धेची ओढ, प्रसिद्धीचे वेड, कामुक सुखाचे वेड या सगळ्या वेडांचा उगमसुद्धा आपण काहीतरी नवे काबिज केले, नवा विजय आत्मसात केला या भावनेत आहे. विजयाचे ते विशिष्ट आत्मभान त्याना ते स्वतंत्र आहेत याचा आत्मसाक्षातकार आणून देतात. आता स्वातंत्र्याची अनुभूती ही शेवटी 'आधी आत्मस्वातंत्र्य नव्हते' या अनुभूतीशी निगडीत आहे. सारांश, तुम्ही प्राकृतिक अर्थाने स्वतंत्र असला तरी जोवर तुम्हाला त्या गोष्टीचे आत्मभान नाही तोवर खऱ्या अर्थाने तुम्ही स्वतंत्र नसताच. तेव्हा स्वातंत्र्याच्या बाबतीत खरा प्रश्न हे आत्म-भान कसे उत्पन्न करता येईल हा आहे. कारण हे आत्मभान, (धिस काइंड ऑफ अवेकनेस) ह्या जातीची आत्मजागृती कशी पैदा करता येईल याचा फॉर्म्युला--याची शास्त्रीय रीत हाताशी नाही. मला वाटते की मेन्टल 'मसल्'शी, मानसिक स्नायूशी या आत्मभानाचा संबंध असावा. या 'स्नायू'च्या अस्तित्वाबद्दल आज तरी आपण पूर्णपणे अंधारात आहोत.

अर्थात असा 'स्नायू' असेल वा नसेल एक गोष्ट मात्र सूर्यप्रकाशाइतकी स्पष्ट आहे आणि ती ही की जे कोणी महाभाग तुम्हाला सांगू पाहातात की आमच्याकडे स्वातंत्र्याचा फॉर्म्युला आहे त्याना ते काय बोलत आहेत हे कळत नसते. तसेच या प्रकारचे सुगम आणि विनासायाससाध्य फॉर्म्युले विकण्यासाठी रस्तोरस्ती जे फिरतात ते नुसतेच खोटारडे नसून ते लफंगेसुद्धा आहेत. भाषा आणि तात्विक स्वरूपाच्या कल्पनाना रूसो या गृहस्थाने किती अपाय पोहोचवला, भाषेचे आणि विचारक्षेत्राचे किती भयंकर नुकसान केले आहे हे जर खरोखर आमच्या ध्यानात आले तर 'समाज सुधारक' असा जो रूसोचा उदोउदो चालू आहे तो आम्ही तत्काल थांबवू. आणि शिमग्याच्या दिवशी त्याची प्रतिमा होळीत टाकू.

● ● ●

अनुक्रमणिका

